“वारल्यांना स्वतःविषयी वाटणाऱ्या 'नगण्य'पणाच्या गंडातून मुक्त करणे हाच सर्वात महत्त्वाचा प्रश्न आहे...गोदावरीबाईंनी वारल्यांतला आत्मविश्वास जागवला. अन्यायाविरुद्ध आपण पेटू शकतो असे त्यांना वाटायला लावले — हे आवश्यकच होते. पण हे झाले भक्कन पेटणाऱ्या भडक्यासारखे. भडका उडतो तसाच विझतोही चटकन. मोर्चे, निषेधाच्या सभा, जाळपोळ हे सारं आकर्षक असतं, परिणामकारकही असतं — पण पुष्कळदा तो क्रांतीचा भासच असतो. तेवढ्यापुरते सगळेच चेहरे, अंधारातल्या जाळात दिसावे तसे त्वेषाने पेटल्यासारखे वाटतात. पण हे सारे फार लवकर विझते. त्यासाठी विधायक प्रवृत्तीची, शांतपणाने, न कंटाळता ह्या शोषितांच्या लहानसहान अडचणी सोडवत त्यांच्यात जाऊन राहणाऱ्या कार्यकर्त्यांची फौज लागते. गांधीजींनी अशी फार मोठी फौज निर्माण केली होती. अनुताई वगैरे त्या फौजेतल्या अखेरच्या सैनिकांपैकी. एक काम घेऊन सतत राबणाऱ्या आणि स्वतःला फक्त त्या कार्याचे साधन मानणाऱ्या, कसल्याही वैयक्तिक गौरवाची अपेक्षा न करणाऱ्या अनुताई वाघांच्याविषयी माझ्या मनात फार मोठा आदर आहे.

मनाला निराश करून टाकणाऱ्या सभोवतालच्या परिस्थितीत अनुताईंसारख्या कार्यकर्त्या अशी कुठली प्रेरणा मनात जिवंत ठेवून काम करीत राहतात ते मला कळत नाही. वास्तविक त्यांच्यापुढे मला तर आपण कस्पटासारखे आहोत असं वाटते.”

— पु० ल० देशपांडे
(स० ह० देशपांडे यांस लिहिलेल्या पत्रातून)

अनुताई वाघ ।। कोसबाडच्या टेकडीवरून ।।

अनुताई वाघ

# कोसबाडच्या टेकडीवरून



# कोसबाडच्या टेकडीवरून

**अनुताई वाघ**

संपादन

**अशोक चिटणीस**

प्रस्तावना

**स० ह० देशपांडे**

**ऋचा प्रकाशन**

पहिली आवृत्ती : ३१ ऑगस्ट १९८०
दुसरी आवृत्ती : १७ मार्च १९८४
तिसरी आवृत्ती : १९ एप्रिल १९९२
चवथी आवृत्ती : २८ फेब्रुवारी २००४
पाचवी आवृत्ती : १ मार्च २००८



मुखपृष्ठ : पद्मा सहस्रबुद्धे
मांडणी : रमेश पानसे

किंमत एकशेसाठ रुपये

मुद्रक
माधव द० भागवत
मौज प्रिंटिंग ब्यूरो
खटाववाडी, गिरगाव
मुंबई ४०० ००४

प्रकाशक
सौ० अरुंधती पानसे
ऋचा प्रकाशन
सोनोरी, ३६ चरई
ठाणे ४०० ६०१

वितरक
मौज प्रकाशन गृह
खटाववाडी, गिरगाव
मुंबई ४०० ००४

## ऋणानुबंध

'कोसबाडच्या टेकडीवरून'ची ही चौथी आवृत्ती प्रसिद्ध होत आहे. तिसरी आवृत्ती १९९२ साली प्रसिद्ध झाली, आणि काही महिन्यांतच म्हणजे सप्टेंबर १९९२ मध्ये अनुताईंचे निधन झाले. या घटनेलाही आता, सुमारे बारा वर्षे होत आहेत.

अनुताईंनी आपल्या आयुष्याच्या अखेरच्या दशकात ग्राममंगल संस्थेची स्थापना केली. (डिसेंबर १९८२) या संस्थेने ठाणे जिल्ह्यातच आदिवासी भागात अनुताईंचे शैक्षणिक कार्य पुढे नेले आहे. बालशिक्षण आणि प्राथमिक शिक्षण हे अनुताईंचे कार्यक्षेत्र होते आणि माँटेसोरी, गिजूभाई आणि ताराबाई यांचा वारसा घेऊन त्या उभ्या होत्या. त्यांच्या निधनानंतर ग्राममंगलने तेच कार्यक्षेत्र आणि तोच वारसा घेऊन आपले कार्य पुढे चालविले आहे. एकीकडे अनुताईंच्या बालवाडीचा मूळ नमुना जपून ठेवतानाच दुसरीकडे, बालशिक्षणात चार पावले आणखी पुढे टाकली आहेत. अनुताईंप्रमाणेच, त्यांनी जन्माला घातलेल्या या संस्थेने, शैक्षणिक साधनांच्या निर्मितीचे कार्य वेगाने पुढे नेले आहे. आज सुमारे पाचशे शैक्षणिक साधनांचे उत्पादन ही संस्था करते आहे. शास्त्रीय बालशिक्षणासाठी प्रशिक्षणाचे कार्यही अनुताईंच्या पावलांवर पावले टाकत ग्राममंगलने विस्तारले आहे. प्रयोग, प्रशिक्षण, प्रकाशने आणि प्रसार हीच पूर्वीची दिशा पकडून आणखी पुढे वाटचाल या संस्थेने केली आहे.

ताराबाई मोडक यांनी १९३३ साली सुरू केलेले शिक्षणपत्रिका मासिक आजही अव्याहतपणे प्रकाशित होत आहे. अनुताईंनी सुमारे अठरा वर्षे या मासिकाचे संपादन केले होते. त्यांच्या निधनानंतर, गेली बारा वर्षे या मासिकाच्या संपादनाचा हा वारसा चालविण्याचे भाग्य मला लाभले आहे. 'कोसबाडच्या टेकडीवरून' या नव्या आवृत्तीबरोबरच हे मासिकही एप्रिल २००४ मध्ये ७२व्या वर्षात पदार्पण करीत आहे. इतकी वर्षे सातत्याने चालत असलेले भारतामधील हे एकमेव शैक्षणिक मासिक असावे. अनुताईंकडे वारसाने आलेले आणि अनुताईंनी दीर्घकाल जपलेले हे कार्यही आज नेटाने टिकून आहे.

शास्त्रीय बालशिक्षणाच्या प्रयोग-प्रसाराचे पहिले आंदोलन, नूतनबालशिक्षण संघाच्या रूपाने गिजूभाई बधेका आणि ताराबाई मोडक यांनी १९२६ साली सुरू केले. ताराबाईंनी आयुष्याची पन्नास वर्षे आणि अनुताईंनी आपल्या आयुष्याची सत्तेचाळीस वर्षे, बालशिक्षणात नवनवीन प्रयोग करण्यात आणि शास्त्रीय बालशिक्षणाच्या नमुन्यांचा प्रसार करण्यात घालविली आहेत. ताराबाईंच्या निधनानंतर बालवाड्यांचा उदंड प्रसार होऊनही त्याच्या शास्त्रीयतेची चळवळ तशी क्षीण झाली; आणि अनुताईंच्या मृत्यूनंतर तर ती तेथेच थबकली.

महाराष्ट्रात मात्र १९९४ सालापासून बालशिक्षणाचे दुसरे आंदोलन 'महाराष्ट्र बालशिक्षण परिषदे'च्या रूपाने पुनश्च उभे राहिले आहे. शास्त्रीय बालशिक्षणाच्या सार्वत्रिकीकरणाचा ध्यास घेत, आपल्या अनेक जिल्हा शाखांच्या करवी हे आंदोलन पसरत चालले आहे. मात्र हे आंदोलनही गिजूभाई-ताराबाई-अनुताई यांचा वारसा सांगतच उभे राहिले आहे. भारतातील बालशिक्षणाच्या कार्यातील या त्रिमूर्तींनी घडविलेला इतिहास हे भारतीय शिक्षणाच्या इतिहासातील एक संपन्न असे दालन आहे. कोसबाडच्या टेकडीवरून या, अनुताई वाघ यांच्या आत्मचरित्राने, हे दालन उघडून दाखविले आहे. या दालनातील महत्त्वाच्या घटनांना अतिशय बारकाव्याने उलगडून दाखविले आहे. हे या ग्रंथाचे वैशिष्ट्य आहे.

अनुताई वाघ यांच्याशी माझा व्यक्तिगत नातेसंबंध तर होताच; पण त्याहीपेक्षा कार्यसंबंध अधिक जवळचा होता. त्यांच्या समवेत ग्राममंगल संस्था स्थापन करण्याची आणि या संस्थेकरवी, एकाच वेळी, आदिवासींच्या जीवनात आणि बालशिक्षणाच्या क्षेत्रात प्रवेश करण्याची संधी मला मिळाली. अनुताईंच्याच सांगण्यावरून मी, त्यांच्या आजारपणाच्या काळात, माझी विद्यापीठातील प्राध्यापकाची नोकरी सोडून देऊन त्यांच्या ग्रामबाल शिक्षा केंद्रात सहसंचालक म्हणून सुमारे दोन वर्षे काम केले, आणि त्यांच्याच प्रेरणेने बालशिक्षणाच्याच



क्षेत्रात, आजवर, दोन दशके काम करीत राहिलो. त्यामुळे, मी त्यांचा कायमच ऋणी राहिलो आहे.

कोसबाडच्या टेकडीवरूनच्या चौथ्या आवृत्तीच्या प्रकाशनाने मला अनुताईंचे हे ऋण अंशतः फेडण्याची संधी मिळत आहे. 'अनुबंधात' मी आहेच; पण ऋणबंधातून अंशतः तरी मुक्त व्हायला मिळते आहे. म्हणून मला विशेष आनंद होत आहे.

**–रमेश पानसे**

२८ फेब्रुवारी २००४

*अशोक चिटणीस*

# आनंदाचे डोहीं....

१९८० च्या मे महिन्यातील शेवटच्या आठवड्यातील गोष्ट. रमेश पानसे मला म्हणाला होता,

"अनुताईंचे आत्मचरित्रपर पुस्तक मी काढतोय. ग्रंथालीतर्फे तू संपादन कर. वेळ फारच थोडा आहे."

"म्हणजे?"

"म्हणजे, जुलै महिन्यात अनुताईंचा एकाहत्तराव्या वाढदिवसानिमित्त सत्कार आहे. त्या समारंभात पुस्तक प्रकाशित व्हायला हवं!" रमेश असं म्हणून उठला. घरात गेला. दोन फाइल्स घेऊन बाहेर आला.

"ही अनुताईंची हस्तलिखितं. तू वाच आणि प्रेसकॉपी तयार कर."

मी हस्तलिखितं घेतली आणि उत्साहाने घराकडे निघालो.

अनुताईंच्या संस्थेविषयी आणि त्यांच्या शैक्षणिक प्रयोगांविषयी माझ्या मनात अनेक वर्षे कुतूहल होतं. बोर्डीत मी कै० अप्पा सान्यांकडे अनेकदा राहिलो होतो. आचार्य भिसे यांना पाहिलं होतं. चित्रे गुरुजींशी गप्पागोष्टी केल्या होत्या. पण बोर्डीजवळच असलेली कोसबाडची टेकडी कितीतरी वर्षे दूर उंचावरच राहिली होती! दोन वर्षांपूर्वी एका सुट्टीत डहाणूला गेलो असताना टेकडी चढलो. सुट्टी असल्यामुळे सारं बंद होतं. अनुताई तेव्हा त्यांच्या ओटीवरच्या बैठकीवर होत्या. त्यांच्या पायाला स्पर्श करून आलो. बस्स! इतकंच!

त्यानंतर अचानक अनुताईंचं कार्ड आलं. ऑगस्टच्या पहिल्या आठवड्यात मला





त्यांनी कोसबाडला कथाकथनासाठी बोलावलं होतं. कामाच्या व्यापात मला जायला जमलं नव्हतं. पण जाण्याची इच्छा होती. रमेशच्या पुस्तकाच्या निमित्तानं ही इच्छा आता पुरी होणार, या विचारानं मनाची पावलं हलकी झाली होती. आनंदाचा ठेवाच आपण घरी घेऊन जातोय, या भावनेनं फाइल्स घरी आणल्या.

फाइल्स उघडून नुसत्या बघितल्या मात्र—हबकून गेलो!

आनंदाच्या ठेव्याऐवजी एक चमत्कारिक आव्हान आपण घरी आणलंय, याची बोचरी जाणीव जागी झाली!

फाइल्स जुनाट! पाठकोऱ्या, पिवळट, डुप्लिकेटिंग पेपर्सवर लेखन केलेलं होतं. तिरकी, छोट्या उंचीची, डोक्यावर रेघा नसलेली, उघडी-बोडकी आणि कोंबडीच्या पायासारखी अक्षरं!

त्या फाइल्स, ते कागद, ते लिखाण हे सारं पाहून माझ्यातल्या शिक्षकाने पाहताक्षणीच टापटिपीचे, स्वच्छतेचे आणि अक्षराचे राखून ठेवलेले पाच गुण मनातल्या मनात वजा केले!

दोन फाइल्स वाचून काढणं फार अवघड आहे, असं जाणवलं. मन हताश झालं.

पण गंमत म्हणजे, वाचायला सुरवात केली आणि कान पकडून खेचून न्यावं तसं मजकुरानं खेचून नेलं! दोनचार दिवस-रात्रींत त्या फाइल्स मी वाचून काढल्या. मी त्या खाली ठेवायची खोटी की माझी पत्नी सौ० शुभा आणि दहावीतील माझी मुलगी चि० मुग्धा फाइल्स वाचत असे. काही भाग त्या मला वाचूनही दाखवीत.

पुन्हा पुन्हा मला फाइल्स वाचाव्या लागल्या. दोन वेगवेगळ्या कारणांसाठी स्वतंत्रपणे लिहिलेला मजकूर त्या फाइलींत होता. एका ठिकाणी वैयक्तिक माहिती अधिक, तर दुसऱ्या ठिकाणी संस्थेचा इतिहास अधिक!

दोनही फाइलींतील मजकूर मला एकत्रितपणे विचारात घ्यायचा होता. अनुताई आणि संस्थेचा इतिहास यांना परस्परातून वेगळं करायचं नव्हतं. पुनरावृत्ती टाळायची होती. काळ आणि घटना यांची सांधेजोड करायची होती. काही मुद्द्यांचं स्पष्टीकरण हवं होतं. काही व्यक्ती आणि काही प्रसंग यांवर अनुताईंनी विस्तृतपणे लिहावं असं वाटत होतं.

मुख्य म्हणजे अनुताईंना भेटायचं होतं! त्यांचीशी चर्चा करायची होती. अनौपचारिक गप्पागोष्टी करायच्या होत्या.

कथाकादंबरीतल्या योगायोगांवर माझा विश्वास नाही. परंतु माझ्या आयुष्यात योगायोग खच्चून भरलेले आहेत! योगायोगानं माझ्या हातात आलेली अनुताईंची हस्तलिखितं वाचून झाल्यावर मी रमेशला म्हटलं,

"जुलैमध्ये पुस्तक-प्रसिद्धीची घाई करू नकोस! ३१ ऑगस्ट हा दिवस पकड! अनुताईंच्या गुरूंचा म्हणजे ताराबाईंचा हा पुण्यतिथी-दिन आहे, तसेच ताराबाईंच्या गुरूचा म्हणजे मॅाँटेसोरीबाईंचा हा जन्मदिनही आहे."

विशेष म्हणजे पुस्तक-प्रसिद्धीचा आणि अनुताईंच्या सत्काराचा दिवसही शेवटी ३१ ऑगस्ट हाच ठरला!

पुस्तक-प्रसिद्धीचा दिवस निश्चित करून १२ जुलैच्या भल्या पहाटे उठून मी कोसबाडला जाऊन थडकलो. दुपारी अडीच ते रात्री अकरा वाजेपर्यंत आमची बैठक रंगली. अप्पा कोसके, राम कदम, सिंधुताई, त्यांच्या वृद्ध मातोश्री यांनी अधूनमधून काही तास मैफलीत श्रोत्याची भूमिका रंगविली.

तीस-पस्तीस वर्षे ज्यांनी अनुताईंच्या बरोबर काम केलं त्यांनाही ठाऊक नसलेल्या अनुताई माझ्यापुढे उलगडल्या गेल्या होत्या, या जाणिवेनं मी अंतरी सुखावलो होतो.

'माणूस' म्हणून अनुताईंचा विकास कसा कसा झाला, कोणकोणत्या मानसिक संघर्षातून त्या गेल्या, कोणकोणत्या शारीरिक ऊर्मीविरुद्ध त्यांनी कसं कसं बंड केलं होतं, असे प्रश्न माझ्यातील लेखकाला पडलेले होते.

वयाच्या तेराव्या वर्षी बालविधवा झालेल्या अनुताई, वयाच्या एकोणिसाव्या वर्षी —ऐन तारुण्यात—मोकळेपणानं तरुण अविवाहित मित्रांच्यात रोज दोन-अडीच तास हिंडत होत्या. पन्नास वर्षांपूर्वीचा समाज माझ्या डोळ्यांसमोर होता. मला अनुताईंना विचारावंसं वाटलं की, पुनर्विवाहाचा मोह त्यांना का झाला नाही? स्वतःचा संसार असावा, स्वतःला मुलंबाळं असावीत, असं त्यांना का वाटलं नाही?

मोकळेपणानं, अलिप्ततेनं मी विचारलेल्या प्रश्नांची उत्तरं तितक्याच मोकळेपणानं, सहजतेनं आणि अलिप्ततेनं मिळाली!

सोमवारी पुन्हा तीनचार तासांची बैठक संपवून कोसबाडहून घरी परतताना मी अनुताईंना दहा प्रश्नांची एक प्रश्नपत्रिका 'गृहपाठ' म्हणून देऊन आलो!

अनुताई ह्या प्रथम श्रेणीच्या विद्यार्थिनी असल्यामुळे एका आठवड्यात खास माणसाच्या द्वारे उत्तरपत्रिका योग्य तऱ्हेनं लिहून मला पाठविण्यात आली!

दरम्यान माझं घर अनुताईंच्या चरित्रानं झपाटून गेलं होतं. अनुताईंशिवाय दुसरा विषय नव्हता. अनुताईंच्या लेखनाचं पुनर्लेखन करणं अत्यावश्यक होतं. सौ० शुभाच्या कॉलेजातील तिच्या विद्यार्थिनीही आमच्यात सामील झाल्या. मेधा वागळे आणि माधुरी बर्वे तासन्तास त्यांच्या सुंदर अक्षरात 'डिक्टेशन्स' घेऊ लागल्या होत्या.

माझ्या शाळेतील विद्यार्थ्यांत आणि शिक्षकांत वावरताना मला अनुताईंविषयी बोलल्याशिवाय इतर काही बोलणं अशक्य झालं! घरी आलो की, सौ० शुभा अनुताईंच्या जीवनातील संघर्षावर मला तिच्या प्राध्यापकी थाटात लेक्चर देऊ



लागली! इतकंच काय, तिनं या पुस्तकाला 'अनुस्मृती' हे नावही देऊन टाकलं होतं!

२६ जुलैच्या रविवारी मी जेव्हा रमेशला घेऊन पुन्हा अनुताईंना भेटलो आणि प्रेसकॉपी दाखविली तेव्हा अनुताईंना 'अनुस्मृती' नावाविषयी सांगितलं. त्या म्हणाल्या,

"'अनुस्मृती' हे नाव 'मनुस्मृती'ची आठवण करून देईल. मनूएवढी ही अनू मोठी नाही! नाव साधंच द्या. आयुष्याचं सिंहावलोकन हा अर्थ त्यातून निघावा."

अनुताईंना पुन्हा नवा 'गृहपाठ' देऊन आम्ही परतीच्या वाटेवर असताना 'कोसबाडच्या टेकडीवरून' हे उंची नाव रमेशला सुचलं!

पुनर्लेखनाच्या कामात मला अनेकांनी सहकार्य दिलं. सौ० मंदा ढापरे, शुक्राचार्य गायकवाड, स्मिता गोरे आणि सौ० विजया कानडे यांनी खारीच्या सद्भावनेनं मदत केली. रमेश आणि सुनील कर्णिक बहुधा रोजच झालेल्या कामाविषयी चर्चा करीत. सूचना करीत. रमेशच्या आईनेही एका बैठकीत संपूर्ण प्रेसकॉपी आनंदाने वाचून काढली.

या साऱ्या आनंदाच्या, अनुभवांच्या लाटेवर डुंबत असताना सतत अनुताईंचा प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष सहवास घडत होता. ऑगस्टच्या पहिल्या आठवड्यात दोन दिवस त्या आमच्या घरी येऊन राहिल्या होत्या. त्यांच्या स्वभावातील विविध बारकावे आणि पैलू आमचे डोळे दिपवीत होते. त्यांचा साधेपणा विस्मयजनक होता!

साध्या सोप्या भाषेत, रसाळ आणि गोष्टीवेल्हाळ शैलीत अनुताईंमधील पूर्व-प्राथमिक आणि प्राथमिक शिक्षिका आपलं जीवन आपणास या आत्मचरित्रात उलगडून दाखविते; अत्यंत साधी घटना गोष्टीरूपाने, नाट्यरूपाने, अकृत्रिम शैलीतून, आकर्षक बनते. संस्थांचा इतिहासही रटाळ होण्याची शक्यता असताना रंजक बनतो. अनुताईंच्या व्यक्तिमत्त्वातील साधेपणा त्यांच्या शैलीतून प्रतीत होतो.

श्रीमती ताराबाई मोडक या अनुताईंच्या गुरू. ताराबाईंच्या हुकुमाच्या बाहेर अनुताई गेल्या नाहीत. पुराणातील कथांमधील गुरु-शिष्यांचा आदर्श अनुताईंनी मानला. अंगी बाणवला. अनुताईंचं आवडतं फळ आंबा. ताराबाईंनी आंबा खाणं सोडलं म्हणून अनुताईंनीही आंबा खाणं सोडलं. ताराबाई तिखट खात नसत म्हणून अनुताईंनीही तिखट खाणं बंद केलं. मण्यारसारखा विषारी सर्प चावला असता, आपल्यामुळे ताराबाईंची झोपमोड होईल म्हणून, २ जून १९७१ रोजी रात्री १० वाजता, अनुताई दूर महिला वसतिगृहाच्या पायरीवर जाऊन वेदना सहन करीत बसल्या!

मांडीवर डोकं ठेवून झोपलेल्या गुरूची झोपमोड होऊ नये म्हणून, आपली मांडी पोखरणाऱ्या भुंग्याला दाद न देणारा आणि प्राणांतिक वेदना सहन करणारा

परशुरामाचा शिष्य कर्ण मला अनुताईंपेक्षा वेगळा वाटत नाही!

सर्प चावला असता अनुताईंच्या हातातील विष आणि रक्त चोखून घेणारा शिष्यही अनुताईंना लाभला होता!

रामदासांनी आपला शिष्य कल्याण याला आपल्या मांडीला झालेलं गळू (म्हणून आंबा!) चोखायला लावून त्याची जी परीक्षा घेतली त्या परीक्षेची आठवण व्हावी, अशी ही सर्पदंशाची सत्यकथा आहे!

विशेष म्हणजे, सहा महिने सर्पदंशामुळे आजारी पडूनही अनुताईंनी सर्पाला दोष दिला नाही. सर्पालाच काय, आपल्या आयुष्यात अनुताईंनी कधीही कुणाला दोष दिला नाही! कुणाविषयी तक्रार केली नाही. या संपूर्ण आत्मचरित्रात अनुताईंच्या आयुष्यात त्यांना झालेल्या परिश्रमांचं, कष्टांचं, दुःखाच्या आघातांचं ऊर बडवून केलेलं आक्रंदन अंशमात्रही आढळणार नाही! कडवटपणाचा लवलेशही त्यांच्या ओठातून किंवा लेखणीतून उमटत नाही, याचं आश्चर्य वाटतं!

श्रीमती ताराबाईंनी अनुताईंना घडवलं हे सत्य. परंतु अनुताईंच्यातील स्वतंत्र बुद्धिमत्ता, निष्ठा, समर्पित वृत्ती, ध्येयवाद, स्त्रीचा नाजूक हळवेपणा, पुरुषी कणखरपणा या विविध आणि परपस्परभिन्न स्वभावच्छटा अनुताईंचं वेगळेपण दाखवतात. अनुताई म्हणजे डिट्टो ताराबाई नव्हेत. ताराबाईंच्या छायेत वाढूनही त्या ताराबाईंची छाया नव्हेत!

प्रत्येक लहान मुलात एक मोठा माणूस असतो आणि प्रत्येक मोठ्या माणसात एक लहान मूल असतं. त्याप्रमाणे, प्रत्येक महान स्त्रीत एक पुरुष असतो, आणि प्रत्येक महान पुरुषात एक स्त्री असते, असं मला जाणवतं.

आपल्या आईवडिलांविषयी, भावंडांविषयी आणि विशेषतः मावाविषयी बोलताना त्यांचे डोळे सतत पाणावतात. आईच्या ममतेनं त्यांनी हरिजन-गिरिजनांना, लहान-थोरांना जवळ केलं. न्हाऊ-माखू-खाऊ घातलं. शिकवलं. केवळ माणसांविषयीच त्यांच्या मनात प्रेम नाही, तर प्राणिमात्राविषयी आणि वृक्ष-वेलींविषयीही सगे-सोयऱ्याचं नातं त्यांच्या मनात जागतं आहे. मांजर-कुत्र्याविषयीची भूतदया त्यांच्या मनात पराकोटीला जाऊन पाझरते आहे!

"लूत लागलेला एक कुत्रा कित्येक दिवस त्यांच्या अवतीभोवती वावरत होता. पलंगाखाली झोपत होता. तो कुत्रा पाच-सहा फुटांवरच्या कोणाही माणसाला नकोसा वाटावा, इतकी त्याला दुर्गंधी येत होती. पण अनुताईंमुळे त्या कुत्र्याला हाकलण्याची हिंमत कोणाला झाली नाही!" अशी ही घटना अनुताईंसमोरच सिंधुताई अंबिके यांनी मला सांगितली होती. परंतु अनुताईंच्या आत्मचरित्रात अशा घटनेला स्थान असणं शक्यच नाही!

नियमांची, तत्त्वांची अंमलबजावणी करणाऱ्या अनुताई या 'पुरुषी' असतात.



नाहीतरी ताराबाई त्यांना आपला 'मुलगा'च मानीत!

कसंही असो, गुरू ताराताई या पतीपासून विभक्त झालेल्या स्त्री होत्या. अनुताई बालविधवा स्त्री होत्या. दोघींनीही समाजाचा संसार आपला म्हटला. अविरत कष्टानं, कर्तबगारीनं, कल्पकतेनं, ध्येयवादानं आणि निःस्वार्थी समर्पित वृत्तीने त्यांनी शिक्षणक्षेत्रात केलेले प्रयोग या क्षेत्राशी संबंधित असणाऱ्या प्रत्येक माणसास उद्बोधक वाटतील.

अनुताईंचं हे आत्मचरित्रपर पुस्तक, सामाजिक आणि शैक्षणिक कार्यावर, ध्येयवादावर, नीतिमूल्यांवर, माणसातील चांगुलपणावर आणि कर्तृत्वावर प्रेम करणाऱ्या आबालवृद्धांना प्रेरक ठरावं, अशी इच्छा आहे.

आपल्या या विशाल आणि वैचित्र्यपूर्ण भारतात, भविष्यात असा केव्हातरी दिवस यावा की जेव्हा, आपलं कर्तृत्व दाखविण्यासाठी स्त्रीला बालविधवा, घटस्फोटिता किंवा अविवाहिता राहण्याची गरज पडू नये; असं आज तीव्रतेनं वाटतं.

अनुताईंच्या या आत्मचरित्राच्या पुस्तकाच्या निमित्तानं दोन-तीन महिने जो अविस्मरणीय आनंदमय अनुभव लाभला त्याच वर्णन करता येत नाही!

तुकारामाने उत्कट आनंदाच्या अनुभवाचं वर्णन "आनंदाचे डोहीं आनंदतरंग" अशा शब्दांत केलं आहे. मला झालेला आनंद यापेक्षा कोणत्या वेगळ्या शब्दांत सांगू?

आपणा सर्वांना आनंदाच्या डोहात यथेच्छ डुंबण्याची संधी प्राप्त करून दिल्या-बद्दल प्रा० श्री० रमेश पानसे आणि सौ० अरुंधती पानसे यांच्या विषयीची कृतज्ञता मी व्यक्त करतो. श्रीमती अनुताईंनी जे हार्दिक सहकार्य दिलं ते अवर्णनीय आहे. त्याचं ऋण कसं व्यक्त करू?

ग्राम बाल शिक्षा केंद्राचे उपसंचालक श्री० अप्पा कोसके, कार्यवाह श्री० राम कदम आणि छापखाना-व्यवस्थापक श्री० य० रा० रानडे यांनी फोटो-ब्लॉक्स आणि फोटो मिळवून देऊन केलेल्या सहकार्यामुळे त्याचप्रमाणे सौ० पद्मा सहस्रबुद्धे यांच्या मुखपृष्ठामुळे या पुस्तकाची रंगत वाढावयास मदत झाली आहे. अशा प्रकारे ज्यांनी ज्यांनी विविध प्रकारे साहाय्य केले त्या सर्वांना व्यक्तिशः आणि प्रकाशकांचे वतीने धन्यवाद!

स० ह० देशपांडे

# जीवंतिका

काही माणसांचं व्यक्तिमत्त्व असं असतं की एखादी भावना अनुभविण्याची शक्ती आपल्यात आहे याचा प्रत्यय तीच आपणाला आणून देतात आणि आपलंच दर्शन आपल्याला नव्यानं घडवतात. ज्याला 'भक्तिभाव' किंवा तत्सदृश काही नाव देता येईल त्याची क्षमता माझ्यात आहे, हे अनुताईंची ओळख होण्यापूर्वी मला ठाऊक नव्हतं. पण आता असं झालं आहे की एके दिवशी माझ्या घरी आल्यावर ज्या जुन्यापान्या पण ऐसपैस वेताच्या खुर्चीवर त्या बसल्या होत्या तिच्याविषयी, "अरे, ह्या खुर्चीत अनुताई एकदा बसल्या होत्या!" असा विचार माझ्या मनात येतो.

जराशी गमतीची आणि कुणाला चमत्कारिक वाटेल अशी गोष्ट म्हणजे अनुताईंचा विचार मनात आला की त्याच्या पाठोपाठ त्यांचे पाय माझ्या डोळ्यांसमोर येतात. आता अनुताईंना चालताना पाहायचं म्हणजे मनाला वेदना होतात. साध्या सरळ रस्त्यावरून चालतानाही हे पाय एकमेकात गुंतत चालल्यासारखे, पण वेळीच बाजूला होत, चालताना दिसतात. दीड वर्षापूर्वी फक्त वळणा-वाकणाच्या किंवा चढउताराच्या ठिकाणीच त्यांना आधार लागे. अशा वेळी त्या त्यांना मदत करायला अधीर असलेल्या अनेक हातांपैकी एकाचा आधार तेवढ्यापुरताच घेत आणि इतर वेळी म्हणत, "हात धरू नका. लागला म्हणजे सांगेन." तुमच्याशी बोलताना त्या दुस्वरे गुडघे आणि दुस्वरी पावलं चोळीतच बोलत असतात.

अनुताईंचे हे आता श्रांत झालेले पाय मला अनेक अर्थांनी प्रतीकात्मक वाटतात. ह्या पायांना अनुताईंच्या काहीशा स्थूल देहाचा भार वाहावा लागतो, हे खरंच!





पण या पायांनीच दऱ्या-खोऱ्यांतून, वळणा-वाकणांतून, जंगलांतून, आहोळां-वरून, आदिवासी पोरांच्या मागं आणि त्यांच्या बरोबरीनं पळापळ केलेली आहे. हेच पाय देणग्या जमविण्यासाठी वर्षानुवर्षं फिरलेले आहेत आणि आता वार्धक्यातही या लटपटत्या पायांना या पायपिटीपासून सुटका नाही. याच पायांच्या भक्कम आधारावर अकरा बालवाड्या, चार पाळणाघर, एक प्राथमिक शाळा, प्राथमिक व पूर्वप्राथमिक प्रशिक्षण विद्यालये, बालसेविका वर्ग, वसतिगृहे, किसानशाळा, रात्रशाळा, प्रौढ शिक्षणाची केंद्रे आणि इतर अनेक गोष्टींचा डोलारा उभा आहे. ह्या पायांनीच आदिवासींच्या घराघरांत नवं ज्ञान चालत गेलं. आलंकारिक बोलायचं तर लाथ मारीन तिथं पाणी काढीन असं थक्क करणारं कर्तृत्व आणि जिद्द याच पायांनी दाखविली. पस्तीस वर्षांच्या अखंड आणि अवघड वाटचालीनंतर या पायांनी दुखू नये तर काय करावं?

या पायांना मी अजून स्पर्श केलेला नाही, पण ही माझी शहरी आणि सुशिक्षित ऐट फार दिवस टिकेल असं वाटत नाही.

१९४५ पासून बारा वर्षं बोर्डी आणि १९५७ सालापासून आदिवासी वस्तीच्या अंतर्भागात कोसबाड इथं ताराबाई आणि अनुताई यांचे भारतातील ग्रामीण बाल-शिक्षणाच्या इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहावे असे प्रयोग सुरू झाले. ताराबाई बोर्डीला आल्या तेव्हा त्रेपन्न वर्षांच्या होत्या आणि अनुताई पस्तीस. कोसबाडला आल्या तेव्हा ताराबाई पासष्ट आणि अनुताई सत्तेचाळीस. या सर्व काळात ताराबाईंच्या प्रत्येक कामाच्या अग्रदूतिका अनुताई; ताराबाई त्यांना "घरातला पुरुष"च म्हणत. १९७३ साली ताराबाईंनी आपला देह ठेवला—त्याला अनुताईंनी अग्नी द्यावा अशी त्यांची इच्छा होती. ताराबाई जाऊन आज इतकी वर्षं झाली तरी कोसबाडच्या ग्राम बाल शिक्षा केंद्रातील निवासस्थानात दोन पाट्या अजूनही शेजारी-शेजारी लटकलेल्या आहेत : 'ताराबाई मोडक', 'अनुताई वाघ'.

ताराबाई गेल्यापासून ग्राम बाल शिक्षा केंद्राच्या संचालिकत्वाची धुरा अनुताईंच्याच खांद्यावर आहे.

आज कोसबाड आणि आजूबाजूचे पाडे यांत चार पाळणाघरांत मिळून नव्वदांवर तान्ही मुलं जोजावली जात आहेत, आदिवासींच्या खोपटांमधून त्यांना कधीच ऐकू आले नसते असे ध्वनी ऐकीत आणि न पाहिलेले रंग पाहत अबोधपणानं वेगळे संस्कार करून घेत आहेत, स्वच्छ राहायला शिकताहेत आणि सकस आहार खाताहेत. अकरा बालवाड्यांमधून दोनशे मुलं आणि दोनशे मुली त्यांच्या छोट्याशा चूलबोळक्यांच्या, रंगीत पानाफुलांच्या, आवाज करणाऱ्या डब्यांच्या, पाण्याची धार नेमकी ओतता यावी म्हणून केलेल्या नरसाळ्यांच्या, वेगवेगळ्या लांबीच्या रंगीबेरंगी

काठ्यांच्या, वेगवेगळ्या वजनांच्या रंगीत लाकडी ठोकळ्यांच्या आणि अशा इतर अनेक खेळांमधून, आणि या खेळातून त्या खेळात असा मनःपूत संचार करून आपल्या शब्द-स्पर्श-रूप-रस-गंधांच्या संवेदनांची तीव्रता वाढवीत आहेत. ही सर्व आदिवासी—मुख्यतः वारली—मुलं. प्राथमिक शाळेतल्या सुमारे साडेतीनशे विद्यार्थ्यांतले तीनशे आदिवासी आहेत. रात्रशाळांमधून सुमारे चाळीस आदिवासी विद्यार्थी असून त्यांतल्या बहुसंख्य विद्यार्थिनी आहेत.

हा प्रवास सुखाचा नव्हता. बोर्डीला भंग्यांची मुलं येतात म्हणून महारांची येईनात आणि दोन्ही येतात म्हणून सवर्णांची गैरहजर! एकदा शाळेची संख्या शून्य. याचा शेलतभाईंनी जो धसका घेतला त्यातून ते उठलेच नाहीत. मुलं आकृष्ट व्हावीत म्हणून एखाद्या दिवशी शेलतभाई 'पाईड पायपर'सारखा पोषाख करून पुंगी वाजवीत गावातून हिंडत तर एखाद्या दिवशी अनुताई टाळ-मृदंग घेऊन "रघुपति राघव राजाराम"च्या गजरात दिंडी काढीत. मुलांना शाळेपर्यंत आणण्यासाठी बैलगाडीतून मिरवणुकी. मुलं येत नाहीत तर आपणच मुलांकडं जायचं आणि मग वस्तीतच झाडाखाली 'अंगणवाडी'.

ह्या भागातलं खरं शिक्षण मुलांना 'माणसा'त आणायचंच होतं. अनुताईंनी मुलांना आंघोळी घातल्या, मुलींच्या डोक्यातल्या उवा काढल्या, खरजेला औषधं लावली, संडास तयार करून त्याचा वापर कसा करायचा याचं एका लहान मुलाकडून प्रात्यक्षिकही करवून घेतलं. एका बालसेविकेला लिहिलेल्या पत्रात त्यांनी म्हटलं आहे, "लहान मुलांचे अंग ओल्या फडक्याने रोज पुसून काढते. कधीकधी त्यांना नदीवर घेऊन जाते. नाहीतर तळ्याचं पाणी गाळून आणून मडक्यात थोडे गरम करून आंघोळ घालते...(खरजेसाठी) लिंबाचे औषध मात्र रोज लावते...शिपीचंद मुलींच्या डोक्यात घालून ठेवते आणि तासा-दोन तासांनी सगळ्यांची डोकी धुवून काढते. कधी कधी तंबाखूचे पाणी पण घालते. मढीला गेले होते, तेथून उवांसाठी एक औषध शिकून आले..."

वैयक्तिक आयुष्यात मातृत्व तर सोडाच पण विवाहितेचे सौभाग्यही क्षणिकच लाभलेल्या अनुताईंच्या वात्सल्यानं सर्व दलितांच्या मुलांनाच आपल्या कवेत घेतलं होतं. अनुताई पत्रात लिहितात, "हल्ली एक नवेच संकट आमच्या बालवाडीवर आले आहे. सगळी मुले मलेरियाने आजारी पडली आहेत...त्यातल्या त्यात आमची सोमली तर खूप आजारी झाली आहे. अगदी उठत नाही, बसत नाही, की वर डोळा करत नाही. मी वैद्यांना घेऊन आले. त्यांनी सांगितलेलं औषध मी स्वतःच देत असते. आता तर जवळजवळ दिवसभर तिच्याच घरी मुक्काम आहे."

शिक्षणकार्यातली ही अनुताईंची सर्वात प्रभावी ठरलेली **'मेथड'**. हिच्याशिवाय ह्या भागात किती काम झालं असतं कुणास ठाऊक!



ग्रामीण भागातली शिक्षणसाधनं कमी खर्चाची असायला हवीत असा ताराबाईंचा आग्रह असे. १९४६ साली पाड्यावरची बालवाडी चालवण्यासाठी अनुताईंचा मासिक अर्थसंकल्प तीन रुपयांचा असे. मग अनुताई भिंतीवर कोळशानं अक्षरं लिहीत. अशा अडचणींतून मार्ग काढीत निसर्गातूनच जमविलेल्या किंवा परिष्कृत केलेल्या साधनांचं एक अपूर्व जगच ताराबाई आणि अनुताई यांनी निर्माण केलं. झाडं, पानं, फुलं, सुरूची फळं, गुंजा, शंख, शिंपले, रेती—हे सर्व कामाला आलं. स्थानिक कुंभारांची माती गाळण्याची पद्धत शिकून अमलात आणली गेली. बांबूचे तट्टे शेणानं सारवून त्यांची कॅन्व्हसेस करण्यात आली. गेरू, चुनखडी, पिवळी माती यांचा उपयोग रंगकामासाठी होऊ लागला. वडाच्या कोवळ्या पारंब्या ठेचून त्यांचे ब्रश तयार केले गेले. गरजेतून आणि कल्पकतेतून केवढीतरी 'ॲप्रोप्रिएट टेक्नॉलजी' तयार झाली.

कोसबाडचे वारली म्हणजे अभिजात आदिवासी. त्यांच्या मुलांना पकडणं म्हणजे मुठीत वारा पकडण्यासारखं होतं. प्रचंड खडकासमोर उभं राहून आपण त्याला साद घातली म्हणजे आपले हताश शब्द तेवढे आपल्याकडं परत येतात; खडकावर त्यांचा काही परिणाम होत नाही. इथली परिस्थिती अशीच दुस्तर होती.

शिक्षणापासून वंचित असलेल्या, एवढंच नव्हे तर त्याच्याशी शत्रुत्व करणाऱ्या या मुलांना आपण 'शिकत' आहोत असं वाटू न देता ते त्यांच्या गळी उतरवण्याचा हा लोकविलक्षण खटाटोप होता. अनुताईंचा 'अनौपचारिक' अभ्यासक्रम गाणी, गप्पा, खेळ, ओढ्यात आंघोळी, फुलं जमा करणं, मारलेला साप अस्थिपंजर झाला म्हणजे त्याचं निरीक्षण करणं, एकाच वेळी दगड आणि चिंचोका जमिनीत पुरून त्यापैकी कशात जीव आहे हे ठरवणं, ओहोळावरून उडी मारण्याच्या खेळात काठीनं त्याची लांबी मोजणं, झाडाच्या सावलीची रेषा बदलताना तीवर तासातासानं खुणेचा दगड ठेवणं, भाजलेल्या पाखराच्या मांसाचा तुकडा डाळीएवढा पदरात पडला तरी सगळ्यांनी वाटून खाणं, बकरीचं मोठ्या समारंभानं नाव ठेवणं—इत्यादी मजेदार गोष्टींतून फुलत गेला आणि सृष्टिज्ञान, भूगोल, जीवशास्त्र, वनस्पतिशास्त्र, अंकगणित, कालमापन, स्वच्छता, सहकार इत्यादींचे धडे मुलांना आपोआप मिळत गेले. "शाळा म्हणजे मुलांच्या अंगणातलं झाड झालं पाहिजे" ह्या साध्या शब्दांत अनुताईंनी आपल्या शैक्षणिक पद्धतीमागचं तत्त्वज्ञान साररूपानं सांगितलं आहे. "गाण्याचं झाड झालं पाहिजे" असं महाराष्ट्राचे आद्य ख्यालिये बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर म्हणत. त्यांच्या नंतर झाडाची इतकी सार्थ उपमा देणाऱ्या दुसऱ्या अनुताईच असाव्यात!

ताराबाई-अनुताई यांचं ग्राम बाल शिक्षा केंद्र आणि शेजारची जयंतराव पाटील यांची कृषि शिक्षण संस्था यांच्या अनुक्रमे तेवीस आणि एकतीस वर्षांच्या अविरत

प्रयत्नांनंतर कोसबाड भागातला वारली खडबडून जागा झाला आहे असं कुणाला वाटलं तर ते चुकीचं ठरेल. झालं आहे ते इतकंच की नव्या जीवनाचे काही अंकुर डोलू लागले आहेत—ज्यांत आजपर्यंतच्या श्रमाची पावती आणि उद्याबद्दलच्या आशेचा विसार आहे. यापलीकडची जादू घडून आलेली नाही. याचं कारण, आपल्याला कल्पनाही करता येणार नाही इतकी आदिवासी समस्या मुळात कठीण आहे. त्यांची पारंपरिक संस्कृती व जीवनसरणी आणि आधुनिक काळात त्यांच्यावर झालेले अत्याचार व त्यांचं शोषण यांचं असं काही भयानक रसायन त्यांच्या हाडांत मुरलं आहे की सर्वसामान्यपणे अपेक्षाव्या अशा मानवी प्रेरणाच त्यांच्यात अस्तित्वात आहेत की नाहीत अशी शंका यावी. शिवाय असं की स्वयंस्फूर्त संस्थांच्या कामाला पूरक असं भोवतालचं, मुख्यतः शासकीय प्रयत्नांचं, वातावरण नसेल तर ते काम म्हणजे पाण्यावरच्या रेषा ठरतात; ह्या दुसऱ्या बाबतीत तर एकूण आनंदच आहे!

ताराबाई-अनुताईंचं काम पायाभरणी करणारांचं होतं. त्यांना मिळालेलं यश चिमूटभर आहे असं कोणी म्हणेल. पण शिवाजीचं राज्यही चिमूटभरच नव्हतं का? तरीही त्याच्या कार्याचं "केवळ नूतन सृष्टीच निर्माण केली" असं मार्मिक मूल्यमापन अमात्यांनी केलं आणि आजचा इतिहासज्ञही हा अभिप्राय शिरोधार्य मानतो. जिथं काहीच नव्हतं अशा बरड माळावर आठशे आदिवासी मुलांच्या शिक्षणाची बागशाही फुलवणं म्हणजे नूतन सृष्टी निर्माण करण्यासारखंच आहे.

अनुताईंच्या शैक्षणिक पद्धती त्यांनी कुठल्याही पुस्तकातून उचलल्या नाहीत. त्या त्यांच्या आंतरिक उमाळ्यातून स्वाभाविकपणे फुलल्या. आपण आपल्या मुलांना कौतुकानं नावं ठेवतो आणि आपल्या नावांचा अभिमान वाहतो. आदिवासींमध्ये ही आत्मगौरवाची भावना नाही. पतल्या, बारक्या, रडक्या, (नवसाने झालेले म्हणून) नवशा किंवा नवशी, (सोमवारी झाली म्हणून) सोमली—अशी त्यांची नावं असतात. ह्या मुलांची आत्मप्रतिष्ठा जोपासली जावी म्हणून बालवाडीत त्यांची बारशी आणि वाढदिवस साजरे होऊ लागले.

मुलांत कार्य करायचं म्हणजे मुलांच्या आईबापांमध्ये विश्वास निर्माण करायला पाहिजे. शेकडो वर्षांच्या शोषणानं वारल्यांचा इतरांवरचा विश्वासच उडालेला आहे. कुणी आपलं काही बरं करायला आलेला आहे अशी त्यांची वर्षानुवर्षं खात्री पटत नाही. हा विश्वास कमावण्यासाठी अनुताईंनी सुरुवातीच्या काळात पन्नास वारली बायकांकडं जेवणाची आमंत्रणं लावली आणि या सर्व पन्नास जणींना त्यांच्या मुला-बाळांसह कोसबाड टेकडीवर बोलावून परतवाण दिलं.

बालशिक्षणाचा संदेश ज्या ज्या मार्गांनी आणि ज्या ज्या दिशांनी पोचविता येईल ते ते मार्ग आणि दिशा त्यांनी चोखाळल्या. डहाणू भागातच महालक्ष्मी म्हणून



एक स्थान आहे. तिथल्या जत्रेला हजारो स्त्रीपुरुष येतात. पोरंबाळं कडेखांद्यावर असतात आणि बायाबापड्या तासन्तास उन्हातान्हात तारतळत असतात. ह्यांची मुलं आपण संभाळली तर? कल्पना येताच बेत ठरला आणि एक जागा घेऊन तिथं पंधरा दिवसांसाठी पाळणाघर आणि बालवाडी उभारण्यात आली. मुलं दिसली की अनुताई फुलतात आणि त्यांच्यात मानव्याची ज्योत त्या फुलवू बघतात. ह्यावाचून त्यांना चैनच पडत नाही. एकदा कृष्णाबाई मोटे म्हणाल्या होत्या, "आमच्या अनुताई आगगाडीत बसल्या तरी बालवाडी चालवतील."

अनुताई बालवाडीसाठीच जन्माला आल्या आहेत. त्यांना स्वतःचा संसार नाही. भाऊ दोन वर्षांपूर्वीच काळानं ओढून नेला. त्या वेळी अनुताईंनी लिहिलं, "ही जखम कधी न बुजणारी आहे." पण स्वतःच्या संसाराला आचवलेल्या अनुताईंनी हजारो नागड्या-उघड्या आणि कंगाल आदिवासी मुलांवर मायेची पाखर घातली आणि त्यांच्या धर्ममातेचं काम केलं.

ह्या सर्व प्रयत्नांचं फलित जोखण्याचा प्रयत्न मी आणि माझ्या सहकाऱ्यांनी इतरत्र केला आहे. पण अनुताईंना स्वतःला भावलेला बदल त्या ज्या शब्दांत व्यक्त करतात ते अत्यंत अर्थघन आहेत. अनुताई प्रथम कोसबाडला आल्या तेव्हा त्यांना वारली मुलांचे चेहरे "खिचडीच्या मुदी"सारखे दिसायचे, आता ते तसे दिसत नाहीत. याचा अर्थ असा की निराकाराला आकार येऊ लागला आहे; निर्विकार संवेदनाहीन चेहरे विकार दाखवू लागले आहेत; ताराबाई ज्याला "ओसाड मानवी भूभाग" म्हणत त्यात मानव्याची उपजणी होऊ लागली आहे.

तशा अनुताई आता तृप्त आहेत. आपण लावलेल्या बीजाचं रोपटं अंकुरून वर येण्यात जी तृप्ती आहे ती त्यांना मिळाली आहे. अनुताईंना राष्ट्रीय प्रसिद्धी आणि अनेक सन्मान मिळालेले आहेत. त्यांच्या प्रयोगांकडं जाणत्यांचं लक्ष गेलेलं आहे. फिलिप कूम्ब्ज या अमेरिकन अनौपचारिक शिक्षणातल्या अधिकारी व्यक्तीच्या आधि-पत्याखालील 'इंटरनॅशनल कौन्सिल फॉर एज्युकेशनल डेव्हलपमेंट' या संस्थेनं मी आणि माझे दोन मित्र वसंत देशपांडे व शरद कुलकर्णी यांच्याकडून अनुताईंच्या संस्थेचा (व जयंतराव पाटील यांच्या कृषि शिक्षण संस्थेचा) अभ्यास करवून घेतला आणि 'Working With Tribal People : The Institutes at Kosbad Hill' या नावाचं पुस्तक प्रसिद्ध केलं आहे. (याच सामग्रीवर आधारलेला एक लेख आम्ही मौज दिवाळी १९७८ च्या अंकात 'कोसबाड आणि आसपास' या शीर्षका-खाली प्रसिद्ध केला आहे.) शिक्षणतज्ज्ञ डॉ० चित्रा नाईक यांनी 'Growing up at Kosbad Hill' या नावाचे पुस्तक नुकतेच प्रसिद्ध केले आहे.

पण अनुताईंनी खरं जे मिळवलेलं आहे ते याच्यापेक्षा वरच्या प्रतीचं आत्मिक समाधान देणारं आहे. मी व माझे मित्र प्रा० वसंत देशपांडे एकदा एका मोठ्या

भाग्याचे धनी झालो. अनुताईंच्यासह आम्ही एकदा बोर्डी, दरजीवाडी, डोंगरीपाडा, मानकरपाडा, चिंबावे वगैरे ठिकाणांची सहल केली. त्या वेळची दृश्यं आमच्या मनात अजून तरळतात आणि त्या आठवणी मनःसंपुटात साठवून त्यांच्या भोवती मनाला रुंजी घालू द्यावं असं पुनःपुन्हा वाटतं.

बोर्डी ही कोसबाडला विस्तारलेल्या प्रवाहाची गंगोत्री. पस्तीस वर्षांपूर्वी जिथं अनुताईंनी प्रवेश केला ते स्थान आमच्या दृष्टीनं केवळ पवित्र होतं.

भंगीवाडीजवळच्या ज्या घरात शाळा सुरू झाली होती तिथं अनुताईंच्या सगळ्या जुन्या स्मृती जागृत झाल्या. त्या जागेत आता एक गुजराती कुटुंब राहतं पण ते जवळजवळ सगळं विसरून अनुताई पुन्हा परितशीच्या झाल्या आणि ह्या खोलीतून त्या खोलीत हिंडू लागल्या. "इथं ताराबाई राहायच्या. इथं मी. हा जो ओटा दिसतोय ना, तो मी बांधला. इथं पाण्याची टाकी होती ती आता गेलेली दिसतेय. ही पाहा ह्या जागेवरून मी समुद्राकडे पाहत उभी राह्यची. मी देशावरची, समुद्र पहिल्यांदा बोर्डीला आल्यावर पाह्यला. त्याची मला फार मजा वाटायची. हा पाहा हॉल. इथं आता भाताचा पेंढा भरलाय, तिथं आमची बाळवाडी भरायची. ही पाहा विहीर. इथंच भंगीण पाणी काढते म्हणून महारांची मुलं यायची थांबली." एक ना अनेक आठवणी अनुताईंच्या मनात गर्दी करतात.

आम्ही जीपनं परतताना एका वळणावर ती थांबते. एका सोप्यावर मुलांशी खेळत बसलेला माणूस एकदम तीरासारखा उठतो आणि चीत्कारतो, "आये, अनुताई आल्यात!" ती हाक 'आये'शिवाय इतर अनेकांना ऐकू जाते आणि त्या वस्तीत वीज संचारते. मोटारीभोवती हा गराडा पडतो. बायाबापड्या, मुलं, पुरुष सगळी जमतात. एक म्हातारी धळाधळा रडते, अनुताईंच्या चेहऱ्यावरून हात फिरवते, बोटं कडाकडा मोडते. तिचा मुलगा येतो, सून येते. तिच्या हातातल्या नातवंडावरून अनुताईंचा हात फिरतो. चेहरे ओळखतात, नावं आठवायला लागतात. तू हा, तू तो. अमुक कुठं आहे? तमक्याचं कसं चाललंय? म्हातारीच्या डोळ्यांतल्या पाण्याला अजून खळ नाही! अनुताई तिच्या पाठीवरून हात फिरवीत तिला समजावतात. पुनःपुन्हा निरोपाची बोलणी होतात. अनूताई, तू कधी आहेस? पुन्हा केव्हा येशील?...त्या दहापंधरा मिनिटांत

मात्र सुवर्णक्षणि त्या एका
उजळुन गेले अवघे जीवन
शतजन्मांतिल पुण्यपयाचा
सेक जाहला वा स्वर्गातुन

अशी आमची स्थिती झाली. ज्यांना आपंगिता नव्हता त्यांना तीस वर्षांपूर्वी अनसूया



नावाच्या लांबून आलेल्या एका परक्या बाईनं हृदयी धरलं होतं आणि त्यांची कृतज्ञता त्यांच्या डोळ्यांवाटं दुथडी भरून वाहत होती. ह्या दृश्याचे आम्ही साक्षी होतो, हे आमचं भाग्य आम्हांला विसरता येणार नाही!

तिथून बोर्डीच्या बाहेरची दरजीवाडी, जिथं दुबळ्या मुलांसाठी अनुताईंनी पहिली बालवाडी चालवली. त्याच घराच्या भिंतीवर अनुताईंनी कोळशानं लिहिलेली अक्षरं आणि त्यांच्या कर्तृत्वाचा सगळाच इतिहास पुसून गेला आहे. कारण कोसबाडला प्रस्थान ठेवल्यावर ज्याच्यावर अनुताईंनी ममता केली त्या सोमलीसारख्या मुली पुन्हा एकदा अंधकारात निमग्न झाल्या असणार. पण दरजीवाडी म्हणजे विकासवाडीचं जन्मस्थळ. रस्ता कठीण असल्यानं आम्ही परत येईपर्यंत अनुताई मोटारीतच बसून होत्या, दरजीवाडीकडं डोळे लावून मागचा इतिहास आठवीत.

तिथून कोसबाडजवळचा मानकरपाडा. हा परिसर अनुताईंच्या पहिल्या कुरण-शाळेचा. हा तो ओहोळ, जिथं मुलांनी गाईला पण लांब उडी मारायला लावली.

मग डोंगरीपाडा. अनुताईंनी लहानपणापासून संभाळलेल्या आणि प्रशिक्षित झालेल्या ताया आणि सुंदर वाढाण या दोन वारली मुलींपैकी ताया स्वतः ही बालवाडी चालवते.

आम्ही मुलांचे खेळ पाहतो. लक्तरातली मुलं रंगण धरतात. गांधीलमाशी कानाला चावल्याचा खेळ होतो. मग "चल रे भोपळ्या टुणुक टुणुक" हे नाट्यगीत होतं. ते फारच रंगतं. गोष्टीतली म्हातारी म्हणते, मुलीच्या घरी जाईन, लठ्ठमुठ्ठ होईन. अनुताई म्हणतात, "ताया, तुझी बालवाडी पाहून मी म्हातारी मात्र लठ्ठमुठ्ठ झाले हो!" अनुताईंचा प्रकाशमान झालेला चेहरा पाहून एका उदात्त भावनेनं आमचीही अंतःकरणं उजळल्यासारखं आम्हांला वाटलं.

ही तृप्ती अनुताईंना आहे ते योग्यच आहे. अतृप्त असायचं ते आपण. आणि काय करायचं असतं याचा काहीसा अंदाज येण्यासाठी अनुताईंची एखादी नवी बालवाडी साकार होत असताना कशी दिसते हे पाहायला पाहिजे.

हे दृश्य एकाच वेळी उदात्त आणि उद्वेजक भासतं. हातापायांच्या काड्या आणि पोटांचे नगारे झालेली कितीतरी मुलं. मुलं आणि मुली दोघंही लंगोट्या लावलेली, कदाचित वर एखादं घाणेरडं कुडतं. अनेक दिवसांत आंघोळ अशक्य. मुलांची ओघळणारी नाकं पुसता-पुसता शिकवणाऱ्या 'तायां'ची पुरेवाट होत असते. आणि, बाप रे! ती खरूज! अंग खाजवता-खाजवता वेड लागेल अशी खरूज! साठसत्तर, क्वचित ऐंशी टक्के मुलांची अंगं खरजेनं लडबडलेली असतात. कित्येकांची आपाद-मस्तकं. ह्याचं कारण पोटात जवळ-जवळ काही नसतं, कधीकधी दिवसांमागून दिवस नसतं. सरकारी मदतीतला दर मुलांमागं वीस पैशांचा खाऊ आणि त्याच्या जोडीला

अनुताई आणि त्यांचे सहकारी जमा करीत असलेल्या देणग्यांमधून निष्पन्न होणारी एखादी उसळ यांचा छोटासा हविर्भाग या भुकेच्या यज्ञकुंडात पडत असतो, पण त्यामुळं तो वणवा अधिकच प्रदीप्त होतो की काय असं वाटतं. काही मुलं तर खाऊच्या वेळीच येतात. पण मुलं भुकेली आहेत कारण त्यांचे आईबाप भुकेले आहेत. मानकरपाड्यावरच्या बालवाडीवर मुलांच्या खाऊच्या वेळी एक जख्ख म्हातारी काठी टेकीत टेकीत आपलाही वाडगा घेऊन येते आणि मुलांत बसून उसळीचे चार दाणे खाऊन जाते. तिला "येऊ नको" म्हणून सांगायला अनुताईंची जीभ रेटत नाही.

पण हीच मुलं एकत्र येतात, खेळ खेळतात, खेळता-खेळता शिकतात, शिकता-शिकता खेळतात. त्यांचा पायरव हा नव्या मानवत्वाच्या आगमनाचा पहिला पायरव आहे असं तुम्हांला वाटत असतं.

मुलं किती भान हरपून खेळतायत बघा. निदान आता तरी त्यांच्या पोटातले कावळे शांत आहेत. एखाद्यानं फारच कंजूषगिरी करून, "ह्या मुलांच्या एरवीच्या दारुण जीवनात चार आनंदाचे क्षण अनुताईंनी निर्माण केले" एवढंच श्रेय त्यांना द्यायचं ठरवलं, तरी गेली तेवीस वर्षे हजारो अभागी पोराबाळांना कोसबाडच्या टेकडीवर बसून दोन्ही हातांनी हा आनंद भरभरून वाटणाऱ्या अनुताईंच्या एका हयातीच्या सार्थक्याचं माप ओसंडून वाहिलेलं आहे हे त्याला मान्य करावं लागेल.

अशा अनुताईंचा विचार मनात आला की वाटतं की त्या म्हणजे आधुनिक युगातला 'जिवती'चाच अवतार आहे.

संस्कृतिकोशात 'जीवंतिका' (प्राकृत 'जिवती') या व्रताविषयी लिहिलं आहे : "या व्रताची देवता ही बालसंरक्षक देवी आहे...सांप्रत जिवतीचे छापील रंगीत चित्र भिंतीवर लावून त्याची पूजा करायची पद्धत आहे. भोवती मुलांचा मेळा, त्यांची पसरलेली खेळणी आणि एखादे मूल पाळण्यात असे ते चित्र काढलेले असते."

ह्या चित्रात आपल्या काळाचा शैक्षणिक हेतू प्रविष्ट करून दिला की अनुताईंचं चित्र पूर्ण होतं! बाकीचा बालवाडी, खेळणी, पाळणाघर, हा तपशील त्यात आहेच.

फरक इतकाच की जिवतीच्या चित्रातली मुलं धष्टपुष्ट, कमरेला करगोटे बांधलेली आणि गळ्यात कंठे घातलेली, दृष्ट लागावी अशी सुखी मुलं आहेत. बोर्डीला अनुताईंची बालवाडी महार, भंगी यांच्यातून सुरू झाली आणि कोसबाडला सर्वात उपेक्षित, कदाचित सर्वात गरीब आणि सर्वात दीनवाण्या अशा आदिवासी मुलांच्यात फुलली.

आपली अतृप्ती कार्यप्रवण व्हायची असेल तर सत्तरी ओलांडलेल्या अनुताईंना वंदन करून त्यांच्यापासून स्फूर्ती घेतली पाहिजे. ते वंदन जीवंतिकेच्या व्रताच्या



समाप्तीच्या वेळी म्हणायच्या श्लोकानं केलेलंच उचित होईल.

जरे जीवन्तिके देवि बालयुक्ते प्रमोदिनि।
रक्षाव्रते महाशक्ति पूर्णकामे नमोऽस्तुते ॥

हे बालगोपाळांनी वेढलेल्या, आनंददायिनी, बालकांचे रक्षण करण्याचे व्रत घेतलेल्या, महाशक्तीचेच रूप असलेल्या आणि जिच्या सर्व इच्छा तृप्त झाल्या आहेत अशा वृद्ध जीवंतिके देवी, तुला नमन असो.

# माझी माणसे—माझी घडण

१७ मार्च १९१० !

पुणे येथे एका गरीब कुटुंबात माझा जन्म झाला.

१८ मार्च १९८० !

भारत सरकारच्या समाज कल्याण मंत्रालयातर्फे भारताचे उपराष्ट्रपती श्री० हिदायतुल्ला यांच्या शुभहस्ते मला माझ्या बालकल्याण कार्यासाठी राष्ट्रीय पारितोषिक म्हणून वीस हजार रुपयांचे रोख पारितोषिक देण्यात आले! दिल्लीत बोलावून माझ्या कार्याचा गौरव करण्यात आला!

हा गौरव स्वीकारताना, 'इदं न मम' या भावनेनेच मी तो स्वीकारला आहे. ज्या माझ्या ताराताई मोडकांनी मला सर्व प्रकारे घडविले, त्या माझ्या ताईंचा आणि त्यांच्या कार्याचाच हा गौरव आहे.

३० ऑगस्ट १९७३ ची दुपार मला आठवते. पू० ताराताईंचा जीव अखेरची लढाई देत होता. उलघाल होत होती. त्या वेळी त्यांच्या छातीवर हात ठेवून मी म्हटले, "ताई, स्वस्थ असा. संस्थेचे काम मी मागे पडू देणार नाही. तुमचे आशीर्वाद आणि सामर्थ्य मला द्या." त्या क्षणी एक स्फुलिंग त्यांच्या शरीरातून निघून माझ्या शरीरात शिरल्याचा मला भास झाला. माझे अंग थरारले. ताई स्वस्थ झाल्या.

आपली सर्व प्रेरणा, दुर्दम्य शक्ती आणि आत्मविश्वास माझ्यामध्ये ओतून ताई सात वर्षांपूर्वी संस्थेचा भार माझ्या माथी सोपवून निघून गेल्या!





## सरदारकीचा वारसा

आज मी केवळ गेल्या सात वर्षांचाच विचार करीत नाही. गेल्या सत्तर वर्षांचा विचार करीत आहे.

काय घडले? कसे घडले? व्यक्तीच्या दृष्टीने प्रदीर्घ अशा काहीशा माझ्या आयुष्यात गौरव करावा असे काही खरोखरच घडले आहे का? असे प्रश्न मला सतावतात. माझे मन मला विचारते, घडलेच असल्यास त्यात कुणाकुणाचा कसाकसा हातभार लागला आहे?

आयुष्यात असा केव्हातरी काळ येतो की, मागे वळून पाहावेसे वाटते. असे पाहू लागले की खूप आठवते. अगदी दूरवरचेही अनपेक्षितपणे स्पष्ट दिसायला लागतं. मोतीबिंदूंनी अधू, निकामी केलेल्या माझ्या डोळ्यालाही दृष्टी येते. प्रसंग, आठवणी, व्यक्ती डोळ्यासमोर उभ्या राहतात. त्या आठवणींना तसा क्रम नसतो.

जे जसे घडले, आठवले, दिसले, तसे दाखविण्याचा माझा प्रामाणिक प्रयत्न आहे. या सांगण्यात यत्किंचितही आत्मप्रौढी करण्याची इच्छा नाही. क्वचित वा काही वेळा पुनरावृत्तीने एखाद्या व्यक्तीचा, प्रसंगाचा वा घटनेचा उल्लेख येण्याची शक्यता आहे. पण वेगवेगळ्या संदर्भात वेगवेगळा अर्थ घेऊन आल्यामुळे ती पुनरावृत्ती मला पत्करावी लागेलही.

माझ्या दृष्टीसमोर आता असंख्य प्रसंग आहेत. शक्यतो त्यांची जुळणी करून ते सांगण्याची माझी इच्छा आहे. पण त्या जुळणीत क्रम साधेल किंवा नाही, अशी शंका वाटते. कारण, माझ्या डोळ्याच्या अधूपणाचा मी उल्लेख केला आणि मला वीस वर्षांपूर्वीचा प्रसंग आठवला.

कोसबाडला आल्यावर काम करताना मी बी० ए० नसल्याची उणीव वारंवार भासू लागली. तेव्हा मी बाहेरून परीक्षेस बसून बी० ए० व्हावे, असे ताईंनी सुचविले. माझ्या अभ्यासाकडे त्या जातीने लक्ष देत. शेवटच्या वर्षी माझ्या दोन्ही डोळ्यांत मोतीबिंदू आले. औषधाचा उपयोग नव्हता. मोतीबिंदू वाढत होते. माझा अभ्यासही वाढत होता. ताई माझ्यासाठी पुस्तके वाचून नोट्सही काढायच्या. मला वाचून दाखवायच्या. सकाळी उठून इंग्लिश शुद्धलेखन घालायच्या. स्पेलिंगच्या चुका दहा दहा वेळा लिहून काढाव्या लागत असत. संस्थेचे कार्यकर्ते वेळ मिळेल त्याप्रमाणे निरनिराळे विषय मला वाचून दाखवायचे. त्यामध्ये इंग्लिशच्या बाबतीत श्री० अप्पा कोसके यांचा वाटा मोठा आहे. (अप्पा आज कोसबाडच्या ग्राम बाल शिक्षा केंद्राचे उपसंचालक आहेत.) ते नंतर एक महिना माझ्याबरोबर मुंबईच्या शिशुविहार संस्थेत येऊन राहिले होते. सर्वच विषयांची माझी तयारी करून घेत होते. आमचे हे एका विद्यार्थिनीचे महाविद्यालय होते : ताई प्राचार्या आणि सर्व कार्यकर्ते प्रोफेसर; मी एकटी विद्यार्थिनी!

बी० ए० च्या परीक्षेला जाताना ताराताईंनी मला निरोप दिला आणि आमच्या सर्व 'प्रोफेसरांना' शिरा-बटाटेवड्याची मेजवानी दिली.

माझ्या डोळ्यांत मोतीबिंदू वाढतच होते. परीक्षेचे पेपर्स कसे लिहून होतील याची काळजी वाटत होती. डॉक्टरांनी एक औषध दिले होते. परीक्षेस जाताना फक्त एक थेंब डोळ्यात टाकायचा. तोही एकदाच. कारण औषध फार कडक होते. पहिला पेपर चांगला लिहून होत असे. दुपारच्या पेपरला अंधेरी येत होती.

पेपर लिहिताना, लिहिलेले पुन्हा वाचायचे नाही, लिहीत सुटायचे, असा धडाका होता.

अप्पांची चिकाटी खूप होती! अगदी परीक्षेच्या दालनात मी शिरत असताना म्हणाले,

"थोडा अवकाश आहे. थांबा ना, एवढी कविता ऐकून जा."

आणि काय योगायोग—तीच कविता नेमकी परीक्षेत आली होती!

श्रीमती मालिनी रेगे या शिशुविहारच्या कार्यकर्त्या भगिनी. त्यांच्या नातेवाइकांकडे मधल्या वेळी राहण्याची माझी व्यवस्था केलेली होती. ते ठिकाण परीक्षेच्या जागेपासून फार जवळ होते. त्यांच्या घरची मंडळी फार आस्थेवाईकपणे, माझ्या डोळ्याला त्रास होऊ नये म्हणून, शांत अंधारी खोली करून द्यायची. मला फराळाचेही द्यायची.

शेवटी एकदाची परीक्षा पार पडली. ताराताईंनी पास क्लासमध्ये माझा नंबर नाही हे पाहून मी नापास झाले, असे प्रथम गृहीत धरले! दिसत नसल्याने अंदाजाने लिहिताना ओळीवर ओळ लिहिल्याने मी नापास झाले, असे त्यांना वाटल्याचे त्यांनी मला सांगितले.

परंतु माझा नंबर दुसऱ्या वर्गात आल्याचे पाहून त्यांना धक्का बसला!

अधू डोळ्याने मी वयाच्या एकावन्नाव्या वर्षी बी० ए० झाल्याने ताराताईंचा आनंद शीगेला पोहोचला होता!

पुढे माझे डोळ्याचे दुखणे वाढतच गेले. दोनही डोळ्यांतल्या मोतीबिंदूंची ऑपरेशन्स झाली. दोनपैकी एक डोळा बिघडला. वर्षभर डोळ्यात इंजेक्शन्स घेत ते दुखणे मी सोसत होते. शेवटी एक डोळा काढून टाकावा लागला.

या सगळ्या दुखण्यात आणि ऑपरेशनच्या वेळी ताराताईंनी माझी काळजी फार घेतली. माझ्याबरोबर दहा-बारा दिवस त्या नर्सिंग होममध्ये राहत असत.

ताईंच्या ओळखीमुळे आणि नंतर माझ्याविषयीच्या सहानुभूतीमुळे त्या वेळचे सुप्रसिद्ध नेत्रविशारद डॉ० चिटणीस यांनी माझी ऑपरेशन्स विनामूल्य केली. मला त्यांनी मोठ्या भावाचे प्रेमही दिले.

ताईंनी मला कसे घडविले हे मी योग्य वेळी तपशिलाने सांगेनच. पण ताई मला नेहमी "सरदारीण" असे गंमतीने म्हणत असत, त्याची आठवण येते.



संस्थेसाठी विशिष्ट फंडाची रक्कम वा देणगी मी मिळवलीच पाहिजे, असा त्यांचा आदेश असायचा. देणगी मागायला मला संकोच वाटायचा. माझ्या स्वभावाची ती मर्यादा होती. ताईंच्या आदेशाचे पालन मी तरीही करीत असे.

पण ताई मला "सरदारीण" म्हणत, त्याचे एक वेगळे कारण होते.

माझे आजोळ हे पेशवेकालीन तोफखानेवाले सरदार पानसे यांचे घराण्यातले!

माझे माहेर हे पेशवेकालीन जामदारखानेवाले सरदार वाघ घराण्यातले!

दोनही बाजूंनी मला सरदारकीचा वारसा प्राप्त झालेला आहे. सरदारकीचा पैसा आमच्या घराण्यात मी पाहिलेला नाही; ऐकलेला आहे. पेशवाई बुडाल्यावर इंग्रज सरकारने आमच्या पूर्वजांना गाढवावर गोणी भरून पैसा दिला, अशी आख्यायिका मी ऐकली आहे! पण मी जन्माला येण्यापूर्वी कितीतरी वर्षे अगोदर पैशाचा वारसा संपलेला होता.

माझा जन्म गरिबीतच झाला. पण सरदारकीचा, खानदानी गुणांचा वारसा मात्र आम्हा भावंडांना आमच्या आईवडिलांकडून मिळाला!

## आम्ही वाघ कसे झालो?

आमचे आडनाव शाळिग्राम. पण ते जाऊन आता आम्ही 'वाघ' झालो आहोत. त्या संबंधातील एक आख्यायिका मोठी गमतीची आहे. आमच्या आठ-दहा पिढ्यांच्या मागचा काळ असावा. त्या वेळी घरात मिणमिणत्या चिमण्या किंवा समयाच असायच्या. घरातील वृद्ध मंडळी सकाळीच आपल्या बिछान्यात बसून भूपाळ्या म्हणणे, जप करणे वगैरे करायची. सासुरवाशिणी पहाटे उठून दळणे, सडासंमार्जन करणे, झाडझूड करणे वगैरे कामाला लागायच्या. त्या काळातील ही गोष्ट.

मोरगाव हे आमचे गाव. तेथे आमचा वाडा अगदी नदीच्या जवळ आहे. त्यात शाळिग्राम कुटुंब राहत असे. एक आजोबा, त्यांचा मुलगा, सून, आणि छोटा पाच-सहा महिन्यांचा नातू असे ते कुटुंब होते. सूनबाईला रोज पहाटे उठून कामाला लागावे लागे. पण बाळ त्याच वेळी जागा व्हायचा. खेळू लागायचा, नाहीतर रडायचा. आईला सोडायचाच नाही. मग आजोबा म्हणायचे, "सूनबाई, बाळाला दे इकडे. मी संभाळतो!" सूनबाई बाळाला मामंजींच्या स्वाधीन करायची. कामाला लागायची. असा होता रोजचा परिपाठ.

एकदा काय झाले, आजोबा पहाटेच उठून बहिर्दिशेस गेले. सूनबाईने आपल्या नित्यनियमाप्रमाणे बाळाला आजोबांच्या बिछान्यात ठेवून दिले. "मामंजी, बाळाला ठेवलंय हं" असे सांगून ती कामाला निघून गेली. दिवा नव्हता, त्यामुळे मामंजी तेथे नाहीत हे तिला कळलेच नाही!

थोड्या वेळाने आजोबा मागील अंगणात हातपाय धुवायला आले. पाहिले तर सूनबाई कामाला लागलेली! त्यांनी विचारले,

"बाळ कुठंय? झोपलाय का?"

सूनबाई मामंजींकडे पाहतच राहिली! तिने विचारले,

"बाळाला मी तुमच्याकडे दिलंय ना?"

"छे, मी तर बाहेर गेलो होतो!"

मग सासरा-सून दोघांनी मिळून दाराच्या फटीतून डोकावून आत पाहिले. तर काय, आजोबांच्या गादीवर प्रत्यक्ष वाघोबा डुलक्या घेत बसले होते! बाळ त्यांच्यासमोर खेळत होता! अरे बापरे! आता कसे करायचे? दोघांनाही प्रश्न पडला.

बाळाचे वडील आणि इतर जवळपासची माणसे जमली. हळूहळू कुजबुजू लागली. पण पुढे जायचे धाडस कुणालाच होत नव्हते. शेवटी मामंजी म्हणाले,

"सूनबाई, तू बाळाला त्याच्या जवळ दिले आहेस. तूच बाळाला घेऊन ये!"

सूनबाईने मनाचा हिय्या केला. डोक्यावर पदर घेतला. दार उघडून हळूच ओटीवर आली. वाकून नमस्कार केला. म्हणाली,

"मामंजी, बाळाला नेते हं—"

आणि पटकन् बाळाला उचलून घेऊन घरात गेली! सगळ्यांचा जीव भांड्यात पडला. बाळाला याच्याकडून त्याच्याकडे करण्यात व पटापट त्याचे मुके घेण्यात मंडळी दंग झाली.

वाघाने रक्षिलेल्या या बाळाचे पुढे 'वाघ' हे आडनाव पडले. आणि त्याच्या वंशातले आम्ही पण 'वाघ' झालो!

रत्नागिरीला एक वाघ कॉन्ट्रॅक्टर आहेत. त्यांनी नेमकी हीच गोष्ट सांगितली. म्हणजे ही आमची वाघ वंशवेल बरीच फैलावली आहे! सातारा, जळगाव, चाळीसगाव, बार्शी वगैरे ठिकाणीही अशीच वाघ मंडळी पसरली आहेत. श्रीमंत बाजीराव (दुसरे) पेशवे यांच्याबरोबर वाघ मंडळी ग्वाल्हेरला गेली. ती आमच्या बऱ्याच जवळची म्हणजे तीन-चार पिढ्यांपूर्वीची असावीत. त्या वेळचे वाघ पेशव्यांचे जामदारखानेवाले होते.

## गणेशभक्त वाघांकडे भाऊबंदकीचा अभाव

आम्ही पुणे जिल्ह्यातल्या बारामती तालुक्यातील मोरगावचे. आमचे मोरगाव अष्टविनायकांपैकी सर्वप्रथम सिद्धिविनायकाचे स्थान. स्वच्छ, प्रशस्त आणि सुंदर असे मोरयाचे देऊळ येथे आहे. देवाला राजा मानले जाते, म्हणून अष्टप्रहरचे चौघडे येथे वाजतात. समया चालू असतात. काकड-आरती, धूपारती, शेजारती, सर्व होते. मधल्या वेळचा प्रसाद मोठा असतो आणि खूप जणांना मिळतो. गावातील



लहानांपासून मोठ्यांपर्यंत, गरिबापासून श्रीमंतापर्यंत सर्व जाती, धर्म, पंथी लोक दिवसाकाठी एकदा तरी गणपतीचे दर्शन घेतात. गणेशचतुर्थीला सगळ्या गावाचा उपास असतो. पंचमीचे पारणेही असेच सार्वजनिक सहभोजनांनी होते. आता मंदिरप्रवेशास हरिजनांना कोठेच बंदी नाही; पण मोरगावला कित्येक वर्षांपासून गणेशचतुर्थीच्या दिवशी सर्वांनी देवावर पाणी घालण्यास, पायाला हात लावून दर्शन घेण्यास मुभा आहे.

विजापूरच्या आदिलशहाकडून चिंचवडच्या मोरया गोसावी या साधूंना मोरगावच्या देवालयासाठी वर्षासन मिळालेले आहे. दर भाद्रपद व माघ शुद्ध चतुर्थीस चिंचवडहून गणपतीची पालखी येते. मोठे उत्सव होतात. दसऱ्याच्या दिवशी देवाच्या सीमोल्लंघनाचा मोठा कार्यक्रम असतो. संपूर्ण रात्रभर मिरवणूक फिरत असते. नळे-फुलबाज्या उडविल्या जातात. तोफा उडविण्यास परवानगी आहे. हा तोफा उडविण्याचा मान वाघांकडे आहे. सीमोल्लंघनास निघताना वाघांच्या वाड्याला उजवी घालण्याचा आशीर्वाद पण वाघकुटुंबीय गणेशभक्ताने मिळविलेला आहे.

वाघ मंडळी निःसीम गणेशभक्त आहेत. 'एको देवा' हे जणू या घराण्यास वरदानच आहे. एकुलता एक मुलगा असणे हे वैशिष्ट्य आहे. तीन-चार पिढ्यांनंतर कोणाला तरी एकापेक्षा जास्त मुलगे होतात. (माझा एकुलता एक भाऊ मधू याला चार मुलगे आहेत.) त्यामुळे वाघांकडे भाऊबंदकी नाही! उलट, कित्येक पिढ्या तुटलेली मंडळी ही एकमेकास भेटल्यावर सख्ख्या भावाप्रमाणे वागतात.

आज समाजात गणेशभक्ती वाढीस लागली आहे. गणेश म्हणजे गणांचा ईश— लोकशाही-रक्षणकर्ता! या दृष्टीने या प्रतीकाचे महत्त्व फार वाटते आणि त्याचे कृपाछत्र आपल्यावर असावे असे वाटते.

## माझे वडील

माझ्या वडिलांचे संपूर्ण नाव बाळकृष्ण धुंडिराज वाघ. त्यांचे आजोळ शिरवळच्या देशपांड्यांकडचे. आजोळचे नाव यशवंत. त्यांच्या जन्मानंतर आजोळी काही शुभ गोष्ट घडली असावी. सरकारदरबारी मात्र ते बाळकृष्ण या नावानेच रूढ झाले होते. आम्ही त्यांना 'आबा' म्हणत असू.

आमचे आबा उंच, किडकिडीत बांध्याचे, उभट चेहऱ्याचे, देशस्थी काळ्यासावळ्या रंगाचे होते. फार शांत व प्रेमळ स्वभावाचे होते ते. आम्ही चौघी बहिणी प्रथम झालो. मी पहिली मुलगी म्हणून माझे लाड झाले! दुसऱ्या मुलीच्या वेळी "मुलगा झाला असता तर बरे!", तिसरीच्या वेळी "चु, चु, चु, मुलगीच का?", आणि चौथीच्या वेळी "आता मुलगा होणार तरी केव्हा?"—असे आजुबाजूचे लोक कुजबुजत असत. त्या प्रत्येक वेळी आबा म्हणायचे,

"मुलगी कुणाची ? जाईल आपल्या घरी ! चिमण्या उडून जातील ! असू द्या. मला मुली पण आवडतात !"

त्यांनी मुली झाल्या म्हणून कधीच खंत केली नाही. उलट, सगळ्या मुलींना अत्यंत मायेने व लाडाने ते वागवीत असत. "पप्या" (माझे लाडके नाव !), "किरया", "माल्या" "लिल्या" अशा ते मुलांच्या नावानेच हाका मारीत. कोणालाही कधी रागावल्याचे व मारल्याचे माझ्या आठवणीत नाही.

## "पुन्हा कोठे काही घेशील का ?"

आई एक गोष्ट सांगत असे. मी त्या वेळी तीन वर्षांची होते. जेवू लागले होते. आबा सकाळीच कामावर जायचे. ते बारा वाजता जेवायला घरी यायचे. लहान मूल म्हणून घरात मी एकटीच होते. तेव्हा शेजारी मुलांच्यात खेळायला जायची. शेजारचे गृहस्थही आबांच्या ऑफिसातलेच क्लार्क होते. शाळेची वेळ झाली की मुले जेवायला बसायची. त्या वेळी शेजारीण काकू साहजिकपणे मलाही जेवायला बसवायच्या. आबा जेवायच्या वेळी चौकशी करायचे, "पपी कुठे आहे ?"

"शेजारी खेळायला गेली आहे !", "तेथेच जेवली !" रोज रोज आबा हे ऐकत असत. शेवटी त्यांना या गोष्टीचा फारच राग आला. एके दिवशी ते उठले. शेजारी गेले. तेथून मारीत मारीत मला घेऊन आले.

"पुन्हा कोठे जेवायला जाशील का ? कोणाकडे काही घेशील का ? मागशील का ?" असा त्यांनी मला दम दिला होता.

पुढे एकदा माझा मामा मला एका बोहऱ्याच्या दुकानात घेऊन गेला होता. दिवाळीचे दिवस होते, म्हणून त्या बोहऱ्याने मला फटाक्यांचे सर देऊ केले. मी ते मुळीच घेतले नाहीत. मामाला आश्चर्य वाटले. तेव्हा आईने वरील हकिगत मामाला सांगितली. अर्थात यातले मला काहीच आठवत नाही. आबांना कोणावरही रागावताना, कोणाला मारताना मी कधीच पाहिलेले नाही. त्यांना दुसऱ्या कोणाचा राग आला तर ते बराच वेळ गप्प बसून राहत असत.

## आबांना शिकायचे होते

आबांचे लहानपण फार कष्टात गेले. त्यांच्या लहानपणीच त्यांची आई वारली. म्हणजे त्यांच्या पाठीवरची तीन महिन्यांची बहीण मागे ठेवूनच ती गेली. आमच्या आजोबांनी दुसरे लग्न केले नाही. त्यांची काकू घरात होती. 'आबई' हे तिचे नाव. त्यांनी ह्या दोघाही भावंडांना वाढविले. आमच्या आत्याबाई—गंगूताई—यांना बकरीचे दूध पाजून मोठे केले म्हणे.

मोरगावच्या शाळेत आबा जाऊ लागले. ते फार बुद्धिमान होते. गणितात त्यांचा



हातखंडा असायचा. वर्गात नेहमी पहिला नंबर. दांडगाई, खोड्या काही नाही. आबा इयत्ता सातवीची परीक्षा चांगल्या प्रकारे पास झाले. पुढे शिक्षणाची तेथे सोय नव्हती. आमची थोडी शेती होती. त्यावरच उदरनिर्वाह होता. आजोबा स्वतः काहीच उद्योग करीत नव्हते. देवपूजा, जपजाप्य, गप्पा यांच्यातच त्यांचा वेळ जायचा. आबांना तर पुढे शिकायचे होते. म्हणून ते आजोळी शिरवळला गेले. त्यांचे आजोबा (आईचे वडील) फौजदार होते. त्यांच्या ठिकठिकाणी बदल्या होत. त्यांच्या बिऱ्हाडाबरोबर आबाही त्या त्या गावीच असत. त्यामुळे त्यांचे शालेय शिक्षण पूर्ण होऊ शकले नाही. आजोबांचे कुटुंब पुष्कळच मोठे, म्हणून आबांना घरकामात मदत करावी लागे. पुढे त्यांना पोस्टमनचे काम मिळाले. त्यासाठी खूप हिंडावे लागे. पण पाकिटावरचे पत्ते वाचून आबा इंग्रजी शिकले.

## "अरे, आबा येणार ! अडलेली उदाहरणे काढून ठेवा !"

त्यानंतर पी० डब्ल्यू० डी०मध्ये आबांना क्लार्कची नोकरी मिळाली. पहिली नोकरी बार्शी (जिल्हा सोलापूर) येथे होती. तेथली नोकरी काही कारणाने सोडली. पण त्याच खात्यात भुसावळ येथे त्यांना पुन्हा नोकरी लागली. तेथेच त्यांच्या हुशारीची चुणूक दिसली. पी० डब्ल्यू० डी०च्या ऑफिसच्या आवारात लाकडाचे लांब लांब वासे आणले होते. पुढच्या वर्षी पुन्हा नवीन आले. त्याच्या पुढील वर्षीही आले. हा नित्यक्रम झाला. यात नवे कोणते, जुने कोणते, ओळखायचे कसे ? आबांनी पहिल्या वर्षापासूनच दरवर्षी आलेल्या वाशांवर काही विशिष्ट खुणा करून ठेवल्या होत्या. एकदा साहेबांना नवे-जुने वासे ओळखायचे कारण पडले. त्या वेळी खुणांच्यामुळे ते चटकन ओळखता आले. साहेबांनी आमच्या आबांना विशेष लिखित शाबासकी दिली.

इयत्ता सातवीची परीक्षा झाल्यानंतर आबांनी मोरगाव सोडले. तरीपण ते मधून-मधून गावी येत असत. आबा येणार असल्याची चाहूल लागताच शाळेतले इयत्ता सातवीचे शिक्षक मुलांना सांगत,

"अरे, आबा येणार आहेत बरे का ! अडलेली उदाहरणे काढून ठेवा."

शिक्षकांना न सुटणारी उदाहरणे आबा सोडवून दाखवीत असत. त्यांना शिकण्याची संधी मिळाली नाही म्हणून त्यांच्या बुद्धीची चमक दिसली नाही. नाही तर ते चांगले गणिती अगर इंजिनियर म्हणून पुढे आले असते. त्यांच्या कुशाग्र बुद्धीचा वारसा पुढील पिढीला अवश्य मिळाला आहे. आम्ही चारही बहिणींनी आपापल्या कामात विशेषता दाखविली आहे. आमच्या भावाने आमच्या आबांची 'एक्झिक्युटिव्ह इंजिनियर' होण्याची महत्त्वाकांक्षा पूर्ण केली. त्यालाही धरणाच्या कामाबद्दल सरकारकडून विशेष लिखित शाबासकी मिळाली. नातवंडे अशीच बुद्धीने चमकत आहेत.

## जंगलातले राहणे मला आवडायचे

आबांना काहीतरी विशेष धाडस करावेसे वाटे. कॉन्ट्रॅक्ट घेण्याचा त्यांना छंद होता. असेच एक रेल्वेचे (पाचोरा पहूरफाटा) सब-कॉन्ट्रॅक्ट त्यांनी मिळविले. कामाबद्दल प्रश्नच नव्हता. भोळेपणा व सर्वांवर विश्वास. बरेच पैसे लोकांना आगाऊ दिले. ते बुडाले! मोजणीदाराने काही घोटाळा केला. आणि कॉन्ट्रॅक्ट अंगावर आले. जवळचे होते-नव्हते ते सर्व गेले, आणि नाशिकला पुन्हा नवी नोकरी धरावी लागली. पण पी० डब्ल्यू० डी० खात्यातच! कारण त्या खात्यात त्यांच्या कामाची सदा वाहवाच होत असे. पुढे खंबाळा, झाखाड या दोन अगदीच जंगलात असणाऱ्या रहदारी बंगल्यांत राहून त्या त्या रस्त्यावरच्या देखरेखीचे काम त्यांच्याकडे आले. या ठिकाणी आम्ही सर्वच भावंडे लहान होतो. मी दहा वर्षांची. मधू अजून व्हायचा होता. पण या जंगलांतले राहणे मला फार आवडायचे. दिवसच्या दिवस धाकट्या लिलीला घेऊन मी झाडांच्या सावलीत बसायची, खेळायची. खंबाळ्याच्या बंगल्यात निवडुंगाच्या कंपाउंडसारखे गुलाबाच्या झाडांचे कंपाउंड होते. पावसाळ्यात टपोरी गुलाबाची फुले झाडावरून तरारून यायची. कुणीच तोडायला नव्हते. आम्ही खूप मोठे मोठे हार देवाला घालीत असू. खंबाळ्याच्या बंगल्यात आम्ही आणि एक चौकीदार एवढेच राहत असल्यामुळे कामानिमित्त आलेले सगळे साहेब लोक व अन्य पाहुणे आमच्याच घरी जेवायला असत. कामाला माणूस नाही. दळण घरी दळायचे, पाणी दोन फर्लांग लांब, अशा अडचणीत आमच्या आईला काम करावे लागत असे. ती कामाला जबरदस्त वाघ होती. कधीच कंटाळायची नाही. मला म्हणायची, "या लिलीला तेवढी संभाळ. मी करते बाकी सगळे!" मग आम्ही लीलाबाईंना कडेवर घ्यायचे आणि बंगल्याकडे धूम ठोकायची. तेथे आम्ही वाळूत खूप खेळत असू.

मला शाळा नव्हतीच. पण वाचनाचा नाद लागला होता. व्यंकटेशस्तोत्राची पोथी घरात होती. मी ती आईला रोज वाचून दाखवायची. पुढे पाठ झाली, आणि मग बंगल्याच्या व्हरांड्यात बसून पाटीवर थोडी थोडी लिहून काढायला सुरवात केली. तेव्हा मी दहा वर्षांची होते. त्याच वेळी कोठून तरी 'वीरधवल' नावाची कादंबरी मला मिळाली. ती सगळी वाचून काढली. त्या कादंबरीच्या नादात माझे तांदूळ निवडण्याकडे दुर्लक्ष झाले म्हणून आईने ती एकदा जाळून टाकली. खूप वाईट वाटले. पण लहानपणचे ते वाईट वाटणे फार दिवस राहिले नाही. दुसरी पुस्तके मिळाली. माझा हा वाचण्याचा नाद आबांनी अगदी लक्ष देऊन पुरवला. लग्नानंतर वैधव्य, नंतर अकोल्याचा दोन वर्षांचा मुक्काम करून मी परत इगतपुरीला आले तेव्हा मी व्ह० फा०चा अभ्यास करीत होते. त्या वेळी आबांनी मला नाथमाधवांच्या सर्व ऐतिहासिक कादंबऱ्या, महाभारताचे सगळे सोळा भाग, भागवताचे दोन भाग



ही पुस्तके विकत आणून दिली. ते श्रीमंत नसतानाही माझी ही हौस त्यांनी पुरविली. मधूनमधून मी त्यांना वाचूनही दाखवीत असे. आईला पण पुष्कळ पोथ्या वाचून दाखवीत असे. माझा वाचनाचा नाद असा आई-वडिलांच्या सहकार्यानेच वाढला. पुढे पुढे इगतपुरीच्या वाचनालयातील गोष्टी, नाटके, कादंबऱ्या आदी ललित साहित्यामधील पुस्तके संपली असल्याचे वाचनालय-व्यवस्थापकाने सांगितले. "तुमच्या पपीपुढे हात टेकले!" असेही ते म्हणाले.

## आबांचे निधन

वारंवार बदल्या होण्यामुळे मुलांच्या शिक्षणाची आबाळ होते म्हणून मग आम्ही नाशिकला बिऱ्हाड केले. नोकरीच्या गावी आबा एकटेच राहावयाचे. लीला व मधू यांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण नाशिकला रुंगटा हायस्कूलमध्ये झाले. आता इगतपुरीस आबांचे बस्तान चांगले बसले. तिथेच मधूचा जन्म, माझे लग्न वगैरे महत्त्वाच्या गोष्टी झाल्या. पुढे ओझर, चांदवड, वडाळा, मालेगाव आदी ठिकाणी त्यांच्या बदल्या झाल्या. नंतर मधूचे शिक्षण पूर्ण होऊन त्याला नोकरी लागल्यावर वडिलांनी काम करणे सोडून दिले व ते मधूजवळ येऊन राहिले. मधूने त्यांची अत्यंत निष्ठेने सेवा केली. त्यांचाही सगळा जीव त्याच्या भोवती घोटाळत होता. म्हटले पाहिजे की, असे बापलेक होणे नाही! वडिलांची निष्ठेने सेवा करण्याचे व्रत आमच्याकडे वडिलोपार्जितच आहे. आबांनी त्यांच्या वडिलांची, मधूने आबांची आणि मधूच्या मुलांनी मधूची सारख्याच निष्ठेने सेवा केली. आणि वर सांगितलेल्या सगळ्याच बापांनी आपल्या मुलांवर सारखेच प्रेम केले.

आबा बुद्धिमान व कष्टाळू होते. प्रेमळ, उदार व सुधारकी मताचे होते. रस्त्यावरील सगळ्या मजुरांच्या अडीअडचणींच्या वेळी आबांनी मुक्तहस्ते मदत केली. स्वतःजवळ पैसे नसल्यास, स्वतः मध्यस्थ राहून सावकारांकडून पैसे मिळवून देत. मग ते स्वतः कर्ज फेडीत बसायचे. जेवणाच्या पंगतीस मराठा-हरिजन सर्व एकाच ओळीत बसायचे. शिवाशिव पाळणे नाही. कित्येक गरीब मुलांना आपला मुलगा मानून कोठे कोठे कामे मिळवून दिली व पुढे आणले. ती मंडळी अजून आबांना स्मरतात.

आबांना मुले फार आवडायची. आळीतली मुले त्यांच्या अंगावर सदाच खेळत असायची. त्यांना मित्रमंडळी पुष्कळ असायची. एकत्र जमून लहानलहान उपहार-सभा घेणे, सहली काढणे, वगैरेंचा त्यांना नाद होता. पत्ते खेळणे हा त्यांचा आवडता छंद! प्रत्येक शनिवारी रात्री दोन-दोन वाजेपर्यंत खेळ चालायचा. मधूनमधून चहा-भजी आदी कार्यक्रम चालायचा. 'सॅटरडे क्लब' या नावाने हा प्रसिद्ध क्लब पुढे मधूनेही आपल्या प्रत्येक नोकरीच्या गावी चालविला.

माझ्या परमपूज्य वडिलांविषयी—आबांविषयी—लिहू तितके थोडेच आहे. उभे आयुष्य खडतर कष्ट केल्यामुळे शेवटी पाच वर्षे ते नुसत्या तापाने आजारी झाले. वयाच्या एकाहत्तराव्या वर्षी ते निधन पावले.

## माझी आई

माझ्या आईचे माहेर म्हणजे सोनोरीचे सरदार पानसे. तिचे माहेरचे नाव रंगू. पण आईला माहेरी फार दिवस राहायला मिळाले नाही. तिची आई तिच्या लहानपणीच वारली. वडील देवधर्मी होते. त्यांनी पुन्हा लग्न केले नाही. सामुदायिक मोठे कुटुंब, म्हणून आपल्याच मुलांकडे लक्ष देण्याची त्या वेळी रीतच नव्हती. घरात कर्ते पुरुष श्री० दाजीसाहेब (आईचे आजोबा). त्यांचा अंमल असायचा. कारण पुरते माहीत नाही, पण माझ्या आईला व मामाला घेऊन आमची आजी (आईची आई) बरेच दिवस माहेरीच राहायची. पुढे ती वारली. तेव्हा ही दोन्ही मुले तिच्या माहेरी म्हणजेच आजोळीच वाढली. त्यांचे आजोळ म्हणजे पुण्याच्या शनिवार पेठेतील चित्राव! बासष्टच्या पानशेतच्या पुरात हा मोठा वाडा वाहून गेला. पण मला चांगले आठवते, या वाड्यात आम्हीही पुष्कळदा खेळलो आहोत.

आजोळी आईची एक विधवा मामी होती. ती कर्ती होती. दुसरे मामा-मामी होते. पण मामा भ्रमिष्ट होते, म्हणून त्यांच्या पत्नीस जावेच्या हाताखाली सासूरवाशिणीसारखे राहावे लागे. पण मोठ्या मामींनी दीर, जाऊ व भाचरे यांचे मोठ्या मनाने सगळे चांगले केले. आमचा मामा सदाशिव हा हुशार होता. त्या वेळी तो मॅट्रिक पास होऊन कॉलेजात गेला होता. पण मग कोणी गुरुजी भेटले. त्यांनी त्याच्याकडून एकवीस दिवस एका पायावर उभे राहणे, कडुलिंबाचे गोळे खाणे वगैरे तपश्चर्या करून घेतल्या. घर सोडायला लावले. एकूण, त्याच्या आयुष्याचा नाश झाला. मोठ्या मामींनी त्याला मुलाप्रमाणे वाढविले असल्यामुळे त्यांना या गोष्टीचा फार धक्का बसला; पण इलाज नव्हता.

## "मी तुझ्या जवळ आहे!"

मामांनी घर सोडले, पण गुरुजींचे घर पक्के धरले. कारण गुरुजी लवकरच वारले. त्यांची मुले लहान होती. स्वतः काहीतरी उद्योग करून पैसे कमावून या मुलांना मामाने मोठे केले. लग्नकार्य करून दिले. पण अत्यंत खडतर आयुष्य व प्रकृतीची आबाळ म्हणून वयाच्या अवघ्या तिसाव्या वर्षीच त्याने जगाचा निरोप घेतला. त्याची एकुलती एक बहीण—आमची आई—हिने या गोष्टीचा फारच धसका घेतला. कारण आधीच आईवडील नाहीत, मोठ्या मामी पण गेल्या, आणि आता भाऊही गेला! खूप रडत होती. मग मामाने स्वप्नात येऊन सांगितले, "रडू नको, मी तुझ्या जवळ आहे." आई तेव्हा मधूच्या वेळी गरोदर होती, म्हणून पुढे मधूला मामाचे नाव ठेवण्यात आले. मधूचे संपूर्ण नाव 'सदाशिव बाळकृष्ण वाघ' असे आहे. माहेरी असे सख्ख्यामध्ये कोणी नसले तरी चुलत-चुलत चुलते मंडळी आईचे खूप लाड करीत असत. त्यांपैकी प्रा० रमेश पानसे यांचे आजोबा श्री० चिंतोपंत पानसे, तसेच श्री० अनंतराव पानसे ही मंडळी प्रमुख होत. चिंतुकाका व अंतुकाका याच नावाने आम्ही मुले ह्यांना ओळखत होतो.



## आईची दक्षता

पुण्याला आजोळी आई होती, त्या वेळी मुलींच्या शाळा कोठे कोठे निघाल्या होत्या. शाळेची मोलकरीण आईला बोलवायला येई, त्या वेळी आई माळ्यावर लपून बसायची. "मुलींच्या जातीला कशाला हवे शिक्षण?" म्हणून घरातल्या मोठ्या मंडळींनीही फारसे लक्ष दिले नाही. आणि आई शाळेत शिकलीच नाही. पण पुढे स्वतःच्या प्रयत्नाने पोथ्या वाचू लागली, थोडे थोडे लिहू लागली.

वयाच्या ११ व्या वर्षी तिचे लग्न झाले. १३ व्या वर्षापासून बार्शी येथे ती संसार करू लागली. सासरचे अगर माहेरचे मोठे माणूस कोणीही जवळ नव्हते. त्यामुळे स्वतःच्या हिंमतीवर तिला घर चालवावे लागले. ती शक्ती तिच्याजवळ होती. यामुळेच स्वतंत्रता हा एक मोठा फायदा तिला मिळाला. कोणाच्याही अधिकाराखाली वागण्याची तिला सवयच नव्हती. एक तर तशी वेळ आली नाही आणि क्वचित आली तर तिला त्या बाबतीत दुसऱ्यांशी पटवून घेता आले नाही. पण स्वतःचा संसार ती अत्यंत हुशारीने चालवीत होती. स्वयंपाक छान असायचा. पाहुण्यांची आवड होती. चार मंडळी यावी व आपणही चारचौघांत जावे, असे तिला वाटायचे. त्यामुळे तिच्या खूप चांगल्या चांगल्या ओळखी होत्या. ती गाणे चांगले म्हणायची. खूप बोलकी होती. तिला संधी मिळाली असती तर तास न् तास वक्तृत्व करणारी चांगली वक्ती झाली असती.

आमच्या आईला फार लवकर राग येत असे. आणि मग तिच्या सपाट्यात सापडेल त्या मुलाला मार खावा लागे. त्यामुळे आम्ही भावंडांनी आईला एकमेकांची कधीच कागाळी सांगितली नाही! एवढी एक गोष्ट सोडली तर आम्हा भावंडांचे शिक्षणपोषण, दुखणीबाणी या सर्वच गोष्टींकडे तिने अत्यंत दक्षतेने लक्ष दिले.

कामानिमित्त मुलींच्या शाळा तिने कधीच बुडविल्या नाहीत अथवा शाळेला उशीर होऊ दिला नाही. वैधव्यानंतर मला त्वरित शिकायला लावले, फायनलच्या परीक्षेसाठी वेळीच काळजी घेतली व मला ट्रेनिंगमध्ये प्रवेश मिळण्यासाठी धडपड करायला वडिलांच्या मागे तगादा लावला. त्यामुळेच मी आज आहे तिथे आहे. एरव्ही कुठेतरी पोळ्या लाटत बसले असते. तेव्हा आईची 'आई' म्हणून जी

कृतज्ञता असते ती असूनही, माझ्या आयुष्याला योग्य वळण लावले म्हणून मी अधिक कृतज्ञ आहे!

वडील गेल्यानंतर तिने भारताच्या चारीधाम यात्रा केल्या. व्रतवैकल्ये, उपास-तापास खूप असत. मैलच्या मैल चालण्याची शेवटपर्यंत धमक होती. वयाच्या ८० व्या वर्षी, १९७२ मध्ये अत्यंत अल्प आजाराने ती निधन पावली.

### माझी भावंडे

आम्ही चार बहिणी व एक भाऊ. तो सर्वात लहान, मी सर्वात मोठी. माझे लाडाचे नाव पपी. पण पुढे ते सर्वांच्याच तोंडी बसले. बरे वाटेना, म्हणून आई-बाबा यांनीच स्वतः ताई म्हणायला सुरवात केली. अगदीच जुन्या माणसांना माझे जुने नाव माहीत आहे. ट्रेनिंग कॉलेजात अनसूया, बापू-माईंची अनू, नाशिक जिल्ह्यात व पुण्याच्या हुजूरपागेमध्ये काम करताना वाबडाई आणि आता अनुताई. शेवटचे नाव इतके रूढ झाले आहे की आणखी काही नावे मला होती, हे मीच विसरले होते! आज लिहिताना ते सारे आठवले.

### कृष्णा ऊर्फ माई

माझ्या पाठची बहीण कृष्णा—किशी—किसामाई—माई! आज ती 'माई' या नावानेच सगळ्यांना माहीत आहे. माई चांदवड येथे माझ्याच शाळेत सहाव्या इयत्तेत होती, त्या वेळी तिचे लग्न आमच्या चुलत आतेभावाशी झाले. (आत्याच्या घरी मुलगी द्यायची, ही पूर्वीची प्रथा होतीच.) तिचे सासरचे नाव इंदिरा. अतित येथील राजगुरूंची ती सून. माझे मेहुणे कै० श्री० वामनराव राजगुरू हे धडाडीचे हौशी तरुण होते. शालेय शिक्षण बेताचे. पण ड्रायव्हरचे शिक्षण घेतले. स्वतःची बसगाडी घेऊन धंदा चालू केला. पण भिडस्त स्वभाव. उधारी खूप झाली. फुकटे प्रवासी भेटतच होते! शेवटी त्यांना गाडी विकून टाकावी लागली व दुसऱ्यांकडे नोकरी करावी लागली. ते ज्या गाडीवर चढत त्या मालकाला फायदाच व्हायचा. 'गुरू' या नावाने त्यांना ओळखत असत. एकदा मोठा अपघात झाला. एक लॉरी त्यांच्या अंगावर पडली. पाय फ्रॅक्चर झाला. त्या दुखण्यातून बरे झाले. पुन्हा गाडीवर चढले. पण आता अशक्त झाले होते. थोड्याशा आजाराने त्यांना मृत्यू आला. त्या वेळी त्यांची एकुलती एक मुलगी १४ वर्षांची होती.

### माईची निर्भयता आणि ममता

माईचे लग्नाआधीचे शिक्षण बेताचेच होते. पण वामनरावांची प्रकृती बरी राहत नसे. त्यामुळे माईने पुढे शिकणे जरूर आहे असे आमच्या लक्षात आले. तिला



नाशिक येथे सिव्हिल हॉस्पिटलमध्ये नर्सिंगचा कोर्स दिला. वामनराव वारले त्या वेळी ती शिकतच होती. माईने पुढे हेल्थ व्हिजिटरचा पण कोर्स केला. तिला मदभावी येथे हेल्थ व्हिजिटरचे काम मिळाले. त्या वेळी मुंबई इलाखा होता. पुढे संयुक्त महाराष्ट्र होऊन मदभावी हे गाव कर्नाटकात गेले. तिथे कानडी भाषा. गाव अगदीच खेडे आणि एका बाजूला. दिवसाढवळ्या तिथे खून होतात असे कळले होते! अशा ठिकाणी माई एकटीच जाऊन राहिली. कानडी भाषा येत नव्हती. ती एक अडचण होती. पण माई भ्यायली नाही. दहा गावे फिरायची होती, त्यासाठी तिने स्वतःच्या खर्चाने एक बैलगाडी ठेवली. एक मराठी व कानडी समजणारी बाई घरकामाला ठेवली. तिला घेऊन माई फिरतीवर जायची. म्हणजे ती बाई व गाडीवाला या दोघांची आपोआप सोबत मिळायची. गावात गृहभेटी देताना ती हसतमुखाने घरात प्रवेश करायची. पाळण्यातले अथवा रांगते, खेळते बाळ उचलून घेऊन मुके घ्यायची, खेळवायची. त्यामुळे लगेच त्या घरची मंडळी आपलीशी व्हायची. माई कानडी भाषा शिकली. सगळ्या मदभावीला तिने आपलेसे केले. तेथे दवाखान्यात प्रसूतीची व गरोदर भगिनींना तपासण्याची सोय होती, पण तो दवाखाना बहुधा रिकामाच असायचा. माईने तेथे काम सुरू केल्यावर मात्र बाळं-तिणींना खाटा पुरायच्या नाहीत. आउटडोअर पेशंट्सची गर्दी असायची. पुढे त्याच तालुक्यात तिच्या आणखी बदल्या झाल्या. प्रत्येक गावी ती आपल्या कामाने गावावर छाप पाडून असायची. शेवटचे तिचे गाव 'अळगावर' होते. मदभावीला तिने मागास जमातीतील एक हुशार मुलास आर्थिक मदत केली. तो आज इंजि-नियर होऊन चांगला पगारदार झाला आहे. पण माईला तो आई मानतो. माई, तिची मुलगी बिंबा व तिचे पती हे सर्व जग ह्याच नात्याने त्याच्याकडे पाहतात.

माईला तिच्या सेवा-काळात बंगलोर येथे वारंवार जावे लागत असे. पंजाबसारख्या दूरच्या प्रांतात उजळणीवर्गासाठी जावे लागत असे. पण ती खूप धीट आहे. इंग्लिश थोडे कमी, परक्या भाषा, पण ती कशालाच भ्यायली नाही.

माईने पेन्शन घेतले आहे. तरीही कोसबाडला दोन वर्षे माझ्याकडे राहून आमच्या शबरी उद्योगालयास स्वरूप आणले. हिंदळे (जिल्हा रत्नागिरी) येथे मातृमंदिरातर्फे नवे काम सुरू झाले. त्यांना नर्सची आवश्यकता असल्यामुळे कोसबाडला येऊन तिला घेऊन गेले. तेथे तिने दोन वर्षे काम करून वाहवा मिळविली. सध्या डोळ्यांत मोतीबिंदू आले आहेत. आजचे तिचे वय बासष्ट वर्षे आहे. म्हणून पुण्यातच राहिली आहे.

### मालती ऊर्फ मालू

माईच्या पाठची बहीण मालू—मालती—मालिनी—माई. मालू सध्या नागपूरला असते. ती 'माई' या नावाने सगळ्यांना माहीत आहे, पण आमची मालूच.

चांदवड, पिंपळगाव या दोन्ही ठिकाणी मालू माझ्या शाळेतच होती. कितव्या इयत्तेत ते आठवत नाही. पुढे मी पुण्याला गेले. वडिलांनी मुलांच्या शिक्षणासाठी नाशिकला बिऱ्हाड केले. आणि नाशिकच्या शाळेत मालूचे पुढील शिक्षण झाले. ६।७ इयत्तां-पर्यंतच असावे. चांदवडला माझ्या मित्रमंडळीमध्ये असलेले श्री० शांताराम हरी जोशी तथा राजाभाऊ यांच्याशी तिचे लग्न ठरले. आमच्या आईनेच ते ठरविले. पण पुढे राजाभाऊ मेडिकल कॉलेजमध्ये दाखल झाले. दोन वर्षे चांगल्या परीक्षा झाल्या. पण इंटर (मेडिकलची)च्या परीक्षेच्या वेळी मौखिकमध्ये त्यांना यश मिळाले नाही. दोन वेळा प्रयत्न केले ते फसले. तेव्हा त्यांनी तो नाद सोडून दिला. विम्याचे काम सुरू केले. दरम्यान राजाभाऊंची डॉक्टरची परीक्षा झाल्यानंतर त्यांच्या वैद्यकीय व्यवसायास पूरक व्हावे म्हणून त्याच्याच खटपटीने मालूने पुणे येथे के० इ० एम०मध्ये नर्सिंगचा कोर्स पूर्ण केला. त्यानंतर या दोघांचे लग्न झाले. या उभयतांच्या या शिक्षणाच्या काळात माझे बिऱ्हाड पुण्यास होते. म्हणून दोघेही माझ्याकडेच राहत असत. (अर्थात मालू हॉस्पिटलच्या वसतिगृहात राहत होती. अधूनमधून येई.) लग्नानंतर वर्षा-दीडवर्षाने ही मंडळी मद्रासला गेली. तेथून नागपूरला गेली. आता तेथे स्थायिक झाली आहेत.

## लीला

आमची सर्वात धाकटी बहीण लीला (आक्की). तिच्या व माझ्या वयांत दहा वर्षांचे अंतर. म्हणजे तान्ह्या लिलीला खेळवण्याचेच मुख्य काम माझे होते. लिली फारच सुंदर दिसायची. गोरापान गोल चेहरा, काळेभोर डोळे, काळेभोर केस- पण फार अशक्त होती. वरचेवर थंडी व्हायची म्हणून आईला फार जपावे लागत असे. आईनेच तिला योग्य काळजी घेऊन जगवले म्हटले तरी वावगे होणार नाही.

लीला फार लवकर बोलायला लागली. तिचे बोलणे स्पष्ट, अस्खलित होते. पाठांतर चांगले. ऐकलेली गाणी म्हणण्याचा सपाटा असायचा. "नको मला तुमचा काळा काळा मुलगा, तश्शीच राहीन मी, सासूबाई!" यासारखी त्या वेळची जरा उपहासात्मक गाणी तिने ऐकली की तिची पाठ व्हायची. आणि आलेल्या पाहुण्यांनी तिला म्हणायला सांगितले की ती ठसक्यात म्हणायची. लिलीचा अभ्यास चांगला असायचा. शाळेत जाण्याची गोडी होती. एकदा मात्र शाळेच्या गुरुजींनी, तिने काही खोडी केल्याच्या चुकीबद्दल, तिच्या हातावर छड्या मारल्या. बाईसाहेब रुसून बसल्या! "शाळेतच जाणार नाही" म्हणाल्या! मग आमच्या आबांनी शाळेत जाऊन समझोता घडवून आणला. एरवी आबा आमच्या शाळेची कधीच चौकशी करीत नसत. पण लिलीसाठी आणखी एकदा त्यांना शाळेत जावे लागले!



## रदबदली

नाशिकला इयत्ता दुसरीच्या वार्षिक परीक्षेत लिली नापास झाली! अगदी आश्चर्य! कारण वाचन खडखडीत, लेखन चांगले, गणित चांगले. ही नापास कशी झाली? पुन्हा दुसरीत बसायला लिली मुळीच तयार नव्हती. तेव्हा आबांनी शाळेत जाऊन चौकशी केली. सर्व विषयांत तिला छान मार्क मिळाले होते. शिवणकामात नापास झाली. इयत्ता २ री, वय ७ वर्षे! अशा मुलीला शिवणकामामध्ये नापास करून पुन्हा वर्षभर त्याच वर्गात बसायला लावण्याची किमया त्या वेळी होत होती! मग आबा वरिष्ठांकडे गेले. आणि रदबदली होऊन लीलाबाई तिसरीत बसल्या!

लीला व मधू यांच्यात दीड-पावणेदोन वर्षांचे अंतर होते. तिच्या पाठीवर मुलगा झाला म्हणून चौथी मुलगी असूनही ती सर्वांची लाडकी होती. अजूनही ती लाडकीच आहे.

## एकाच मांडवात दोघींची परीक्षा

लीला, मधू भाग्यवान. त्यांच्या शाळेच्या वेळी आबांनी नाशिकला बिऱ्हाड केले. त्यामुळे त्यांचे शिक्षण सलगपणे होऊ शकले. १९३७ साली लीला व मी पुणे येथे बरोबरच मॅट्रिकच्या परीक्षेला बसलो. मांडवात गेलो, तेव्हा आई व लेक याच दृष्टीने मंडळी आमच्याकडे पाहत होती!

मॅट्रिकच्या रिझल्टची दोघी जणी उत्सुकतेने वाट पाहत होतो! मला वाटे, "मी पास झाले पाहिजे, नाहीतर माझ्या शाळेच्या विद्यार्थिनी व इतर मंडळी काय म्हणतील?" तिला वाटे, "मी पास झाले पाहिजे. वर्षभर शाळेत जाऊन अभ्यास केला. मी नापास झाले तर लोक काय म्हणतील? ताई नापास झाली तर एकवेळ ठीक आहे. काम करून तिने अभ्यास केला! रात्रीच्या शाळेत शिकली!" अशा अगदी मानसिक ओढाताणीत आम्ही होतो. आणि दोघीही चांगल्या मार्कांनी पास झाल्याचे कळले, तेव्हा आनंदाला पारावार राहिला नाही!

## लायब्ररीच्या पुस्तकांवर अभ्यास

आणि मग लीला पुण्यासच राहिली. एस० पी० कॉलेजमधून बी० ए० ऑनर्स झाली. शेवटपर्यंत हाफ-फ्रीशिप मिळवली. आम्ही पुरेशी पुस्तके कधीच घेऊ शकलो नाही. कॉलेजच्या लायब्ररीच्या पुस्तकांवर तिने अभ्यास केला. त्यासाठी नंबर लागावा म्हणून सकाळी आठपासून लायब्ररीच्या पायरीवर बसून राहायची.

लीलाजवळ दोन साड्यांच्यावर तिसरी साडी नव्हती. एकदा म्हणाली,

"ताई, कॉलेजात तीच तीच साडी नेसून जायला काहीतरीच वाटतं—दुसऱ्या ली वारंवार बदलतात."

"बदलू देत! आपल्याला आहे त्यातच आपण करायचं."

तिने पुन्हा कधीही हट्ट धरला नाही. आज तिचे कपाट साड्यांनी भरलेले आहे.

लीलाला पुष्कळ मैत्रिणी होत्या. समवयस्क, समान स्थितीतल्या, पण सुविचारी, सदाचारी. त्यामुळे त्यांना बघून आनंद व्हायचा.

## स्वातंत्र्यलढ्यात सहभाग

लीला बी० ए० झाली आणि त्याच वेळी १९४२ च्या स्वातंत्र्यलढ्याचे शिंग म० गांधीजींनी फुंकले! लीलाच्या सभा सुरू झाल्या. रात्री-बेरात्री. मधूनमधून प्रभातफेऱ्यांमध्येही लीला चमकू लागली.

एकदा मोठी प्रभातफेरी निघाली. चौकाचौकात सोल्जर पिस्तुले रोखून उभे होते. मी व माझ्या मैत्रिणी मिरवणुकीत सामील न होता बाजूबाजूने चाललो होतो. तो सगळा देखावा पाहून मन भ्यायले. पण आता माघार घेण्यात अर्थ नव्हता. त्या दिवशी भिकारदास मारुतीचे गेट कोणीतरी जाळले. घातपातावर आमचा विश्वास नव्हता. त्यामुळे लीलाचा याच्याशी संबंध नव्हता. पण त्या मिरवणुकीनंतरच हा प्रकार घडल्यामुळे जळिताच्या आरोपाखाली तिला पकडण्याचे ठरले. लीला घरी आली. पोलीस येत असल्याचे कळताच आम्ही तिला लपविले. पोलिसांनी मधूला पकडून नेले. विचारले, "बहीण कोठे?" तो म्हणाला, "मला काय माहीत?" मी पण म्हटले, "आम्हांला वाटले, तुम्ही तिला पकडली. तुम्हांलाच विचारते, आमची बहीण कोठे? सांगा!" पण या दलालांचे तेथे काही चालणारे नव्हते! मधूला फरासखान्यात नेला. 'कंबर मोडणे' याचा अर्थ त्या दिवशी कळला. सुचेना! आता याला मारतील, काय करतील कळेना! तशीच बसून राहिले. पण थोड्याच वेळात मधू परत आला. म्हणाला, "पायी पाठवीत होते, पण मी म्हटले, 'आणले तसे पोचवा नाहीतर टांग्याला पैसे द्या.' तर त्यांनी टांग्याला पैसे दिले!" माझा जीव भांड्यात पडला. लीला आठ दिवस लपून होती. पण एक दिवस सापडली. तिला येरवड्यास घेऊन गेले. मीही बरोबर गेले. "वाघ बहिणींना पकडले," असे सर्व पुणेभर झाले. लीला येरवडा तुरुंगातील मोठ्या दरवाज्याआड झाली आणि मग मला ब्रह्मांड आठवले! आमच्या माईंचे दीर श्री० नानासाहेब राजगुरू हे तेथे हेडक्लार्क होते. मी त्यांच्याकडे गेले. त्यांनी मला खूप बोलून घेतले. पण 'आपण चुकलो' असे तेव्हाही वाटले नाही. वाटले एवढेच की, मी पण जायला हवे होते! शेवटी "मी लक्ष ठेवीन. तू निर्धास्त राहा," असे नानासाहेबांनी मला सांगितले.

लीलाबरोबर तिच्या आणखी मैत्रिणी—तीन लीला या नावाच्याच व एक दुर्गा अशा—तुरुंगात गेल्या. त्यांच्यावर खटला शाबीत होत नव्हता. सगळ्या बी० ए०



होत्या. त्यामुळे त्यांना 'अ' वर्ग देऊन फक्त स्थानबद्ध करण्यात आले होते. तेथे श्रीमती प्रेमा कंटक, श्रीमती सुशीला पै यांच्यासारख्या मोठ्या देशसेविकांची व या मुलींची गाठ पडली. तुरुंगात पण मुली गडबड करीतच होत्या. २६ जानेवारीला काँग्रेसचे निशाण जेलवर लावले. झाले! मुलींना शिक्षा! त्यांच्या पालकांच्या भेटी व घरी जाणारी पत्रे बंद झाली. त्यामुळे आम्हांला समाचार कळेना. एकदा नानासाहेब आले. म्हणाले, "पोरींनी उपास सुरू केले आहेत. कळले का?" "नाही" मी म्हटले, आणि धाबे दणाणून गेले. अशा अनेक गोष्टी. अकरा महिने मी व मधूने टांगत्या मनःस्थितीतच घालवले. त्या दिवसांत शाळा व शिकवण्या आटोपल्यावर मी रोज सारसबागेत गणपतीला जात असे. तेथे सौ० कमलाताई साठेही भेटायच्या. (त्यांचे चिरंजीवही राजकीय कैदी होते म्हणून.)

अकरा महिन्यांनंतर सर्व मुली सुखरूप परत आल्यावर आम्ही निर्धास्त झालो.

घरी आल्यावर लगेच लीलाला अहिल्याबाई होळकर शाळेत शिक्षिकेची नोकरी मिळाली.

## "मला लग्न करायचे आहे!"

लीलाला पुष्कळ मैत्रिणी होत्या. आंदोलनाच्या वेळी मित्रही पुष्कळ झाले. पण "मला आता लग्न करायचे आहे. स्थळ तूच शोध!" असे एके दिवशी तिने मला सांगितले.

झाले! वरसंशोधनाच्या कामगिरीवर आमची स्वारी निघाली! लीलाला नापसंत करील असे कुणी नव्हतेच. पण हुंडा? हुंडा देणार नाही आणि घेणार नाही, असे आमच्या घराण्याचे व्रत! त्यामुळे लवकर जमेना.

शेवटी भाऊसाहेब रानड्यांच्या मध्यस्थीने श्री० अनंतराव दंडवते यांच्यासारखा ध्येयनिष्ठ, सुयोग्य वर सापडला.

## "मी संसाराकडे बघणार नाही!"

अनंतराव हे बारामतीचे. चार भावांपैकी एक. सगळ्यात मोठे. दादा! दादा स्वातंत्र्यचळवळीत गुंतले होते. तीनचार वेळा तुरुंगवास घडला. स्वतःचा लहानसा छापखाना होता. त्या वेळच्या सरकारने तो जप्त केला. ते वकील आहेत. पण त्यांनी पाटी लावली नाही. व्यवसाय केला नाही. आजन्म देशसेवा हेच त्यांचे ध्येय होते. त्यामुळे लग्नाला तयार नव्हते. दादा तयार नाहीत म्हणून त्यांचे भाऊही "लग्न करणार नाही" असे म्हणू लागले.

त्यांच्या आईवडिलांना काळजी वाटू लागली. पण भाऊसाहेब रानड्यांची गाठ पडली. आम्ही लीलाविषयी त्यांना सांगितले होते. दादा सेवादलाचे संघटक होते.

एका शिबिरात भाऊसाहेबांनी दादांची व लीलाची गाठ घालू दिली. लग्न जमले. पण दादांनी निक्षून सांगितले,

"संसाराची सर्व व्यवस्था लीलाकडे. मी तिकडे बघणार नाही!"

लीलाने स्वतःच्या कर्तबगारीवर दादांच्या निश्चयाला धक्का लागू दिला नाही!

दादांनी ठरवल्याप्रमाणे स्वातंत्र्यप्राप्तीनंतर निरनिराळ्या प्रदेश काँग्रेस कमिट्यांची कामे पाहिली. सेवादले चालविली. गांधी स्मारक निधीतर्फे काम करणे वगैरे कामांतच गुंतले.

लीलाने लग्नानंतर बी० टी० चा अभ्यास केला. मॉडर्न हायस्कूलची शिक्षिका म्हणून पुण्यात काम करू लागली. पुढे एम० एड० झाली. भूगोल विषयाचे नैपुण्य मिळविले. 'आदर्श शिक्षक' म्हणून राज्य सरकारने तिचा गौरव केला. समाजसेवा, वाचन, वक्तृत्व ही तिची वैशिष्ट्ये!

दोन वर्षांपूर्वी लीला सेवानिवृत्त झालेली आहे. तिला कर्तबगार मुलगा आणि मुलगी आहे. गोड नातवंडे आहेत.

लीला आपल्या ताईला गुरू मानते. माहीत नाही, ताईमध्ये गुरुपणाचे काही आहे की नाही! पण मिळतो तो मान सोडा कशाला?

## माझा भाऊ मधू

माझा भाऊ मधू ऊर्फ सदाशिव बाळकृष्ण वाघ हा चार बहिणींच्या पाठीवरचा एकुलता एक मुलगा. आबांच्या झुकल्या वयात झालेला. त्यामुळे तो खूप लाडका. पण त्यामुळे आम्हा बहिणींना काही कमी पडले नाही. मधूच्यामध्ये व माझ्यामध्ये १२ वर्षांचे अंतर. मी मोठी ताई म्हणजे उपमाताच होय. मधूला मी कडेखांद्यावर खेळवले आहे. लहानपणी तो गोरापान, गुटगुटीत आणि सदा प्रसन्नमुख असायचा. त्यामुळे कोणीही उचलून खेळवायला घेऊन जायचे. घरी फारच थोडा वेळ असायचा.

इगतपुरीला आमचे शेजारी श्री० अंबिके यांचे बिऱ्हाड होते. ते रेल्वेत नोकरीला होते. तरुण आणि अविवाहित होते. हाताने स्वयंपाक वगैरे करायचे. मधूची स्वारी त्यांच्या घरीच खेळायची. पोळी-आमटीचा कुस्करा करून ते मधूला भरवायचे. ही आमटीची आवड मधूला शेवटपर्यंत होती.

मधू चारपाच वर्षांचा असताना मी ट्रेनिंग कॉलेमध्ये शिकत होते. एकदा माझ्याकडे दोनतीन दिवस तो राहिला होता. घरी गेल्यावर सांगायला लागला, "ताईची शाळा रात्री पण असते!"

एकदा मी सुट्टीला घरी आले होते. त्याने काही सांगितले ते माझ्याकडून झाले नाही. तेव्हा म्हणाला, "ताईला पाठवून द्या पुण्याला. तिची ट्रंक तिच्या डोक्यावर द्या!"



पुढे याच मधूचे ताईशिवाय पान हलत नव्हते!

इगतपुरीला पाऊस पुष्कळ. त्यामुळे घरांच्या छपरावर गवत उगवायचे. एकदा छोटा मधू म्हणाला,

"न्हाव्याकडून या घराची हजामत करून घ्या!"

अशा तऱ्हेने तो खूप काही बोलायचा. आता थोड्याशाच गोष्टी लक्षात राहिल्या आहेत.

एकदा अंगणात खेळत असताना टेकून ठेवलेल्या एका बैलगाडीवर चढला. वरच्या टोकाला गेला तर गाडी उलटली. पडला. एक खिळा हनुवटीत घुसला. हे दुखणे बरेच दिवस चालू होते. शेवटी कॉलेजमध्ये पुण्यास असताना त्याचा एक दात काढला, तेव्हा हनुवटीतून पू येण्याचे थांबले!

मधूचे शालेय शिक्षण नाशिकला व्यवस्थित झाले. त्याचेही मित्रमंडळ मोठे होते. सायकल चालवणे, पोहणे, आदी गोष्टी आईला नकळत त्याने केव्हाच आत्मसात केल्या होत्या. कारण आई भीतीच्या पोटी प्रत्येक गोष्टीस सदा नकार द्यायची. वयाच्या बाराव्या वर्षी ४० दिवसांच्या विषमज्वराने तो आजारी पडला. त्या वेळी आईने अक्षरशः हाताचा पाळणा केला. अगदी डॉक्टर सांगतील तशी शुश्रूषा केली. पथ्य पाळले. आणि सगळ्यांच्या हाताला यश आले. त्या वेळी 'उत्तम नर्स' म्हणून डॉक्टरांनी आईला शिफारसपत्र दिले.

१९३८ साली मधू मॅट्रिकची परीक्षा पास झाला आणि महाविद्यालयीन शिक्षणासाठी पुण्यास आला. आता मी, लीला आणि मधू असे तिघे आम्ही एकत्र आलो. जीवनाच्या अत्यंत खडतर काळामध्ये एकमेकांच्या सहकार्याने विशेष आखणीबद्ध जीवनक्रमामुळे आनंदात राहिलो.

लीला तुरुंगात गेली त्या वेळेला मधूने मनामध्ये फार हाय खाल्ली. त्या वर्षी तो नापास झाला. पुढे मात्र सर्व परीक्षा उत्तीर्ण होऊन इंजिनियर झाला. आई-आबांच्या डोळ्यांचे पारणे फिटले.

पी० डब्ल्यू० डी० खात्यातच नोकरी करीत असल्यामुळे मधूला परीक्षेचा निकाल लागण्यापूर्वीच ओव्हरसिअरची नोकरी मिळाली. महाराष्ट्राचे सर्व जिल्हे तो फिरला.

मधूने सिव्हिल इंजिनियरिंगचा अभ्यास केला होता. पण त्याला इरिगेशन विभागात काम करावे लागले. त्यासाठी त्याने विशेष अभ्यास केला. धरणासाठी योग्य जागा शोधण्यासाठी मैलच्या मैल नदीकाठाने प्रवास केले. योग्य आकडे, नकाशे गोळा केले. या सर्व कामाबद्दल सरकारकडून विशेष प्रशस्तिपत्र त्याला मिळाले होते. बढती मिळत मिळत तो शेवटी एक्झिक्युटिव्ह इंजिनिअर झाला. एवढेच की हे भाग्य बघायला आई-आबा नव्हते!

शासकीय वरिष्ठ मंडळींशी मधूचे जसे चांगले संबंध होते तसेच हाताखालची

माणसे, मजूर, धरणाच्या पाण्याखाली जमीन भिजणाऱ्या शेतीचे मालक, कॉन्ट्रॅक्टर इत्यादी सगळ्यांशीच त्याचे संबंध चांगले होते. त्यामुळे त्याच्या अकाली निधनाने वरपासून खालपर्यंत सगळेच हळहळले. शासनात राहूनही समाजसेवी कसे राहता येईल हे मधूने दाखवून दिले.

मधू कोणाकडून काही घेण्यामध्ये मात्र कमालीचा निःस्पृह होता. शासनाच्या शिपायाकडून कोणतेही खाजगी काम घ्यायचे नाही याबद्दल त्याचा कटाक्ष होता. कॉन्ट्रॅक्टर अगर इतर कोणाच्याही गैरमार्गाने येणाऱ्या पैशाला तो शिवला नाही. त्याला तशी 'ऑफर' करायला कुणी धजलेच नाही.

शेवटच्या दुखण्याच्या वेळी त्याची माणगावहून बदली झाली होती. म्हणजे माणगाव येथील काळ प्रकल्पाचे काम संपले होते म्हणून ते ऑफिस दुसरीकडे हालवायचे होते. रात्री रात्री जागून त्याने फाइली पूर्ण केल्या. सह्या करून दप्तर जागी पोहचविले आणि मग पुण्यास आला. थोडा आधी येता तर दुखणे एवढे विकोपास गेले नसते. पण कामापुढे कशाचीच पर्वा केली नाही!

रावळगावच्या चिंचोळीकरांची मुलगी ती माझी वहिनी. मधूला चार मुलगे आहेत. सुना-नातवंडे आहेत. भरल्या संसारातून दृष्ट लागावी तसा मधू वयाच्या अवघ्या ५६ व्या वर्षी अकाली निधन पावला. निवृत्तीच्या आधीच काळाने त्याला ओढून नेले, हे आमचे दुर्दैव!

मधू वडील मंडळींना खूप मान देत असे. ताई तर त्याला देवाच्या ठिकाणी होती. लांबचे काका, काकू, मामा, आजोबा या सगळ्यांची तो विचारपूस करीत असे. देवधर्मावर त्याचा विश्वास होता. पत्त्यामध्ये तो ब्रिज्कि-चँपियन होता. नोकरीच्या जागी समवयस्क मित्रांचा शनिवार क्लब होता. त्या संघाचा तो अध्यक्ष होता.

आपल्या परीक्षेचा शेवटचा पेपर देऊन आल्यावर त्याने मला सांगितले, "ताई, प्रापंचिक जबाबदारीतून तू आता मुक्त! तुला हवी ती समाजसेवा कर. पैसा कमी पडला तर तोही मी देईन."

आज जो काही माझा मोठेपणा वर्णन केला जात आहे त्यापाठीमागे माझ्या धाकट्या भावाने ही दिलेली प्रेरणा आहे. त्याच्यामुळे आजची मी झाले आहे.

आमच्या बोर्डी-कोसबाडच्या कामाकडे त्याचे सतत लक्ष असायचे. वेळी अभिनंदन तर वेळी सूचना करीत असायचा.

असा माझे सर्वस्व असणारा माझा धाकटा भाऊ १५ फेब्रुआरी ७८ रोजी माझ्यापासून अल्पवयात हिरावून नेण्यामध्ये दैवाने फार मोठा आसूड माझ्या पाठीवर मारला! इतर अनेक अप्रिय गोष्टी मी सहज पचवू शकले. पण ही जखम भरून येणे कठीण आहे! देवाला दोष देत नाही. पूर्वसंचित भोगणे प्राप्त आहे, असे म्हणते. दुसरे काय?



## पोपटपंची

आमच्या पाच भावंडांत मी सर्वात मोठी मुलगी. पुष्कळ दिवसांनी घरात आलेले मूल म्हणून माझे खूप लाड होत असत. पण शाळेत पाठविण्याबाबत लाडाने हयगय झाली नाही.

१९१५ चा सुमार होता. माझ्या वयाला ५ वर्षे पूर्ण झालेली होती. जळगाव जिल्ह्यातील भुसावळ येथे होतो. तेथल्या मुलींच्या सरकारी शाळेत माझे नाव घातले होते.

मला आठवते, मी कधीही शाळा चुकवली नाही. शाळा अकरा वाजता भरायची तर मी १० वाजल्यापासूनच शाळेच्या पायरीवर जाऊन बसायची.

विशेष म्हणजे, आईही मला सकाळी ९ वाजताच मऊ गुरगुटा भात खाऊ घालायची आणि शाळेसाठी तयार करायची. घरकामाच्या सबबीवर आम्हा मुलींची शाळा आमच्या आईने कधीच बुडविली नाही.

भुसावळच्या शाळेतील घडलेला त्या वेळचा एक प्रसंग मला आजही आठवतो. त्या वेळी आम्हांला "ग–गवताचा", "म–मक्याचा" असे सांगणारे एक 'प्रायमर' इयत्ता पहिलीला होते. एकदा मोठ्या बाई आमच्या वर्गावर आल्या होत्या. त्यांनी मुलींचे वाचन घेतले. मी घडाघडा वाचून दाखविले. त्यामुळे त्या खूष झाल्या. त्यांनी माझी पाठ थोपटली!

पण लहानपणचे माझे शिक्षण सुसंगत असे झालेच नाही. वडिलांच्या सारख्या बदल्या होत असत. कधी कधी तर आम्ही राहत असू तेथे फक्त आमचे व चौकीदाराचेच बिऱ्हाड असायचे. त्यामुळे कोठेच शाळा धड व्हायची नाही.

माझ्या शिक्षणातील ही अडचण लक्षात घेऊन पुढे माझी धाकटी बहीण व भाऊ यांच्या शिक्षणाचे वेळी वडिलांनी नाशिकलाच बिऱ्हाड केले.

माझ्या फिरत्या शाळांपैकी मोरगाव येथील शाळेची एक आठवण शिक्षकांना उद्बोधक वाटेल. त्या वेळी वार्षिक परीक्षेला 'डिपोटी' येत असत. फार कडक परीक्षा घ्यायचे म्हणे! म्हणून वर्गशिक्षक चांगली तयारी करून घेत. चांगली तयारी म्हणजे, विद्यार्थ्यांना पढवून ठेवायचे! तोंडी हिशेबाच्या परीक्षेत ३–४ हिशेब 'डिपोटी' घालायचे. मग एखादा हिशेब ते गुरुजींना घालायला सांगायचे. तो तरी सगळ्यांचा बरोबर यावा, म्हणून गुरुजी आदल्या दिवशीच तो हिशेब सांगून विद्यार्थ्यांकडून पाठ करून घेत असत.

आमच्या गुरुजींनी आम्हांला असाच एक हिशेब सांगितला : "रुपयाला २॥ शेर मिरच्या (६३ वर्षांपूर्वीचा दर!), तर १५ शेर मिरच्यांना काय पडेल?"

उत्तर—"६ रुपये!"

सर्वांचे तोंडपाठ! आदल्या दिवसापासूनच!!

प्रत्यक्ष परीक्षेच्या वेळी गुरुजींना काय वाटले कुणास ठाऊक! कदाचित अगदी आदल्या दिवसाच्या हिशेबातील सगळे शब्द तेच कसे सांगावे, असा त्यांना प्रश्न पडला असावा! गुरुजींनी हिशेब घातला,

"रुपयाला २॥ शेर उडीद, तर १५ शेर उडदांना काय?"

सबंध वर्गात माझ्या एकटीचेच उत्तर बरोबर आल्याचे मला आठवते!

'मिरच्यां'च्या जागी 'उडीद' आल्याबरोबर पोपटपंचीमुळे गाडे घसरले होते!

माझ्या हुशारीचा त्या शाळेला उपयोग नव्हता. मी तेथे काही महिन्यांपुरती, वडिलांची बदली होईपर्यंत, पाहुणी म्हणूनच होते. माझे त्या शाळेतल्या पटावरही नाव घेतलेले नव्हते!

## माझे लग्न आणि अपघात

माझे शिक्षणाचे नीट जमत नाही, असे लक्षात आल्यावर माझे लग्न करण्याचे ठरले. आमच्या आत्याबाईंचे पुतणे श्री० शंकर वामन जातेगावकर हे वर निश्चित झाले. त्यांना आई-वडील नव्हते. आमच्या आत्याबाईंना मूल नव्हते. तेव्हा भाचीच पुतणेसून झाली तर आत्याबाई दोघांचेही कौतुक करतील अशी आई-आबांची धारणा होती. आजोबांच्या देखत लग्न व्हावे म्हणून पण घाई होती. आमच्या आत्याबाई व आतोबा मात्र या संबंधास फारसे कबूल नव्हते. पण शेवटी नाइलाज झाला. दोन्हीकडचे कार्य करण्याची जबाबदारी आबांनी पत्करली.

पुणे येथे हा लग्नसोहळा पार पडला. पहिलीवहिली मुलगी म्हणून लग्न धूमधडाक्याने पार पडले. त्या वेळी म्हणजे १९२३ साली दोन हजार रुपये खर्च आला. वरातीच्या दिवशी मी सासरी गेले. तेवढेच सासरचे दर्शन! त्यानंतर मी लहान, नोकरीच्या गावी श्री० जातेगावकर एकटेच! तेही लहान. त्यामुळे बिऱ्हाड झाले नाही. पहिली दिवाळी आणि जावयाचा दिवाळसण थाटात झाला. त्या वेळी आमच्या आईने मनमाड (नोकरीचे गाव)ला येऊन बिऱ्हाड थाटून देण्याचे ठरविले. पण विधिलिखित निराळे होते. दिवाळीनंतर एका आठवड्यातच श्री० जातेगावकरांच्या निधनाची दुष्ट बातमी आली.

संध्याकाळच्या वेळी ते रेल्वेच्या कडेने फिरायला चालले होते. नांदगावहून मनमाडकडे एक इंजिन भरधाव वेगाने येत होते. विचाराच्या तंद्रीत यांनी इंजिनाचा आवाज ऐकला नसावा. इंजिनाचा वारा लागून ते रुळावर पडले. इंजिनखाली त्यांच्या चिंधड्या झाल्या. ओळख पटणे पण कठीण होते. खिशातील कागदपत्रावरून पत्ता शोधून, आबांना तार आली आणि इगतपुरीस आमच्या घरी दुःखाचा हलकल्लोळ उटला!

माझे वय तेव्हा साडेतेरा वर्षांचे होते. अजून वयात आले नव्हते. कथाकादंबऱ्या पुष्कळ वाचलेल्या. तरी पण स्वतःच्या संसाराची फारशी चित्रे रंगवली नव्हती. त्यामुळे हा आघात मोठ्या मंडळींना जाणवला, तितका मला जाणवला नाही!



माझे सासरचे नाव होते उमा. पण आज ते मला प्रयत्नपूर्वक आठवून सांगावे लागते.

केवळ अपघातानेच किंवा योगायोगानेच माझे यजमान माझ्या आयुष्यात आले होते आणि अपघातानेच निघून गेले! माझे आईवडील माझ्या यजमानांच्या मृत्यूने अत्यंत दुःखी झाले होते. त्यांच्या सांत्वनासाठी खूप लोक येत असत.

सर्व रडायचे म्हणून मीही रडायची. पण आपण का रडतो आहोत आणि इतके काय भयंकर आपल्या आयुष्यात घडले आहे, ते मात्र मला कळत नव्हते!

ज्या सासरी मी एकही दिवस रहायला गेले नव्हते त्या सासरला मी दुरावले म्हणजे काय घडले, ते मला या क्षणी समजलेच नव्हते!

## "मुलीला शिकवा!"

त्या दुःखाच्या दिवसांतच माझ्या आयुष्यात बदल घडवून आणणाऱ्या एक शिक्षिका मला भेटल्या. त्या शिक्षिकेचे नाव श्रीमती दुर्गाताई नेने. (विवाहानंतर त्यांचे आडनाव 'खरे' झाले.) आम्ही त्यांना माई म्हणत असू. माई माझ्या आईला म्हणाल्या, "जावयाच्या दुःखाने रडत बसू नका! मुलीला शिकवा."

माईंनी नुसता उपदेश केला नाही. त्यांनी मला आपल्याबरोबर विदर्भातील अकोला येथे शिक्षणासाठी नेले. माझ्यावर त्यांनी संस्कार केले. केवळ पुस्तकी शिक्षण दिले नाही. माझ्यातील सुप्त गुणांना हेरून त्या गुणांची जोपासना केली.

"पहाटे उठून गच्चीवर जायचे. दोन पाने निबंध लिहिल्याशिवाय खाली उतरायचे नाही!" असा त्यांचा कडक निर्बंध होता.

"पण रोज काय लिहू?" असे मी विचारले की त्या सांगत—

"तुला आठवेल ते काहीही!"

मग मी गच्चीवर बसून कितीतरी कल्पित गोष्टी लिहिल्या. संवाद लिहिले.

अशा तऱ्हेने लेखनाची सवय मला माईंनी लावली.

## वक्तृत्वाचा पहिला धडा

लेखनाबरोबरच भाषण करण्यास आणि माझी वक्तृत्वाची कला जोपासण्यास माझ्या गुरुवर्या माईच कारण झालेल्या आहेत.

अकोला येथे टिळक राष्ट्रीय शाळेतर्फे लो० टिळक जयंतीच्या दिवशी त्यांच्या चरित्रावर वक्तृत्वस्पर्धा आयोजित केली गेली होती. त्या स्पर्धेत मुलींना भाग घेता येत नव्हता. फक्त मुलांनाच स्पर्धक म्हणून भाग घेता येई.

लो० टिळक स्वर्गवासी होऊन फक्त ३-४ वर्षेच झालेली. त्यामुळे त्या काळातील लो० टिळक जयंतीस अपार महत्त्व. वातावरणही उत्साहाचे. त्याची कल्पना कदाचित आज येणारही नाही.

मी तर 'टिळक राष्ट्रीय कन्या शाळे'ची विद्यार्थिनी! मला वक्तृत्वस्पर्धेत संधी मिळालीच पाहिजे, असा आमच्या माईंचा आग्रह!

शेवटी संयोजकांनी माईंना सांगितले, "भाषण करण्यास परवानगी देऊ. पण स्पर्धक म्हणून बक्षिसासाठी विचार केला जाणार नाही!"

माईंनी मला ८ फुलस्केप कागदांवर लो० टिळकांचे विषयी चरित्रपर भाषण लिहून दिले. माझ्याकडून पाठ करवून घेतले. गच्चीवर जाऊन ते भाषण माझ्याकडून वदवून घेतले.

गच्चीवर लांब अंतरावर खुर्ची टाकून माई बसायच्या. मला दुसऱ्या टोकाला उभे ठेवून भाषण करायला सांगत. त्या काळी माईक, लाऊडस्पीकर्स नव्हते. त्यामुळे त्यांना ऐकू जाईल अशा पद्धतीने भाषण करावे लागे. "आवाजात चढउतार हवा, तोंडावर भाव हवेत," अशा माईंच्या सूचना असत. भाषणाची जय्यत तयारी करवून घेतली. मग स्पर्धेच्या वेळी मी भाषण केले.

परीक्षकांनी तोंडभरून माझी स्तुती केली. परीक्षक स्पर्धेनंतर म्हणाले,

"स्पर्धेत मुलींना भाग घेता येत नाही, या तांत्रिक अडचणीमुळे हिला बक्षीस देता येत नाही. पण नंबर कुणाचा आहे, ते सांगायला नकोच!"

परीक्षकांचे ते उद्‌गार मला अजून आठवतात. सभेत धीटपणे बोलण्याचा हा पहिला धडा मला आजही उपयोगी पडतो.

### अकोल्याहून आईने हलवले

अकोला येथे माईंच्या समर्थ मार्गदर्शनाखाली माझी जडणघडण होत होती. माझ्याबरोबर माझी धाकटी बहीण माई पण अकोल्यालाच शिकायला आली होती. दोघींचे कसे काय चालले आहे ते पाहायला आई धाकट्या लीला-मधूसह अकोल्याला आली. त्या काळात दोन लहान मुले संभाळून इगतपुरी ते अकोला एकट्या बाईने प्रवास करणे धाडसाचे होते. पण आमची आई धाडसीच होती!

अकोल्यास आल्यावर आईने चौकशी केली. तेव्हा तिच्या लक्षात आले की, येथे सर्व चांगले आहे; पण या शाळेतील शिक्षणाच्या आधारे व्ह० फा० च्या परीक्षेला बसता येणार नाही. अमरावतीस जाऊनही तिने चौकशी केली, तेव्हा तिची खात्री झाली. माझ्या पुढील आयुष्याचे निश्चित भवितव्य ठरवायचे असल्यास शासनमान्य परीक्षा देणेच योग्य आहे, हे लक्षात येताच तिने आम्हा दोघींना अकोल्याहून हलविले.



जळगावला तिचे काका श्री० चिंतोपंत पानसे हे पी० डब्ल्यू० डी० खात्यात काम करीत होते. जळगाव रस्त्यातच असल्यामुळे आईने आमच्यासह तिथे मुक्काम केला. अकोल्याची हकिगत सांगितली. तेव्हा काका-काकूंनी मला जळगावलाच ठेवून घेतले. म्युनिसिपल शाळेत माझे नाव घातले. पण तेथील हवा मला सोसली नाही. सगळ्या अंगावर वेंडे आली. मग मला इगतपुरीला पोचविण्यात आले. पुन्हा अभ्यासात खंड! पण इ० सहावीची म्हणजे व्ह० फा० ची परीक्षा जवळ आली होती. मुलांच्यासाठी इ० सातवीतून व्ह० फा० ला बसावे लागत असे. मुलींच्यासाठी इ० सहावीतून बसता येत होते. १९२५ हे मुलींच्यासाठी सुरू झालेल्या व्ह० फा० परीक्षेचे दुसरे वर्ष होते. इगतपुरीच्या मुलींच्या शाळेच्या मोठ्या बाईंनी मला व्ह० फा० परीक्षेत बाहेरून बसविण्याची जबाबदारी घेतली. माझी शिकवणी सुरू झाली. असा अभ्यास, पेपर सोडविणे वगैरे सर्व गोष्टी मला नव्या होत्या. महिना नक्की आठवत नाही, पण एप्रिल १९२५ असावा.

नाशिक येथे परीक्षेसाठी जावे लागले. शिवणकाम परीक्षेला होते. मोजक्या वेळात पोलके बेतून शिवायचे होते. मी सात-आठ सुया ओवून नेल्या होत्या ते आठवते. तसेच मोडीवाचनाची तोंडी परीक्षा होती. मला मोडी चांगले येत होते. त्यामुळे मी धडाधड वाचून दाखवले. सगळे पेपर चांगले गेले. पण निकाल काय येणार वगैरे कल्पना नव्हती. त्या वेळी वर्तमानपत्रात निकाल देण्याची पद्धती नव्हती. तसेच निकाल पाहण्याची कोणाला घाई पण नव्हती. बरेच दिवस काही कळले नाही, तेव्हा ही नापास झाली असेल अशीच सर्वांची कल्पना. पुढे आबा काही कामासाठी नाशिकला गेले होते, तेव्हा सहज चौकशी करावी म्हणून शिक्षण कार्यालयात गेले. तेथे मंडळी त्यांचे अभिनंदन करू लागली. "—कशाबद्दल?" "तुम्हांला माहीत नाही? तुमची मुलगी पहिली आली आहे!" आबांना अर्थात आनंद झाला.

आता ट्रेनिंग कॉलेजमधील प्रवेशाची घाई— पण वेळ निघून गेली होती. तेव्हा लोकल बोर्डातर्फे जाणाऱ्यांनाच कॉलेजमध्ये प्रवेश मिळत असे. पण या वर्षीच्या सर्व जागा भरल्या होत्या. १५ रु० स्कॉलरशीप होती. आबांनी सांगितले, "स्वखर्चाने पाठवा." पहिल्या नंबरची मुलगी म्हणून मग माझी स्वखर्चाने निवड झाली.

कॉलेजमध्ये पोचेपर्यंत नाताळची सुट्टी संपली. दोन महिने उशिरा म्हणजे १९२६च्या जानेवारीमध्ये मी लाल देवळाजवळील वुइमेन्स ट्रेनिंग कॉलेजात प्रवेश केला. वय वर्षे १६ होते. पुढे मात्र, रुक्मिणी क्षीरसागर या विद्यार्थिनीस माझ्यासारखाच स्वखर्चाने प्रवेश देण्यात आला. तिच्या मामाच्या खटपटीने तिला स्कॉलरशीप देण्यात आली. त्या वेळी आधी प्रवेश घेतलेली पहिल्या नंबरची मुलगी म्हणून मला आपोआपच स्कॉलरशीप मंजूर झाली. ४५ रुपयांची एकदम मनिऑर्डर पाहून मी साश्चर्य आनंदित झाले.

## ट्रेनिंग कॉलेजातील सोनेरी वर्षे

परीक्षा देण्याचा हा तसा माझा पहिलाच प्रसंग! त्यामुळे नंबरानंबराची काही अपेक्षा नव्हती. पास झाले तरी पुरे, एवढीच माफक अपेक्षा होती.

पण गोड अपेक्षाभंग झाला. अपेक्षेबाहेर यश मिळाले.

जिल्ह्यात मी पहिली आले!

मला तेव्हापासून नंबराची चटक लागली!

आमच्या वेळी इयत्ता सहावीतून मुली व्ह० फा०च्या परीक्षेला बसत असत. त्यामुळे ट्रेनिंग कॉलेजचा तीन वर्षांचा कोर्स असे. (ज्युनिअर फर्स्ट इयर, सिनिअर फर्स्ट इयर आणि सेकंड इयर अशी ती तीन वर्षे.)

१९२६ ते १९२९ अशी तीन वर्षे मी ट्रेनिंग कॉलेजात घालवली. हा तीन वर्षांचा काळ म्हणजे माझ्या आयुष्यातील सोनेरी वर्षेच असे मी मानते. त्या तीन वर्षांतील असंख्य आठवणी आजही माझ्या मनात ताज्या आहेत.

### "तू लेखिका होशील!"

मला आठवतेय, मी इतरांपेक्षा दोन महिने उशिराच विद्यालयात दाखल झाले होते. मी खेडेगावाहून पुण्यासारख्या शहरात शिकण्यास आलेली होते. इतर मुलींच्या दृष्टीने बावळटच दिसत होते! इतर काही मुलीही खेड्यांतून आलेल्या होत्या, पण माझ्या आधी दाखल झाल्यामुळे त्या रुळलेल्या होत्या.

पहिली सहामाही परीक्षा झाली. माझ्या सहाध्यायिनींना आणि प्राध्यापक मंडळींना मी चकितच केले होते. मी सर्वच विषयांत पहिल्या क्रमांकाचे मार्क्स मिळविले होते!

निबंधात मला पैकीच्या पैकी मार्क्स मिळाले होते. वर्गभगिनींनी त्याबाबत शिक्षकांकडे तक्रार केली. शिक्षकांचे नाव होते श्री० मोकाशी गुरुजी.

गुरुजींनी माझ्या वर्गभगिनींना दिलेले उत्तर आजही मला आठवत आहे.

गुरुजी म्हणाले होते, "ज्या वेळात तुम्ही ६ अर्धे कागद लिहिलेत त्याच वेळात तिने अकरा पूर्ण कागद लिहिले आहेत. ही एकच गोष्टसुद्धा तिला पूर्ण मार्क्स द्यायला हरकत नसल्याचे सांगते. शिवाय विषय-मांडणी, भाषा वगैरे!" असे म्हणून ते थांबले नाहीत. त्यांनी सर्वांसमक्ष मला आशीर्वाद दिला,

"तू लेखिका होशील!"

मी आयुष्यात मोठी लेखिका झाले नाही. परंतु लहानशी जी काही पुस्तके लिहिली तीही पाहायला आमचे मोकाशी गुरुजी आज हयात नाहीत, याची मला खंत वाटते.

पहिल्या सहामाही परीक्षेनंतर माझ्यावरचा बावळटपणाचा शिक्का पुसला गेला!



वक्तृत्व, नाट्य, खेळ या सर्वच क्षेत्रांत मी भाग घेतला. त्यामुळे शिक्षकांची मी आवडती बनले.

### "शिवणकामात ही मद्दड होती!"

मला फक्त जमत नव्हते ते शिवणकाम! त्या विषयाच्या आमच्या सिपोराबाई फारच कडक होत्या. टीप, धावदोरा सारखा येण्यासाठी कागदाच्या पट्टीचे माप देत असत.

"मुरडीचे टाके तिरपे आणि सारखेच आले पाहिजेत" असा आमच्या बाईंचा दंडक होता.

एक एक टाका लक्षपूर्वक घालूनही क्वचित एखादाच वेडावाकडा आला की बाई सगळा नमुनाच कापून टाकीत! पुन्हा नवीन तुकडा घ्यावा लागे. मला अगदी रडू यायचे. पण तसेच रेटले.

माजी विद्यार्थिनी म्हणून मी पुढे एकदा आमच्या सिपोराबाईंना भेटायला गेले होते. बाईंनी मला प्रेमाने जवळ बसवून घेतले. विद्यार्थिनींना सांगितले,

"ही अनसूया! शिवणात मद्दड होती; पण तयार झाली! छान मार्क मिळविले!"

### वक्त्यांपासून वाचवणारा छंद

आणखी एका विषयात मी कच्ची होते. तो म्हणजे चित्रकला. मला सरळ रेषा कधी ओढता यायच्या नाहीत. पण आमचे चित्रकलाशिक्षक श्री० जोशी फार मेहनती होते. ते माझ्याकडे विशेष लक्ष देत.

हळूहळू मला चित्रकला विषयाची गोडी लागली. शेवटची परीक्षा झाली. त्यानंतर एकदा पुण्यातच जोशी गुरुजी मला भेटले होते. त्या वेळी ते म्हणाले होते,

"अनसूया, तुला माहीत आहे का? चित्रकलेच्या परीक्षेत तुझा दुसरा नंबर होता!"

मला स्वतःला चित्रे फारशी काढता येत नाहीत. पण लोकांनी काढलेली पाहायला फार आवडतात. फावल्या वेळात रेघोट्या ओढत बसण्याचा मला छंद आहे. सभा चालू असताना समोरचा वक्ता जेव्हा रटाळ बोलून वेळेचा अपव्यय करू लागतो, तेव्हा अजूनही नकळतपणे माझ्या हातातून समोरच्या कागदांवर चित्राकृती निर्माण होऊ लागतात!

आज माझ्या मुक्त चित्रकलेचा छंद मला नको वाटणाऱ्या वक्त्यांच्या तावडीतून माझी मुक्तता करतो!

### निसर्ग-निरीक्षणाचे पहिले धडे

निसर्ग-निरीक्षण हा माझा अत्यंत आवडीचा विषय. आमच्या शिक्षिका श्रीमती मेरीबाई आम्हांला संगमावर पक्षी पाहायला घेऊन जायच्या.

"हळूच पाऊल टाका. बोलायचे नाही!" वगैरे सूचना मेरीबाई देत असत.

त्या वेळी खूप पक्षी पाहायला मिळाले. तीस पक्ष्यांची चित्रे आम्ही प्रत्येकीने त्या वेळी काढली होती. त्या वेळी पक्षी पाहण्याचा नाद मला लागला तो अजूनही आहे.

## माझ्या मैत्रिणींची मी शिक्षिका बनले!

हळूहळू माझा मैत्रिणींचा घोळका वाढू लागला. व्याकरण, कवितेचा अन्वय, अर्थ आणि गणित हे विषय मला आवडायचे. तेच नेमके माझ्या मैत्रिणींचे नावडते विषय असायचे! मग काय, वर्गात गुरुजी नसले की मैत्रिणी मला त्यांच्या अडचणी सांगत. मी गुरुजींनी शिकविलेले सगळे पुन्हा शिकवून दाखवायची. माझा वर्ग चालू व्हायचा!

मी शिकविलेले माझ्या मैत्रिणींना समजायचे. गुरुजींनी शिकविलेले त्यांना जे समजत नव्हते ते मी माझ्या तोकड्या ज्ञानाने शिकविले असता त्यांना समजते कसे, याची त्या वेळी मला गंमत वाटायची.

माझे ज्ञान तोकडे असले तरी समवयस्क असल्याने मी चटकन त्यांच्या पातळीवर जाऊन त्यांच्या अडचणी सोडवू शकत होते. प्राध्यापकांपेक्षा मी त्यांना अनेकदा जवळची आणि सुलभ वाटत होते.

मला आठवतेय, पुढे पुढे प्राध्यापकमंडळीही माझ्याकडे कोणाकोणाला एखादा विषय समजावून घेण्यासाठी पाठवू लागली होती!

या संदर्भातील एक महत्त्वाचे शैक्षणिक तत्त्व नंतर मला उलगडले!

माननीय डॉ० चित्राताई नाईक, माजी शिक्षणसंचालिका आणि शिक्षणतज्ज्ञ, यांचे म्हणणे असे आहे की वरच्या वर्गातील विद्यार्थ्यांनी खालच्या वर्गातील विद्यार्थ्यांना शिकवावे!

आमच्या कोसबाडच्या प्राथमिक शाळेत हा प्रयोग मी मधूनमधून करते. हा प्रयोग अत्यंत यशस्वी ठरतो.

एरवीसुद्धा जेव्हा घरी मोठे भाऊ-बहिणी त्यांच्या लहान भावंडांना शिकवितात तेव्हा त्यांना ते लवकर समजते. दोघांच्या समजशक्तीत फार थोडे अंतर, हे त्याचे कारण असते.

## पहिलीवहिली शाबासकी

प्रशिक्षणकाळात पाठ पाहणे, पाठ देणे हे एक महान काम असते. सूचना घेणे, टाचण दाखवणे, प्रत्यक्ष पाठ घेणे, उणिवा किंवा टीका समजावून घेणे, एवढा सोपस्कार एकेका पाठामागे असायचा.



पहिल्या वर्षी आठवड्यातून एक पाठ, दुसऱ्या वर्षी दोन पाठ आणि तिसऱ्या वर्षी एकेका विषयाचे पाच पाठ असत.

पुरुष प्राध्यापकांकडून मला नेहमीच ७५ ते ८० पर्यंत मार्क्स मिळत असत. पण स्त्री प्राध्यापिका मार्कांच्या बाबतीत अगदी कंजूष! ५५ मार्क्स दिले की खूप दिले असे त्या मानीत असत! आमच्या प्राचार्या मिस नवलकर ह्या तर मार्कांच्या बाबतीत फारच चिकट होत्या! (पाठाचे निरीक्षण त्या अतिशय चिकित्सक बुद्धीने करीत असे आपण म्हणू या!)

माझे इयत्ता पाचवीच्या वर्गाचे भूगोलाचे पाठ त्यांच्याकडे होते. सूचना देताना त्या इतक्या काळजीपूर्वक द्यायच्या की माझा भूगोल नावडता विषय होता तो आता परमप्रिय विषय झालेला आहे!

माझ्या भूगोलाच्या पाचव्या पाठाच्या वेळी त्या माझ्यावर फारच खूश झालेल्या होत्या. मला त्यांनी अनपेक्षितपणे विचारले,

"अनसूया, तुला किती मार्क देऊ?"

"तुम्हांला द्यायचे असतील तेवढे द्या—" मी म्हटले.

त्यांनी ७० मार्क्स दिले!

माझ्या आयुष्यात नंतर मला शिकविण्याच्या कलेबद्दल अनेक शाबासक्या मिळालेल्या आहेत. पण ही पहिलीवहिली शाबासकी मी कधीच विसरू शकणार नाही!

मला आठवते आहे, पाठ जमत नसणाऱ्या विद्यार्थिनींना मिस नवलकर माझ्या स्वाधीन करीत असत आणि मला सांगत,

"यांची तयारी करून घे!"

## नमुना-पाठाचा सोहळा

आमच्या वेळी पाठांची वार्षिक परीक्षा घेण्यासाठी बाहेरची परीक्षक मंडळी येत असत. पुष्कळ जोड्या असायच्या. मार्कांत सुसूत्रता यावी म्हणून पहिले तीन पाठ सगळी मंडळी एकत्र बसून बघायची. नंतर आपसात चर्चा करून मार्क देण्याचे सूत्र ठरवीत असत.

हे सगळे कशासाठी होते हे त्या वेळी समजत नसे. आज कळते. पण त्या वेळी 'तीन नमुना-पाठ' हा आम्हांला एक सोहळाच वाटत असे.

नमुना-पाठातील पहिला पाठ माझाच असायचा. त्याप्रमाणे शेवटच्या वर्षीही माझाच पहिला पाठ होता.

आमच्या प्राचार्या पाठांच्या परीक्षेपूर्वी सर्वच विद्यार्थिनींच्या टाचणांवरून स्वतः नजर टाकीत. जरूर त्या विद्यार्थिनींकडून त्यांच्यासमोर पाठ वदवून घेत.

शेवटच्या वर्षीच्या माझ्या पाठाच्या आदल्या रात्रीचा प्रसंग मला आठवतोय.

माझा पाठ तयारच असणार असे गृहीत धरून आमच्या प्राचार्यांनी मला बोलविले. रात्रीचे १० वाजून गेले होते. 'घनफळाची कल्पना देणे' हा माझ्या पाठाचा विषय होता.

प्राचार्यांनी माझे टाचण पाहिले. पाठाचे साधन पाहिले. टाचण त्यांना आवडले नाही! साधन मनपसंत वाटले नाही! पुन्हा सगळ्या सूचना दिल्या.

प्राचार्या पहाटे उठल्या. ब्रुक बाँड चहाचा घनाकार डबा मागवला. एक इंची नऊ घन मागविले. ते डब्यात भरून दाखवता दाखवता घनफळाची कल्पना कशी द्यावयाची ते मला समजावून सांगितले.

या सगळ्या ऐनवेळच्या भानगडीमुळे मी गडबडून जाईन असे प्राचार्यांना वाटले. वेळही थोडाच आहे, असे त्यांना जाणवले. त्यांनी माझा पाठ पहिला होता तो तिसरा लावला! रत्ना बुगटे या माझ्या मैत्रिणीचा पाठ दुसरा होता. तिला पहिला पाठ घेण्यास सांगितले.

रत्ना बुगटे नाराज झाली. माझा व प्राचार्या मिस नवलकर यांचा तिला रागच आला. ती गाल फुगवून मला ऐकू जाईल असे मोठ्याने म्हणाली,

"आम्हांला कमी मार्क मिळाले तरी चालतील काय? आपल्या लाडक्या विद्यार्थिनीला मात्र खूप मार्क मिळाले पाहिजेत!"

त्या संध्याकाळी मग मी रत्ना बुगटेची समजूत घातली. "अग, बाईंच्या दृष्टीने कॉलेजच्या प्रतिष्ठेचा प्रश्न होता. सर्व ट्रेनिंग कॉलेजेसमध्ये आपल्या कॉलेजची विद्यार्थिनी पहिली आली पाहिजे, ही बाईंची महत्त्वाकांक्षा आहे. आपल्याला पण आपल्या कॉलेजचा अभिमान आहे ना? नंबर येण्यासाठी सगळ्याच विषयांत व प्रॅक्टिकल्समध्ये चांगले मार्क मिळाले पाहिजेत ना?" अशा शब्दांत मी तिला समजावले.

तिचा राग गेला. त्या दिवशी कॉलेजमधल्या हौदावर बसून आम्ही भावी आयुष्याबद्दल खूप बोललो होतो, असेही आता आठवते. गंमत म्हणजे "एक आदर्श शिक्षणसंस्था आपण चालवू या," असे आम्ही त्या वेळी म्हटले होते. माझा मनोरथ देवाने पूर्ण केला. माझी मैत्रीण मात्र संसारात अडकली.

## 'काका'च्या भूमिकेत

आमच्या विद्यालयात विद्यार्थिनींची समिती होती. 'वनिता समाज' असे त्या समितीचे नाव होते. वाचनालय चालविणे, निबंधवाचन करणे आणि वार्षिकोत्सव (गॅदरिंग) करणे ही कामे वनिता समाजातर्फे केली जात असत.

वार्षिकोत्सवातल्या लहान लहान नाट्यप्रवेशांत मी भाग घेत असे. कार्यक्रमासाठी श्री० कारखानीस गुरुजी नाट्यप्रवेश लिहून देत असत. मी पण थोडेफार लिहीत असे. तिसऱ्या वर्षी वनिता समाजाच्या चिटणिसाचे काम माझ्याकडे आले होते.



वार्षिकोत्सवातील एकवर्षीच्या कार्यक्रमास एक युरोपियन पाहुणे आलेले होते. 'कृष्णाकुमारी' हा नाट्यप्रवेश होता. त्या प्रवेशात कृष्णाकुमारीला विष देणाऱ्या काकाचे काम मी केले होते.

युरोपियन पाहुण्यांस मराठी येत नव्हते. पण तरीही माझे काम त्यांना आवडले. 'काका' या नावानेच ते मला ओळखू लागले!

## मी वीरबाला बनले

आमच्या विद्यालयात कामास प्रारंभ करण्यापूर्वी सर्वांनी एकत्र येऊन उभ्याने प्रार्थना करण्याची पद्धत होती. आमच्या वेळची प्रार्थना म्हणजे इंग्लंडच्या राजाचा गौरव करणे! त्या प्रार्थनेत म्हटले जाई,

"भो पंचमजॉर्ज भूप धन्य धन्य,
विबुधमान्य, सार्वभौम भूवरा।
बहुतकाळ तूचि पाळ ही वसुंधरा।"

मी प्रार्थनेला सर्वांप्रमाणे उभी राहत असे; परंतु प्रार्थना म्हणत नसे. कोणातरी प्राध्यापकांच्या ते लक्षात आले. त्यांनी मला आमच्या प्राचार्यांपुढे उभे केले. प्राचार्यांनी मला विचारले,

"तू प्रार्थना का म्हणत नाहीस?"

"मला ती आवडत नाही!"

"का?"

"कारण, परक्या माणसाने बहुतकाळ आमची वसुंधरा पाळणे हे मला आवडत नाही!"

"मग तुला काय आवडते?"

"देवाची स्तुती करायला! तो सगळ्यांचा प्रतिपाळ करतो!"

ती प्रश्नोत्तरे आजही मला स्पष्ट आठवतात. विशेष म्हणजे त्या प्रश्नोत्तरांमुळे माझ्यावरील माझ्या शिक्षकांचे प्रेम यत्किंचितही कमी झाले नाही. कोणताही अनिष्ट परिणाम झाला नाही. आज वाटते की, त्या काळाच्या मानाने मी केवढा धीटपणा दाखवला होता!

राष्ट्रप्रेमाची आणि धीटपणाची ही वृत्ती माझ्यात त्या वेळी कोठून आलेली होती? असा प्रश्न क्षणभर पडतो. पण अकोल्याच्या लो० टिळक विद्यालयात माईंनी जे अल्पकाळात राष्ट्रीय वृत्तीचे संस्कार केले ते आयुष्यभर पुरले आहेत!

राष्ट्रप्रेमाची ही जाणीव त्या काळात मनात तीव्रतेने होती. अनेक प्रसंगांत ती उफाळून वर येऊ पाही.

गर्ल गाईड्समध्ये भाग घेण्याच्या एका प्रसंगाची मला या संदर्भात आठवण होते.

आमच्या विद्यालयातील सर्व कार्यक्रमांत हिरिरीने भाग घेणारी मी विद्यालयातल्या गर्ल गाईड पथकात प्रथम गेलेच नाही.

प्राचार्यांनी मला बोलावून विचारले, "अनसूया, तू मागे कशी?"

"गर्ल गाईड्सचे बाकी सर्व चांगले आहे; पण—"

"पण काय?"

"पण त्यातल्या त्या तीन शपथा आहेत ना, त्या मला आवडत नाहीत! त्या मी घेऊ शकणार नाही!"

"का?"

"कारण त्या, जेथे गाईड्सची मोहीम सुरू झाली त्या देशाला उद्देशून आहेत. 'मी राजनिष्ठ राहीन' वगैरे. आमच्या देशासाठी आम्हांला योग्य अशा शपथा हव्यात!"

माझे त्या वेळचे ते उत्तर कितपत सयुक्तिक होते हे मला त्या वेळीही नीटसे कळले नाही. अजूनही पुरता उलगडा झाला आहे असे नव्हे. पण सगळ्याच शिक्षकांनी आग्रह केल्यामुळे माझा आग्रह सोडून गर्ल गाईड्स पथकात दाखल होऊन मी 'वीरबाला' बनले खरी!

## मी गुरु-आज्ञेने पाव खाल्ला!

आमच्या द्वितीय वर्षात आम्ही फक्त १९ जणीच होतो. बऱ्याच शिक्षकांच्या बदल्या झाल्या होत्या. रिकाम्या तासाला श्रीमती नवलकर स्वतः वर्ग घ्यायच्या. सगळ्याच विषयांत त्यांचा हातखंडा होता. आमचा वर्ग त्यांच्या ऑफिसशेजारी असायचा. त्यामुळे चटकन आमच्या वर्गावर येणे त्यांना शक्य होत असे. तेव्हा आमच्या वर्गाशी त्यांची खूपच जवळीक झाली. विशेषतः माझ्यावर त्यांची अपार माया जडली. काही किरकोळ पोटाच्या दुखण्याने मी आजारी पडले तर स्वतः लक्ष घालून त्यांनी उपचार करविले. पुढे सकाळी चहाबरोबर पाव खाण्यासाठी त्या स्वतःच्या घरीच मला बोलावू लागल्या. तोपर्यंत पाव मी खाल्ला नव्हता. पण त्यांच्या आग्रहाने खावा लागला. माझ्या खेडवळ मनाला पाव खाणे हे अभक्ष्य-भक्षण वाटत होते. पण गुरु-आज्ञा मोडायची नाही ही माझ्या मनाला लागलेली शिस्त आहे.

## मला पुन्हा जेवावे लागले!

मला भरभर जेवायची सवय होती. आमच्या जेवणाच्या वेळी श्रीमती नवलकर दाराशी येऊन उभ्या राहायच्या. त्या खिश्चन होत्या. आमच्या स्वयंपाकाच्या बायका सोवळ्या ब्राह्मण होत्या. त्यामुळे सर्वात मोठ्या अधिकारी असूनही श्रीमती नवल-



करांना विशिष्ट मर्यादेच्या आत प्रवेश नव्हता. त्यामुळ्वा ही मर्यादा ओलांडत नसत. निरनिराळ्या बाजूंच्या दारांत उभे राहून चौकशी करायच्या.

सगळ्या मुली भात कालवत असत, तोपर्यंत मी सगळे जेवण आटपून ताट घेऊन बाहेर पडायची! श्रीमती नवलकरांना ती गोष्ट कळली असावी. त्या दारात येऊन मला अडवायच्या. पुन्हा दुसरे ताट घेऊन जेवायला लावायच्या!

## टाळ्यांचे गुपित

कॉलेजच्या व्हरांड्यात एकांतजागा म्हणून मी अभ्यासाला बसायची. श्रीमती नवलकरांना कोणाला बोलवायचे असल्यास त्या वरून टाळ्या वाजवायच्या. त्या ऐकल्या की मी धावत पुढे जाऊन "काय?" म्हणून विचारायची.

या गोष्टीची आम्हांला इतकी सवय झाली की, एखाद्या टाळीला माझ्याकडून प्रतिसाद न मिळाल्यास त्या लगेच चौकशी करायच्या. मलाही एखाद्या दिवशी टाळी ऐकायला मिळाली नाही की चुकल्याचुकल्यासारखे वाटायचे. मग मुली आणि मेट्रन म्हणायच्या, "वसतिगृहात दीडशे मुली आहेत, तुम्हांला फक्त अनसूयाच हवी असते का?"

त्या म्हणायच्या, "असं मुळीच नाही. पण ती चटकन पुढे येते. दुसऱ्या मुली का येत नाहीत?"

श्रीमती नवलकरांच्या या टाळ्या माझ्या इतक्या लक्षात राहिल्या आहेत की, आता मला माझ्या समोरच्या कन्या-वसतिगृहातील मुलींना बोलवायचे असल्यास मी टाळ्या वाजवते. चटकन कुणीतरी मुलगी धावत येते. माझ्याशी बोलत असणाऱ्या पाहुण्यांना याची फार गंमत वाटते.

## पंक्तिप्रपंच

मी सेकंड ईयरमध्ये होते त्या वेळची गोष्ट. एकदा मला प्राचार्यांकडून बोलावणे आले. मी भीतभीतच गेले. कारण, संदर्भ माहीत नव्हता. त्या वर्षी एका हरिजन मुलीला प्रवेश मिळला होता. तिला सर्वांबरोबर जेवायला बसवणे, झोपायला घेणे, स्नानगृहात घेणे या बाबतींत त्यांच्यापुढे प्रश्न आला होता. कारण, खूप जुने विचार आणि सोवळे-ओवळे तेथे अजून होते.

मी मुलींची पुढारी म्हणून मला विश्वासात घेऊन हे कार्य त्यांना करायचे होते. आमच्या घरी पहिल्यापासून शिवाशीव नव्हती, म्हणून या गोष्टीचे मला प्रथम आश्चर्यच वाटले! "ती मुलगी आमच्यामध्येच राहील," मी म्हटले.

पण मग दिसून आले, ही गोष्ट तितकीशी सोपी नव्हती. पुष्कळ जमवून घेतले तरी जेवणाची पंगत व स्नानगृह वेगळे ठेवावेच लागले. मी मात्र त्या मुलीच्या पंक्तीस बसू लागले.

या शिवाशिवीबद्दल या ट्रेनिंग कॉलेजच्या माझ्या आधीच्या काही गंमती ऐकायला मिळत असत. मुलींसाठी ट्रेनिंग कॉलेज सुरू झाले. मुली कमी शिकलेल्या असायच्या. त्यांना प्रवेश देऊन पहिल्या वर्षी इयत्ता सहावीपर्यंतचा अभ्यास पूर्ण करून घ्यायचा. हा प्रिपरेटरी वर्ग. १९२४ सालापासून मुलींसाठी व्ह० फा० परीक्षा सुरू झाली व हा प्रिपरेटरी वर्ग बंद झाला.

आता मी सांगते ती प्रिपरेटरी वर्गाच्या वेळची गोष्ट. मुली वर्गातसुद्धा मासिक-पाळीच्या वेळी बाजूला बसायच्या. शिक्षक पुरुषच होते. ते लांबून पाटी टाकायचे.

आता ५५ वर्षांनंतर या आठवणी गंमतीदार वाटतात.

### कोठपर्यंत अभ्यास झाला ?

बऱ्याच शिक्षकांच्या बदल्या झाल्या आणि नवे शिक्षक आले. कोणत्याही विषयाचे शिक्षक असो, "मागे कोठपर्यंत अभ्यास झाला ?" या त्यांच्या प्रश्नाचे उत्तर मलाच द्यावे लागे. सगळयात आश्चर्य वाटले ते गायनशिक्षकांचे. मला गाणे अजिबात येत नाही. त्यातले काहीच कळत नाही. पण गायनशिक्षकांनीही "मागे कोठपर्यंत अभ्यास झाला ?" अशी चौकशी माझ्यापाशी केल्यावर काय उत्तर द्यावे मला कळेना !

नंतर कळले की श्रीमती नवलकरांनीच सर्व शिक्षकांना अभ्यासाची चौकशी माझ्याकडे करण्यास सुचविले होते !

### माझ्या मोडी वह्या तयार झाल्या

आमच्या परीक्षेसाठी भूगोल विषयाला पुस्तक नव्हते. गुरुजींनी या विषयासाठी टिप्पणी लिहून काढल्या होत्या. त्यांच्या वह्या १९ मुलींच्यात फिरायच्या. आपल्याला या वह्या केव्हा मिळणार, असा प्रश्न मला पडला. मग मी गुरुजी बोलत असताना त्यांच्या तोंडून निघणारा शब्द न् शब्द लिहून घेऊ लागले. देवनागरीत लिहिणे जमेना. मग मोडीत लिहिण्यास सुरवात केली.

गुरुजींसारख्याच माझ्या मोडी वह्या तयार झाल्या. वर्गातल्या मोडी जाणणाऱ्या काही मुलींना त्या मग उपयोगी पडल्या.

### निरोप

१९२६ ते २९ ही आयुष्यातील निर्भेळ आनंदाची तीन वर्षे ट्रेनिंग कॉलेजने मला दिली. हा आनंदाचा काळ स्वप्नासारखा भुर्रकन उडाला.

सर्व प्राध्यापक मंडळींनी आम्हांला अत्यंत प्रेमाने निरोप दिला.

प्राचार्या मिस नवलकर यांनी मला आईची ममता दिली. माझ्या व्यक्तिमत्त्वाला आकार दिला. माझ्या गुरुमालिकेत प्राचार्या मिस नवलकर यांना अत्यंत महत्त्वाचे स्थान आहे.



ट्रेनिंग कॉलेजचा निरोप घेणे सोपे नव्हते !

शेवटच्या वर्षी आम्ही १९ विद्यार्थिनी वर्गात होतो. आम्ही जिवाभावाच्या मैत्रिणी होतो. परस्परांचा निरोप घेऊन आपापल्या घरी परत जाताना आम्हांला किती जड गेले असेल !

मी घरी आल्यावर दर आठवड्याला मला १८ जणींची पत्रे यायची. तेवढ्या साऱ्यांना मी उत्तरे पाठवायची. माझा हा सारा पत्रव्यवहाराचा व्याप पाहून आबा मला एकदा म्हणाले,

"माझ्या सगळ्या आयुष्यात मी जेवढी पत्रे लिहिली नाहीत, तेवढी पत्रे ही ताई एका आठवड्यात लिहिते !"

पत्र लिहिण्याचा आणि वाचण्याचा छंद मला त्या वेळी जो जडला तो अजूनही कायम आहे.

### मी मुख्याध्यापिका बनले

१९२९ साली मी प्राथमिक शिक्षक प्रमाणपत्र परीक्षा दिली. १९३० पासून माझा नियमित शिक्षकी पेशा सुरुही झाला. त्या वेळी माझे वडील नाशिक जिल्ह्यातील चांदवड येथे होते. जिल्हा लोकल बोर्डामार्फत त्या काळी शाळांचे काम चालत असे. मुख्याध्यापिका म्हणून माझी नेमणूक मी चांदवड येथेच मागून घेतली.

नुकतेच प्रशिक्षण झालेली मी मुख्याध्यापिका होते. उत्साह ओसंडत होता. डोक्यात नवनवीन कल्पनांचे भांडार होते. शाळा इयत्ता सहावीपर्यंतच होती. माझ्यासह दोनच शिक्षिका होत्या.

मुलींना शाळेत बोलावून आणावे लागे. त्या कामासाठी एक मदतनीस बाई होत्या. त्या माझ्या मागे मागे सारख्या लुडबुड करायच्या. "हे काम करू का ? ते काम करू का ?" असे प्रश्न विचारून भंडावून सोडायच्या. मी त्यांना म्हणायची,

"तुमचे काम मुलींना बोलावून आणण्याचे आहे ! ते तेवढं चांगलं करा !"

पण त्या बाई मुलींना बोलावून आणण्याचे काम चोख का करीत नसत हे मला नंतर समजले.

बोलावणे पाठवून मुली येत असतच असे नव्हते. उलट बोलावण्यास गेल्यावर, "घरी काम पडले आहे ! तुम्हांला पगार हवा म्हणून आम्हांला का त्रास ? जा ! पोटात काटे भरा !" अशी दुरुत्तरे त्या बाईंना ऐकावी लागत. त्यामुळे मुलींना बोलावण्याबाबत त्या अळंटळं करीत.

मग मी पालक-भेटी घ्यायला सुरवात केली. लहान भावंडांना सांभाळणे, आईच्या

हाताखाली काम करणे, इत्यादी गोष्टींमुळे मुलींची शाळेत जाण्याची गडबड मध्यमवर्गीय आईला झेपत नसे, असे मला जाणवले.

शेतकरी वर्गाच्या मुली तर शेतावर कामावर गेलेल्या असायच्या.

"मुलींना शिकून करायचे काय?" असा प्रश्न सर्वांनाच भेडसावत होता. मुलगे मात्र सर्व अडचणी सोसून शाळेत पाठविले जात होते!

स्त्रीशिक्षणाबाबतच्या मावळत्या उदासीनतेचा तो काळ होता.

म्हणूनच, परिस्थितीचा एकूण विचार करून मी शाळेमध्ये खेळ, गाणी, गोष्टी सुरू केल्या. रंजन-कार्यक्रम बसविले. चैत्रगौरी, संक्रांती वगैरेंचे हळदीकुंकू सुरू केले. परिणामी मुलींनी शाळेत जाण्याविषयीचा अनुत्साह पालकांच्या संदर्भात दूर झाल्याचे जाणवले. मुलींची उपस्थिती नियमित झाली.

चांदवडला माझ्या नोकरीची सुरुवात होती. सरकारी चाकोरी फारशी परिचित नव्हती. नियम माहीत नव्हते. त्यामुळे एकदा गावातल्या पालकांच्या सोयीने मी शाळेची वेळ बदलून घेतली. बदललेल्या वेळेबाबतची माहिती जिल्ह्याच्या कार्यालयात कळवली. तावडतोब मला वरून तंबी आली!

यावर मी गप्प बसावे ना? पण उसळते रक्त होते! त्या तंबीला मी निबंधवजा पत्रानेच उत्तर दिले. मी लिहिलेल्या पत्राचा आशय होता,

"मुली शाळेत यायला हव्यात आणि त्यांचे शिक्षण व्हायला हवे, असे वाटत असल्यास त्यांच्या पालकांच्या अडचणी लक्षात घेऊनच शाळेची वेळ ठरवायला पाहिजे."

माझ्या या परखड निबंधाचा सरकारी अधिकाऱ्यांवर अनुकूल असा काही परिणाम झाला नव्हता. "बाई अननुभवी आहेत!" असा पोक्त विचार करून बहुधा दुर्लक्ष केले गेले असावे. फक्त एक फतवा पाठविला गेला आणि त्यांनी बालून दिलेली शाळेची वेळ मी पाळली पाहिजे असा आदेश देण्यात आला!

### चांदवडचे चक्रमंडळ!

चांदवडला आम्ही पी० डब्ल्यू० डी० स्टोअरमध्ये राहत होतो. इरिगेशन खात्यातील लोकल बोर्डाचे एक ओव्हरसियर श्री० पाटणकर यांना गावात जागा न मिळाल्यामुळे तेथेच एक खोली त्यांना दिलेली होती. माझे मामेभाऊ श्री० नाना भोसेकर हे त्या वेळी कॉलेजात इंटरला होते. श्री० राजाभाऊ जोशी गावातील एका धनिक कुटुंबातील मुलांची शिकवणी घेऊन तेथे आलेले होते. नाशिकच्या श्री० देवळालीकर वकिलांचे ते नातेवाईक असल्याने आमचेही नातेवाईकच होते. अशा या तीन समवयस्क तरुण मित्रांचे आमच्या घरी खूप जाणे-येणे असे—नव्हे, बैठकच होती!



गावापासून सुमारे तीन मैल लांब असलेल्या श्री रेणुकादेवीच्या दर्शनाला रोज संध्याकाळी आम्ही जात असू. बरोबर माझी आई व सगळी लहान भावंडे असावयाची. संध्याकाळी साधारण ५॥ ते ८ वाजेपर्यंत आमची ही भटकंती चालू असावयाची. वाटेतील कच्च्या कैऱ्या खाता याव्यात म्हणून मीठ-तिखट यांच्या पुड्याही बरोबर असायच्या. आमच्या नानांना चांगल्या चांगल्या इंग्रजी कादंबऱ्या वाचण्याचा नाद होता. गोष्टी सांगण्याची कलाही त्यांनी आत्मसात केलेली होती. त्यामुळे सबंध रस्ताभर ते एखाद्या कादंबरीची गोष्ट सांगत असत. रस्ता केव्हा संपला ते आम्हांला कळायचेच नाही!

पुढे आमच्या या मित्रमंडळामध्ये श्री० नाना कार्यकर्ते हे येऊन मिळाले आणि आमचा 'चक्रम' क्लब स्थापित झाला. सगळेच कोणत्या ना कोणत्या छंदाने पछाडलेले असे आम्ही चक्रम होतो. या चक्रम मंडळाने एक हस्तलिखित पण काढले होते. त्यात माझा एकुलता एक धाकटा भाऊ कै० मधू याने त्याच्या वयाच्या सातव्या वर्षी कविताही लिहिलेली होती. त्या कवितेचे नाव होते 'किती सुंदर बंधारा!'

आमचा मधू पुढे इरिगेशन खात्यातील एक्झिक्युटिव्ह इंजिनियर झाला. कितीतरी नद्यांवरील मोठमोठ्या धरणांची बांधकामपूर्व संशोधनकार्ये, नकाशे तयार करणे वगैरे कामे त्याने केली. आमच्या चक्रम क्लबच्या हस्तलिखितातील त्याची कविता म्हणजे जणू त्याच्या कार्याची भविष्यसूचक नांदीच म्हणायची!

चांदवडला असतानाच माझी पाठची बहीण कृष्णा (किशी) हिचे लग्न आमचे चुलत आतेभाऊ श्री० वामनराव राजगुरू यांच्याशी झाले. तिच्या पाठची बहीण मालिनी (माली) हिचे लग्न आमच्या मित्रमंडळातील श्री० राजाभाऊ जोशी यांच्याशी ठरले.

माझ्या आईवडिलांना सहलीचा खूप नाद होता. त्यामुळे तेथे असणारे धोडप, माल्हेर-मुल्हेर, चांदवड आदी किल्ले आम्ही पाहिले. दिवाळीच्या दिवसांत फराळाचे घेऊन कोठेतरी बागेत अथवा रम्यशा आवारात जायचे आणि गप्पा करीत फराळ करायचा असा आम्हांला छंद होता. अजूनही तो आहे.

एकूण माझ्या जडणघडणीमध्ये माझ्या आईवडिलांचा आणि यापूर्वी उल्लेखिलेल्या माझ्या मित्रमंडळींचा मोठाच वाटा आहे.

### विशुद्ध मैत्री

चांदवड येथे मी वयाच्या १९ व्या वर्षी कामाला सुरुवात केली होती.

१९२९ सालाच्या सुमाराचा, म्हणजे ५० वर्षांपूर्वीचा तो काळ!

मी बालविधवा. तरुण. आणि तरीही समवयस्क मित्रांच्यात वावरत होते!

आजच्या पिढीतील सर्वांनाच आमच्या मैत्रीविषयी कुतूहल वाटेल. संशय येईल. शंका येतील. परंतु मन आणि विचार स्थिर, परिपक्व असतील आणि ध्येयवादाची वाट पायाखाली असेल तर माणसाची पावले डळमळत नाहीत, स्थिर राहतात, असा माझा अनुभव आहे.

शारीरिक ऊर्मी, वासना, स्त्रीपुरुष-शरीराचे आकर्षण यांनाच प्राधान्य देणारा आजचा काळ आहे. समवयस्क आणि अविवाहित मित्रांबरोबर वावरतानाही विवाहाचा विचार माझ्या मनात आला नाही. स्वतःचे कुटुंब असावे, स्वतःचा संसार असावा, हा विचार करीत बसण्यास मला खरोखरच वेळ मिळाला नाही. या संदर्भात माझ्या शरीराने किंवा मनाने बंड केले नाही!

आमच्या मैत्रीचे स्वरूप नेमके कसे होते? शिक्षिका म्हणून व्यवसाय पत्करला असूनही मला मित्र होते. समाजाने मला या बाबतीत कोणत्याच प्रकारे त्रास दिला नाही. हे कसे आणि का घडले? तरुणांसाठी आणि विशेषतः तरुणींसाठी मला हे सांगायला हवे.

साधारण समवयस्क मंडळींचे व माझे हिंडणे, फिरणे, गप्पा वगैरे गोष्टी होत असत. कामाचा वेळ सोडून उरलेल्या बऱ्याच वेळी आम्ही एकत्र असू. त्या वेळी शिक्षिकेकडे व स्त्री-पुरुष मैत्रीकडे पाहण्याचा लोकांचा दृष्टिकोण लक्षात घेता ही एक नवलाचीच गोष्ट होती. पण मला या बाबतीत त्रास झाला नाही. अथवा परोक्ष वा अपरोक्ष कोणीही काहीही उपहास केल्याचेही कानावर आले नाही. आमचे सगळे उठणेबसणे वगैरे अगदी मोकळ्या जागी असायचे. बरोबर लहान भावंडे असायची. आईचे लक्ष असायचे. शाळेतल्या मुलींची मी आवडती होते, पालकांना माझे कौतुक होते. म्हणून माझ्या मित्रांबद्दल कोणीही कधीही कुत्सित उद्‌गार काढले नाहीत. आईप्रमाणे आमच्या मामींचा—नानांच्या आईचाही—मला आधार होता. त्यांची मी फार कौतुकाची भाची होते. "ताईंची धडपडच फार. मोठ्या बाईने इतक्या लवकर शाळेत जायचे असते का? मोठ्या बाई शाळेत गेल्यावरच शाळा सुरू होते बरं का!" असे त्या म्हणायच्या.

एकूण, लोकांकडून आम्हांला त्रास नव्हता. आमचे हे स्पष्ट मत होते की स्त्री-पुरुष मैत्री प्रस्थापित करूनच दाखवायची! मी ओळख करून देताना "हे माझे मित्र" असेच सांगायची. उगीच कोणाला "भाऊ" म्हणून सांगायची नाही.

आमच्या या मित्रमंडळींमध्ये वैचारिक देवाणघेवाण पुष्कळ असायची. एकदा नानांनी वर्तमानपत्रातील बातमी सांगितली : विधवा पुनर्विवाहाचा कायदा झाला, त्याला आज ४५ वर्षे होतात. (नक्की वर्षे आठवत नाहीत.) हा कायदा किती योग्य होता वगैरे! मी आशय समजले. पण सांगितले, "मला या कायद्याचा फायदा घ्यायचा नाही." आणि मग पुन्हा या बाबतीत माझ्याशी कोणी बोलले नाही. आई-



आबांची मला पुन्हा लग्न करण्याची परवानगी होती. खटपटही करायला ते तयार होते. एका अपरिचिताने पत्र पाठवून लग्नाची मागणीही घातली होती. पण मीच ती गोष्ट नाकारली.

पुढे अनेक ठिकाणी, अनेक प्रकारच्या पुरुष मंडळींमध्ये मला काम करावे लागले. विनासंकोच मी ते केले. आपले मन शुद्ध व निर्भय असल्यावर धोका नसतो हे मला पटलेले आहे. आणि आता माझ्याकडे शिकणाऱ्या सगळ्या प्रशिक्षणार्थी भगिनींना मी हेच सांगत असते की "निर्भयपणे तुम्ही काम केले पाहिजे. काम करीत असताना 'मी स्त्री, हा पुरुष' वगैरे विचारही मनात येता कामा नये. आपल्याकडून अशी बारीकशीसुद्धा गोष्ट घडता कामा नये की ज्यामुळे पुरुषांना पुढे सरकावेसे वाटेल. एकदा का थोडासा पाय घसरला की मग आवरणे बायकांच्या जातीला कठीण पडते."

तसेच, बायका-पुरुष मोकळेपणी हिंडू-फिरू लागले व काम करू लागले तर परस्परसंबंध निर्दोष राहण्यास मदत होईल. "येथे जाऊ नका, तेथे जाऊ नका, त्याच्याशी बोलू नका, बुरखा घ्या, पडदा घ्या," अशा सांगण्यामुळेच पुष्कळदा स्त्री-पुरुषांच्या संबंधामध्ये अनिष्ट गोष्टी घडतात, असे मला वाटते.

## मुक्काम पिंपळगाव

माझ्या वडिलांची बदली 'वडाळी' नावाच्या एका अगदी लहान गावी झाली. तेथून पिंपळगाव (बसवंत) जवळ होते. म्हणून मी माझी बदली पिंपळगावला करून घेतली. वडील वडाळीलाच राहत असत. ते मधूनमधून सायकलवरून पिंपळगावला येत.

पिंपळगाव द्राक्षाच्या मळ्यांनी वेढलेले गाव! चांगले बागाईतदार तेथे आहेत. वस्ती बरीच आहे. पण शाळा मात्र लहान होती. ती पण भाड्याने घेतलेली होती. आमच्या शाळेचे घरमालक शिरवाडकर होते. त्यांचे दोन नंबरचे चिरंजीव म्हणजे सुप्रसिद्ध कवी कुसुमाग्रज होत. सहा भावांवर झालेली त्यांची लाडकी बहीण कुसुम आमच्या शाळेची विद्यार्थिनी होती. कुसुमाग्रज तेव्हा महाविद्यालयीन विद्यार्थी होते. अधूनमधून ते सुट्टीला घरी येत असत. तेव्हा त्यांच्या नवनव्या कविता त्यांच्याच तोंडून ऐकण्याचा सुयोग आम्हांला लाभला होता. आम्ही ते श्रीकृष्णाचे बासरीवादन समजत असू.

## आय डोन्ट नो इंग्लिश!

पिंपळगावला श्रीमती गोदावरी सोनावणे या मुख्य शिक्षिका होत्या. मी त्यांना मदतनीस होते. आम्ही दोघीच जणी होतो. श्रीमती गोदूताई मला आमच्या ट्रेनिंग कॉलेजमध्ये एक वर्ष पुढे होत्या. आताही मला त्या एक वर्षाने ज्येष्ठच होत्या.

त्यामुळे त्या मुख्य शिक्षिका असणे ओघानेच आले. मात्र आमचे दोघींचे नाते अधिकारी-मदतनीस असे कधीच नव्हते. दोघी जिव्हाळ्याच्या मैत्रिणी—नव्हे, सख्ख्या बहिणीच झालो होतो.

गोदूताई इंग्रजी शिकल्या होत्या. शहरात राहिलेल्या होत्या. त्यांचे वागणे थोडे सुधारकी असावयाचे. मी तशी खेडवळच. मला इंग्रजी मुळीच येत नव्हते. फक्त एक वाक्य मी शिकून ठेवले होते—"आय डोन्ट नो इंग्लिश!"

## गहू चांगला आहे?

माझ्याजवळ अध्यापनपद्धतीबद्दल भरपूर कल्पना होत्या. गोदूताईंचा मला त्या बाबतीत पूर्ण सहकार होता. मला आठवते की तेथेही गणिताची काही साधने मी तयार केली होती. आम्ही मुलींचे रंजन-कार्यक्रमही तेथे बसविलेले होते. ते गावच्या पाटलांच्या मोठ्या पटांगणात व्यासपीठावर करून दाखविले. त्यामुळे पिंपळगावकर आमच्याकडे कौतुकाने पाहत असत. कधी कधी चेष्टाही होई.

पिंपळगावला मला पालक भगिनींमधून चांगल्या मैत्रिणी मिळाल्या. एकीने आपले दुःख सांगितले,

"मला चार मुली आहेत. मुलगा होत नाही. म्हणून माझे पती माझा राग राग करतात. घरात मी सासुरवाशीण आहे!"

मला समजेना, या बाईला जर मुलगा होत नाही तर त्यात त्या बाईचा काय दोष?

तिला माझ्या मनातील प्रश्न मी सांगितला. त्यावर ती म्हणाली, "ते म्हणतात, गहू किती चांगला असला तरी जमीन चांगली हवी; तेव्हा पीक चांगले येईल."

अजूनही हे वाक्य मला आठवते. "गहू चांगला आहे याची खात्री करून घेतलीत का?" असा प्रश्न त्या वेळी माझे मन ओरडून विचारत होते.

नंतर पुष्कळ वर्षांनी बहिःशाल व्याख्यानाच्या निमित्ताने मी पिंपळगावला गेले होते. तेव्हा कळले, माझ्या मैत्रिणीला मुलगा झाला आणि तो आता गावचा पुढारी आहे!

## शनिवार महिला मंडळ

या भगिनींच्याच मदतीने मी एक 'शनिवार महिला मंडळ' उघडले होते. मी 'स्त्री' मासिक वाचून दाखवायची. जिला जे येईल ते तिने दुसऱ्याला शिकवावे असा नियम होता. कोणाला जाळीचे रुमाल विणता येत होते, कोणाला कशिदा काढता येत होता, कोणाला भरतकाम येत होते, कोणी कागदाची फुले, पोतीचे काम वगैरे करीत असत. एकमेकींनी एकमेकींना आपापली कला शिकविली.

हे आमचे शनिवार महिला मंडळ मी पिंपळगावला होते तोपर्यंत चालू होते.



## जिरलेले मनोरथ

आपल्याला इंग्लिश येत नाही ही एक माझ्या मनाला मोठी खंत होती. माझे मित्र श्री॰ पाटणकर यांच्या ठिकठिकाणी बदल्या होत असत. मला पत्राद्वारे इंग्लिश शिकविण्याचा उपक्रम त्यांनी सुरू केला. पण इंग्रजी शिक्षणाचा हा थातुरमातूर उपाय आहे हे जाणवत होते. आपल्याला चांगले इंग्लिश शिकायला मिळाले पाहिजे असा मनाने ध्यास घेतला होता. आणि तसा योग चालून आला.

माझ्या ट्रेनिंगच्या काळामध्ये मी सर्वच प्राध्यापकांची आवडती होते. त्यांपैकी श्री॰ म॰ शि॰ निमकर यांना माझ्याबद्दल फारच अभिमान वाटायचा. एके दिवशी त्यांचे पत्र आले. पत्रात त्यांनी लिहिले होते,

"माझे मित्र श्री॰ सीतारामजी तावडे नुकतेच अमेरिकेहून आले आहेत. आपल्याकडे अमेरिकेप्रमाणे स्त्री-पुरुष एकत्र मिसळून काम करीत नाहीत असे ते म्हणतात. मी तुझ्याविषयी त्यांना सांगितले असून पैज मारली आहे. 'आमची अनसूया काम करून दाखवील,' असे मी त्यांना सांगितले आहे. तेव्हा त्यांनी पुण्याला शिक्षकाच्या कामाला तुला बोलाविले तर 'हो'च म्हण. अर्ज कर. माझा शब्द खाली पडू देऊ नकोस!"

पत्रासोबत त्यांनी अर्जाचा नमुनाही जोडला होता!

मला खूप आनंद झाला. मी लगेच होकार दिला. आणि थोड्याच दिवसांत मला श्री॰ तावडे यांच्याकडून मुलाखतीचे आमंत्रण आले.

श्री॰ तावडे त्या वेळी पुरुषांच्या ट्रेनिंग कॉलेजमध्ये प्राचार्य होते. प्रॅक्टिसिंग स्कूलमध्ये सर्व पुरुष शिक्षकच होते. तेथे काही भगिनी असाव्यात असे त्यांना वाटत होते. प्रॅक्टिसिंग स्कूलचे सर्व शिक्षक कुठल्या ना कुठल्या लोकल बोर्डातर्फे आलेले होते. त्यांचा तेथे नोकरीवरचा हक्क कायम असायचा. कॉलेजमध्ये सरळ नेमणूक करता येत नसे. त्यामुळे मला एकटीला कसे बोलावणार? म्हणून तावडे यांनी नाशिक स्कूल बोर्डाला अधिकृत पत्राने उत्तम शिक्षिका मुलाखतीस पाठविण्याबाबत लिहिले. त्यांत माझे एक नाव घातले होते.

मुलाखतीसाठी श्रीमती लक्ष्मीबाई नातू व मी अशा दोघी गेलो. दोघींचे नमुनापाठ झाले. मुलाखती झाल्या. दोघींचीही निवड झाली. सौ॰ नातूबाईंनी नाशिक जिल्ह्यात पुष्कळ वर्षे काम केलेले होते. त्या हुषार, कर्तबगार व अनुभवी होत्या. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा प्रभाव पडला. माझाही पाठ साहेबांना फार आवडला. परिणामी दोघींनाही त्यांनी बोलाविले. तेव्हा नासिक स्कूल बोर्डाने सांगितले की,

"एका जिल्ह्यातून आमच्या दोन चांगल्या शिक्षिका आम्ही कशा जाऊ देऊ? नातूबाई सिनीअर आहेत. त्यांना घ्या. वाघबाईंना येथेच काम करू द्या."

आमचे मनोरथ जागच्या जागी जिरले!

### पिंपळगावला निरोप

पण मनाला खुमखुमी असतानाच एक दिवस पुणे येथे हुजूरपागेत काम करणारी माझी मैत्रीण श्रीमती सुभद्रा पाचे हिची तार आली,

"कायमची जागा रिकामी झाली आहे--ताबडतोब निघून ये."

आता पुन्हा स्कूल बोर्ड अडथळा आणील, काय करावे? असा प्रश्न होता. म्हणून त्या वेळचे ॲडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसर श्री० दीक्षित यांना भेटले. "माझा राजीनामा घ्या" असे म्हटले.

श्री० दीक्षित खूप अनुभवी होते. त्यांनी मला बिनपगारी रजा घेण्याचा सल्ला दिला. त्यांचे सख्खे थोरले बंधूच हुजूरपागेचे सेक्रेटरी होते. त्यांना त्यांनी चिठ्ठी दिली. मला हुजूरपागेत नोकरी मिळाली. आज महिना आठवत नाही, पण साल १९३३ होते.

तीन महिन्यांनी मी बोर्डाचा राजीनामा दिला. स्कूलबोर्डाची नोकरी मी साधारणपणे साडेतीन वर्षे केली होती. त्या वेळी बाँड पाच वर्षांचा होता की तीन वर्षांचा ते आठवत नाही. पण मला कोणी अडविले नाही, त्या अर्थी मुदत पूर्ण झाली असावी.

पिंपळगावच्या मंडळींनी मला अत्यंत प्रेमाने निरोप दिला.

### पुण्याच्या हुजूरपागेत हजर झाले

मी भीतभीतच हुजूरपागेत पाऊल ठेवले. पुण्यातील फार जुनी व नावाजलेली शाळा! श्रीमंत वर्गातील मुलींचा भरणा जास्त, शिस्त कडक, वगैरे बरेच काही या शाळेबद्दल मी ऐकले होते.

आपण खेडवळ. आपले कसे काय जमेल? असा प्रश्न पडला होता. धास्ती वाटत होती. पण फारच लवकर जम बसला. कारण तेथील प्राथमिक शाळेच्या मुख्याध्यापिका श्रीमती पार्वतीबाई आठवले यांनी पहिल्या दिवसापासूनच मला आपली धाकटी बहीण मानले.

हुजूरपागेत मी तेरा वर्षे काम केले. सुरुवातीला इ० तिसरी माझ्याकडे होती. मग बरीच वर्षे इ० चौथीला शिकविले. दुसऱ्या शिक्षक भगिनींना 'माझ्याचकडे चौथीचा वर्ग का?' म्हणून थोडा विषाद वाटू लागला. तेव्हा मी इ० पहिली माझ्याकडे घेतली. ती शेवटपर्यंत माझ्याकडे होती. कोणत्याही वर्गाला शिकविताना मला खूप हौस वाटत होती. कारण मुली चुणचुणीत आणि हुषार असायच्या. त्यांचे माझे चांगले जमायचे. तशी तर इतर सहकारी भगिनी, अधिकारी मंडळी व पालक मंडळी या सर्वांचीच मी लाडकी होते.

शाळेचे वाचनालय, वार्षिक समारंभ आणि आणखी काही इतर कामे माझ्याकडे जमली. वार्षिक समारंभाच्या वेळी शक्यतो नवे कार्यक्रम निवडायचे म्हणून पुष्कळसे संवाद व अभिनयगीते मी स्वतःच लिहीत असे. या लेखनाच्या आधारे 'बालसंवाद' नावाची एक छोटी पुस्तिका मी काढली होती. आज मात्र त्याच्या आठवणीसाठी एखादी प्रतही माझ्याकडे नाही.



कार्यक्रम बसवून तो पार पडेपर्यंत सर्व जबाबदारी माझ्याकडे असावयाची. त्यामुळे तेरा वर्षांत एकदाही पुढे बसून कार्यक्रम पाहण्याची संधी मला मिळाली नाही.

रंजन-कार्यक्रम म्हटले की, एक कार्यक्रम स्टेजवर चालू असेल, दुसऱ्या कार्यक्रमाच्या मुली पडद्यामागे तयारच असतील, आणि तिसऱ्या कार्यक्रमाची तयारी चालू असेल, अशी माझी व्यवस्था असे. त्यामुळे दोन कार्यक्रमांच्या मध्ये दोनतीन मिनिटांपेक्षा जास्त अंतर जात नसे.

वाचनालयात पुष्कळ पुस्तके होती. मी आणखीही नवी नवी यादी देत असे. पुस्तके निवडून आणण्याचे काम माझ्याकडे यायचे. त्याच वेळी कै० पू० ताराबाई मोडक यांचे 'शिक्षणपत्रिका' मासिक मी प्रथम पाहिले. कव्हर नसलेले. सुटी पाने. वार्षिक वर्गणी १ रु०! मला ते खूप आवडले. त्याच वेळी 'मधुमक्षिका' या टोपण-नावाने काही अवलोकने त्यांच्याकडे पाठविण्यास मी सुरुवात केली.

पुढे कधीतरी मी या 'शिक्षणपत्रिके'ची संपादिका होणार आहे याची त्या वेळी मला मुळीच कल्पना नव्हती!

मुलींच्या सहली, खेळाचे सामने, बुलबुल वगैरे अभ्यासक्रमाव्यतिरिक्त अनेक गोष्टी मजकडे हळूहळू येत गेल्या. मी त्या मोठ्या आनंदाने स्वीकारल्याही. नित्य नवे काहीतरी करण्यात मला आनंद वाटायचा. अजूनही वाटतो.

### माझी कानउघडणी

मी संयोजित केलेल्या एका सहलीची आठवण मी कधीच विसरू शकणार नाही!

मुलींना खूप लांब लांब फिरायला घेऊन जाण्याची मला खूप हौस होती. आमच्या शाळेने स्वतःची एक स्कूलबस ठेवली होती. रविवारी ती रिकामीच असायची.

"आमच्या मुलींना कार्ल्याची लेणी दाखवायला ही बस द्या" म्हणून मी आग्रह धरला.

सातआठ वर्षे वयाच्या मुली. इतक्या लांबची सहल! त्यामुळे वरिष्ठांनी प्रथम मला होकार दिला नाही. मग मुलींच्या मार्फत मी वरिष्ठांकडे तगादा लावला. शेवटी सहल जाण्याचे नक्की ठरले.

एवढ्याशा मुली डोंगर कशा चढतील? म्हणून कित्येक पालकांनी माझ्याकडे डोलीसाठी तीन-तीन रु० दिले. ठरल्याप्रमाणे बस निघाली. पायथ्याशी थांबली. हरणाप्रमाणे मुली टेकडीवर पळतच सुटल्या. त्यांनी केव्हा लेणी गाठली हे कळलेच नाही! मोकळेपणाचा मुक्त आनंद त्या उपभोगीत होत्या.

मुलांच्या शक्तीविषयी आम्हा मोठ्या माणसांना खरी कल्पनाच नसते, हेच खरे!

गाणी, गोष्टी, खेळ, कवायत वगैरे सारे झाले. फराळ झाले. ठरल्यावेळी आम्ही खाली उतरलो. मुली आनंदाच्या मस्तीत होत्या. मी पण खुशीत होते. त्या नादातच मुलींना खंडाळा घाट दाखविण्याचे ठरविले. रिव्हर्सिंग पॉइंटपर्यंत गेलो. तेथे उतरून निसर्गाची मौज नजरेने पिऊन घेतली. परत फिरलो. नियोजित वेळेपेक्षा खूपच उशीर झाला होता.

मुलींना नेण्यासाठी पालक शाळेत येऊन बसले होते. प्रिन्सिपॉल श्रीमती वेणुताई पानसे आपल्या सज्जात फेऱ्या घालीत होत्या. संतापाने लाल झाल्या होत्या. आम्हांला या गोष्टींची कल्पनाच नव्हती!

सर्व मुली सुखरूप परत आलेल्या पाहून पालकांनी आनंद व्यक्त केला. आपापल्या मुलींना घेऊन पालक घरी गेले.

पालक गेल्यानंतर प्राचार्य बाईंनी माझी चांगलीच कानउघडणी केली. सहलीच्या आनंदात मस्त झालेल्या मला जबाबदारीचा विसर पडला होता!

### विक्रमी उदाहरण

खेडेगावातून पुण्यास येण्याचे माझे दोन प्रमुख हेतू होते. मला आणखी शिकण्याची इच्छा होती, त्याचप्रमाणे माझ्या लहान भावंडांच्या महाविद्यालयीन शिक्षणासाठी राहण्याची सोय करायची होती.

मुख्याध्यापिका श्रीमती पार्वतीबाईंनी मला पुढे शिकण्यासाठी फार मोलाचे सहकार्य दिले. चौकशी करून त्यांनी एका वर्षात ३ इयत्ता करणाऱ्या वर्गात माझे नाव घातले.

पूना नाइट हायस्कूलच्या इ० चौथीमध्ये, म्हणजे आताच्या आठवीमध्ये, मी दाखल झाले. रात्री ७ ते ११ पर्यंत आमचे हे वर्ग चालत असत. आमच्या सुदैवाने आमचे सर्व शिक्षक चांगले शिकलेले आणि तळमळीचे होते. दिवसाच्या शाळेप्रमाणे सर्व विषय व उपक्रम होत असत. या विद्यालयातही मी पूर्णपणे रंगून गेले. संस्कृत, हिंदी वगैरे भाषांची गोडी लागली होती. इंग्रजी बेताचेच होते. नापास होत नव्हते इतकेच!

शेवटच्या वर्षी सुरुवातीपासून अडचणी येत गेल्या. अभ्यास होत नव्हता. माझी बहीण सौ० मालिनी जोशी हिचे बाळंतपण, आजारपण झाले. नंतर मला मलेरियाने पछाडले. शेवटी या वर्षी परीक्षेला बसायचेच नाही असे मी ठरविले.

परंतु, आम्हांला वडिलांचे ठिकाणी असलेले आणि नाशिकपासून आमच्या वडील मंडळींशी स्नेह असलेले एक प्रसिद्ध ज्योतिषी होराभूषण श्री० दीक्षित अधूनमधून माझी चौकशी करायला येत असत. असेच एकदा ते चौकशीसाठी आले आणि "तुझा अभ्यास कोठपर्यंत आला?" म्हणून त्यांनी मला विचारले.



मी त्यांना सांगितले, "मी परीक्षेला बसणार नाही!"

त्यांना आश्चर्य वाटले. त्यांनीच तयार केलेली माझी पत्रिका त्यांनी लगेच पाहिली. म्हणाले,

"कोरे पेपर्स दे; पण या वर्षी परीक्षेला बस. नापास झालीस तर माझी होराभूषण पाटी जाळून टाकीन!"

त्यांच्या त्या खंबीर पाठिंब्याने मी कंबर बांधली! दोन महिन्यांची रजा श्रीमती पार्वतीबाईंच्या मदतीने मिळवली. इंग्लिशसाठी विशेष शिकवणी ठेवली. माझी मैत्रीण सौ० शांता सहस्रबुद्धे हिने चहा, जेवण वगैरे सर्व गोष्टींची जबाबदारी घेतली. रात्रीची सहा-सात तासांची झोप आणि दिवसा व्यक्तिगत कामासाठी जाणारा वेळ सोडून बाकीचा सर्व वेळ अभ्यासच चालू होता.

माझे वर्गसहकारी श्री० सप्रे दुपारी अभ्यासासाठी माझ्याकडे येत असत. ते व्यवसायाने आचारी होते.

एवढ्या धूमधडाक्याच्या तयारीचा परिणाम काय येईल, याची शंकाच होती. नाईट स्कूलमधून पहिल्या वर्षी मॅट्रिक पास होण्याचे उदाहरण अजून घडले नव्हते. म्हणूनही धाकधूक होती!

पण ईश्वराची कृपा! मी ५५ टक्के मार्क मिळून पास झाले. आमचे श्री० सप्रेही पास झाले. आमच्या दोघांचे हे विक्रमी उदाहरण होते!

श्री० सप्रे पुढे बी० ए० होऊन महाराष्ट्र बँकेत अधिकारपदावर चढले आणि आता निवृत्तीचे जीवन जगत आहेत.

### पैज जिंकली!

या मॅट्रिकच्या परीक्षेच्याच आधी आमच्या नाईट हायस्कूलचे तरुण प्राध्यापक श्री० वा० रा० गोखले (आता डॉ० गोखले) हे मला म्हणाले होते,

"पहिल्याच वर्षी तुम्ही पास होणे शक्य नाही! आमच्या नाईट हायस्कूलची तशी प्रथा नाही."

त्यावर मी म्हटले, "पण या वर्षी ती प्रथा मोडणार आहे. मी पहिल्याच वर्षी पास होणार!"

त्यावर त्यांनी ५ रुपयांची पैज लावली. परीक्षेचा निर्णय जाहीर होताच मी त्यांच्याकडे गेले व ५ रुपये मागितले. त्यांनी माझे अभिनंदन तर केलेच, पण म्हणाले, "अजून मार्कांची यादी कळू द्या. तुम्ही इंग्रजीत नापास असाल. सवलतीने पास झाला असाल!"

मार्कांची यादी आली. मला त्या विषयात ४५ मार्क होते. पासासाठी ३५ मार्कांची गरज होती. म्हणजे येथेही माझी बाजू सबळ ठरली आणि मी पैज जिंकली.

श्री० सप्रे आणि मी असे दोनच विद्यार्थी त्या वेळेपर्यंत नाईट स्कूलमधून पहिल्या वर्षी पास झालेलो होतो. आता पुष्कळांना हा मान मिळाला असेल.

दुकानावर, कोळशाच्या वखारीत, कारखान्यात वगैरे ठिकाणी दिवसा कामावर असणारे बंधू रात्री शाळेत येतात. थकल्या-भागल्या मनाने शाळेच्या अभ्यासाकडे लक्ष देतात. नंतर अभ्यासाला वेळ मिळत नाही. अशा अवस्थेत पहिल्या वर्षी यश न मिळाल्यास काही नवल नाही. ही मंडळी येतात व जिद्दीने अभ्यास पूर्ण करतात हीच अभिनंदनाची गोष्ट आहे. नाईट स्कूलमुळे अशी संधी त्यांना मिळते, म्हणून नाईट स्कूलचेही अभिनंदन करावयास हवे.

आज कोसबाडला काम करीत असतानाही मला अशा प्रकारच्या शाळेची अत्यंत आवश्यकता वाटते. घरच्या अडचणींमुळे अथवा आर्थिक परिस्थितीमुळे अगदी इ० पहिली व दुसरीतून शाळा सोडणारी अनेक मुले आहेत. त्यांत मुलीही आहेत. ही मंडळी रात्री आस्थेने येतात, शिकतात, पुढे पुढे जातात. अशा वर्गाची खूप आवश्यकता आहे हे अनेकांना पटले आहे. पण शासनमान्यता व आर्थिक मदत मात्र मिळत नाही. कारण वेळ, अभ्यासक्रम, आठवड्याच्या तासिका वगैरे चौकटीत ही शाळा बसत नाही.

आजच्या प्रौढ शिक्षण योजनेतही ही शाळा येत नाही. कारण तो फक्त दहा महिन्यांचा वर्ग असतो आणि लोकांना साक्षर करून सोडणे एवढेच या योजनेचे उद्दिष्ट आहे.

### लाल रेघेची भीती

आमच्या वडिलांकडून पैसे येत असत. ते पुरत नसत. म्हणून मग मी शिकवण्या करण्याचे काम सुरू केले. चांगल्या शिकवण्या मिळत असत. या पेठेतून त्या पेठेत जावे लागे. शाळा हुजूरपागा. कडक शिस्तीची. पावणेअकरा वाजता पोहचलो नाही तर लाल रेघ लागायची भीती! पण आनंदाची गोष्ट की, तेरा वर्षांत एकही लाल रेघ मी घेतली नाही!

### आमची 'अलीम' कंपनी!

पुढील वर्षी माझा भाऊ मधू शिकण्यासाठी पुण्यास आला. त्याने फर्ग्युसन कॉलेजमध्ये प्रवेश घेतला. आता आम्ही दोघी बहिणी आणि एक आमचा एकुलता एक भाऊ असे तिघेजण एकत्र होतो. त्या दोघांचा अभ्यास, विद्यालय, माझी शाळा, शिकवण्या वगैरे छान चालले होते. आम्ही तिघे बहीणभावंडे म्हणून राहिलो नव्हतो तर तिघे मित्र म्हणून राहिलो होतो. तिघांच्या नावांतली आद्याक्षरे मिळवून आम्ही आमच्या कंपनीचे नाव ठेवले 'अलीम'! ('अनु'मधला 'अ', 'लीला'मधला 'ली' आणि 'मधू'मधला 'म'=अलीम!)



संध्याकाळी फिरायला जायचे तर तिघांनी! महिन्यातून एकदाच सिनेमा पाहायचा तो तिघांनी! उधारी करायची नाही, सानेगुरुजींचे एक पुस्तक दरमहा विकत घ्यायचे, वगैरे बऱ्याच गोष्टी आम्ही ठरवून टाकल्या होत्या. अधिक सोयीची म्हणून सदाशिव पेठेतील खुन्या मुरलीधराजवळच्या परांजपे यांच्या चाळीतील जागेत १९३९ साली आम्ही राहायला आलो. तेव्हापासून आजपर्यंत तेथेच आमचे बिऱ्हाड आहे. (मधूचे कुटुंब तिथे आहे. फक्त मधू मात्र स्वर्गवासी झाला आहे.)

### ही उणीव कशी भरावी?

लीला बी० ए० झाली. मधूने इंजिनिअरिंग कॉलेजचा अभ्यास सुरू केला. याच वेळी १९४२ चे स्वातंत्र्य-आंदोलन सुरू झाले.

"घरटी एक माणूस या युद्धासाठी हवे" अशी हाक महात्मा गांधीजींनी दिली. आमचा मधू आंदोलनात उडी घ्यायला निघाला. महामेहनतीने त्याला मी आवरले.

लीला म्हणाली, "मी मोकळी आहे. मी या आंदोलनात सामील होते. महात्माजींच्या हाकेला आपण साद देऊ या! ताईला हलता येणार नाही, कारण मधूची जबाबदारी तिच्यावर आहे."

ठराव पास झाला!

लीलाने शांततावादी सत्याग्रह-संग्रामात उडी घेतली. तिला येरवडा तुरुंगात अकरा महिने स्थानबद्ध करण्यात आले!

मग मात्र आम्ही घरीच राहिलेले दोघेजण फार दुःखी झालो. मला वाटे, "माझी कातडी बचावून धाकट्या बहिणीला मी बळी दिले." मधूला वाटे, "पुरुषासारखा पुरुष मी, घरी राहिलो. बहिणीला पुढे ढकलली!"

दिवस जात होते. लीला आणि तिच्या मैत्रिणींनी तुरुंगातही पुष्कळ गडबडी केल्या. बातम्या यायच्या. जीव वरखाली व्हायचा. पण एकूण सगळे ठीक झाले! अकरा महिन्यांनी लीला घरी आली. लगेच तिला अहिल्याबाई शाळेत नोकरी लागली.

मधू इंजिनिअरिंगच्या परीक्षा पास होत गेला. शेवटचा पेपर देऊन तो घरी आला आणि देवापुढे बसून मी शपथ घेतली, "यापुढे पैसे घेऊन शिकवणी मी करणार नाही!"

मधूलाही पी० डब्ल्यू० डी० मध्ये ताबडतोब नोकरी लागली.

आता मी प्रापंचिक बंधनातून मोकळी झाले होते. म्हणजे हे सर्व बंधन माझ्याच एकटीवर होते असे मात्र नाही. माझे वडील यथाशक्ती मदत करीतच होते. पण हळूहळू ते थकत चालले होते. ते मला मोठा मुलगाच मानीत होते. त्या दृष्टीने उचलता येईल तेवढा भार मी उचलत होते.

परंतु मनात खंत होती, बेचाळीसच्या लढ्यात माझा प्रत्यक्ष भाग नाही. आयुष्यातील ही खंत दूर करता येईल काय? आयुष्यातील ही उणीव भरून निघेल काय?

## —आणि संधी आली!

कस्तुरबा राष्ट्रीय स्मारक निधीमार्फत खेडेगावात महिला आणि बालसेवेची कामे सुरू व्हायची होती. त्यासाठी प्रत्येक राज्यात अध्यापनकेंद्र निघायचे होते. त्याची पूर्वतयारी म्हणून १९४५ च्या मार्चमध्ये बोरिवली येथे अखिल भारतीय स्वरूपाचे एक शिबिर झाले.

हुजूरपागेतील मानाची नोकरी सोडून देऊन खटपटीने या शिबिरात मी प्रवेश मिळविला.

स्वातंत्र्यसंग्रामात लढून स्वराज्य मिळविल्यानंतर 'सुराज्य' करणे हाही एक लढाच आहे; खेडेगावात जाऊन काम करणे हीसुद्धा एक लढाईच आहे, या विचाराच्या प्रेरणेनेच मी निर्णय घेतला होता.

माझ्या निर्णयापासून मला परावृत्त करण्याचा प्रयत्न आमचे हितचिंतक, अनुभवी आणि वयोवृद्ध पुढारी श्री० हरिभाऊ फाटक यांनी केला. त्या वेळी मला माझ्या मधूने फार मोलाचा पाठिंबा दिला. त्याने सांगितले,

"ताई, तू निश्चितपणे खेड्यामध्ये जा! आता इथली काळजी तू मुळीच करायची नाहीस! पैशाचीही काळजी करू नकोस. कस्तुरबा ट्रस्टकडून पैसे कमी मिळाले तर मी पैसे पाठवीन!"

मधूने त्या वेळी दिलेला पाठिंबा त्याच्या अखेरीपर्यंत कायम ठेवला.

बोरिवलीच्या शिबिरात मला प्रवेश मिळाला आणि तेथें पू० श्रीमती ताराताईंची गाठ पडली. जीवनाच्या नव्या पर्वाची नांदी बोरिवली शिबिर प्रवेशाने झाली!

## जडणघडण करणारे हात

हुजूरपागेतील १३ वर्षांची नोकरी सोडून मी बोरिवलीच्या शिबिरात प्रवेश केला. माझ्या नव्या जीवनाला प्रारंभ तेथूनच झाला. परंतु नव्या पर्वाविषयीच्या स्मृतींच्या मागे जाण्यापूर्वी हुजूरपागेत ज्यांनी मला निखळ प्रेम दिले, सहवास दिला आणि माझ्यावर संस्कार करून नव्या पर्वासाठी माझ्या व्यक्तिमत्त्वाच्या घडणीची एक प्रकारे पूर्वतयारी केली, त्यांचा उल्लेख मला कृतज्ञतापूर्वक करावासा वाटतो.

हुजूरपागेत प्राथमिक शाळेच्या मुख्याध्यापिका श्रीमती पार्वतीबाई आठवले यांनी मला मोठ्या बहिणीप्रमाणे सांभाळले होते. त्यांच्याप्रमाणेच गुरुस्थानी असणाऱ्या श्रीमती सोनूताई काळे यांनीही मला आकार दिला. त्या स्वतः अभ्यासू वृत्तीच्या, धार्मिक विचाराच्या आणि थोर मनाच्या भगिनी आहेत. माझ्यामध्ये वाचनाची व लेखनाची आवड तेवत राहावी म्हणून त्यांचे सतत प्रयत्न होते.

मी खेडेगावात काम करायला जाणार हे त्यांना समजताच त्यांनी माझ्याकडून पाच प्रवचने पाठ करून घेतली. अगदी पाठांतराची परीक्षाच द्यावी लागली!



श्रीमती पार्वतीबाई, सोनूताई आणि मी मिळून पुण्यातील चांगले व्याख्यान ऐकायला नेहमीच जात असू. स्वातंत्र्यवीर सावरकरांची पुण्यात एका दिवशी सहा व्याख्याने झाली, त्या सहाही व्याख्यानांस आम्ही उपस्थित होतो!

पंडित जवाहरलाल नेहरूंच्या व्याख्यानासाठी दुपारी दोनपासून रात्री अकरा वाजेपर्यंत एकाच ठिकाणी जागा धरून बसलो होतो!

लहानलहानशा सहली आम्ही काढल्या होत्या!

श्रीमती सुभद्रा पाचे ही माझी जीवाभावाची मैत्रीण हुजूरपागेतच होती. ट्रेनिंग कॉलेजमधील ती माझी मैत्रीण. तिच्यामुळेच मी हुजूरपागेत रुजू झाले! श्रीमती गंगूताई पटवर्धन, हुजूरपागेच्या प्रिन्सिपॉल श्रीमती शांताबाई बापट आणि श्रीमती वेणूताई पानसे यांचे प्रेम, सहवास, प्रोत्साहन, मार्गदर्शन यांमुळे माझ्यात उत्साह सतत तेवत राहिला.

बंधूवर्गापैकी श्री० व्ही० के० खासनीस यांनी मला सार्वजनिक कामात भाग घेण्यास प्रवृत्त केले. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण संघटनेच्या महिला विभागाची चिटणीस म्हणून एकदमच नियुक्ती करून टाकली. काहीच माहिती नसलेल्या मला जणू पाण्यात ढकलून दिले, पोहायला लावले! महिला संमेलने घेणे, प्रत्यक्ष नाटकात भाग घेणे, महिला उद्योगवर्ग चालविणे वगैरेंचा प्राथमिक श्रीगणेशा येथेच झाला.

## "बये, लिही!"

पुण्यात मी तेरा वर्षे असताना दूर दिल्लीत राहून माझ्या व्यक्तिमत्त्वाला आकार देणारे माझे परमपूज्य गुरू श्री० भास्कर रामचंद्र खेर यांना माझ्या जीवनात फार महत्त्वपूर्ण स्थान आहे. आम्ही त्यांना बापू म्हणत होतो. श्रीमती दुर्गाताई नेने यांचे ते पती. दुर्गाताईंनी जगाचा निरोप घेताना बापूंना सांगितले, "अनू माझी मुलगी आहे. तिच्याकडे लक्ष ठेवा."

आणि मग मी कोठे आहे याचा शोध घेत बापू राहिले! कारण दुर्गाताईंच्या लग्नानंतर त्यांचा आमचा तसा संबंध राहिला नव्हता.

बापू एकदा पुण्यास स्वतः आले. ओळख करून घेतली. त्यांचे मधुर, प्रसन्न आणि प्रेमळ व्यक्तिमत्त्व मला भारून टाकणारे होते. त्यांच्या त्या भेटीनंतर आमची नियमित पत्र-भेट सुरू झाली. बापूंच्या पत्रांतून मला गीतेचे दर्शन झाले. संतांच्या भेटी झाल्या. "आपण आहोत त्यापेक्षा अधिकाधिक मानसिक उन्नतीच्या मार्गाने चालले पाहिजे" असा त्यांचा आग्रह होता.

त्यांचे अक्षर मोत्यासारखे. माझे अगदीच खराब! अक्षर सुधारण्याबाबत त्यांचे नेहमी मला इशारे येत. एकदा चिडून मी लिहिले,

"यापुढे मी तुम्हांला पत्र लिहिणार नाही!"

त्यावर घाबरून लगेच उत्तर आले,

"बये, लिही ! कसेही अक्षर काढ, पण तुझी तयारी कळू दे !"

बापूंना भेटण्यासाठी मी दोनदा दिल्लीस गेले होते. ते अधूनमधून पुण्यास येत असत. प्रत्यक्षात आमची भेट फारच थोडी व्हायची. तरीही आम्ही स्नेहाच्या नात्याने फार जवळ आलो होतो. बापू कुटुंबवत्सल होते आणि तरीही साधुवृत्तीचे होते. दिल्लीस महाराष्ट्रीय मंडळींचे ते पुढारी होते. 'महाराष्ट्र विस्तार' या मासिकाचे संपादक होते. मलाही या मासिकात सक्तीने गोष्टी, कविता, लेख लिहावे लागत होते.

बापू दिल्लीतल्या सेक्रेटरीएटमध्ये एका महत्त्वाच्या हुद्द्यावर सरकारी नोकरीत होते. परकीय सरकारच्या नोकरीची खंत त्यांना वाटत असायची. मनाला टोचणी लागलेल्या अवस्थेत ते म्हणायचे, "या जन्मी भास्कराला ग्रहण लागले आहे. पुढच्या जन्मी मी अशा पाशातून मुक्त असाच जन्मेन !"

तुरुंगात गेलेल्या आमच्या लीलाचे बापूंना खूप कौतुक होते.

माझी आध्यात्मिक जडण-घडण करण्याचे त्यांचे प्रयत्न चालू असतानाच अल्पवयातच मृत्यूने त्यांना १५ जानेवारी १९४५ रोजी ओढून नेले.

अशा प्रकारे कै० पूजनीय श्रीमती ताराबाई मोडक यांच्या समर्थ हाती मला सोपवणाऱ्या अनेक हातांमध्ये बापूंचाही महत्त्वपूर्ण हात होता !

हुजूरपागेतील स्मृतींना दूर ठेवण्यापूर्वी तेथे माझ्या वर्गात शिकणाऱ्या किंवा माझ्या वेळी शाळेत असणाऱ्या आणि आता नामवंत म्हणून चमकत असलेल्या काही विद्यार्थिनींचा उल्लेख करावासा वाटतो.

आचार्य अत्रे यांची कन्या शिरीष पै, डॉ० तारा वनारसे, सिंधू परांजपे, डॉ० सुशीला आगा, मृणालिनी देसाई, इत्यादींची नावे सांगताना अभिमान वाटतो.

पूर्वाश्रमीची कुसुम कारखानीस आता कुसुम नारगोळकर होऊन, डोंगराळ भागात राहून पतीबरोबर आदिवासींची सेवा करण्याचे कार्य करताना पाहून मन भरून येते.

पूर्वाश्रमीची लीला गोडबोले आता सौ० लीला कोसके बनून आमच्या संस्थेतच प्राध्यापिका आहे, हे पाहून आनंद वाटतो.

अशा प्रकारे, हुजूरपागेतल्या तेरा वर्षांत भेटलेल्या कितीतरी विद्यार्थिनी अजूनही अधूनमधून भेटतात. 'बाई' म्हणून साद घालतात. निघून जातात.

त्या निघून गेल्या तरी मग किती तरी वेळ हुजूरपागेतल्या अनंत स्मृती आणि माझी जडणघडण करणारे हात यांना माझे मन कुरवाळत राहते.

# बोरिवली शिबिर ते बोर्डी

१९४२ च्या स्वातंत्र्ययुद्धात मोठे मोठे मोहरे हरविले होते. त्यामध्ये महात्मा गांधीजींच्या पुण्यशील पत्नी मातोश्री कस्तुरबा ह्याही एक होत्या. त्यांचे स्मारक म्हणून निधी गोळा झाला. "या निधीचा उपयोग कसा करायचा ?" असा प्रश्न जेव्हा गांधीजींना विचारण्यात आला तेव्हा ते म्हणाले,

"माझी पत्नी खेडेगावांतील महिलांची प्रतिनिधी होती. म्हणून खेड्यांतील महिलांचे व मुलांचे कल्याण होईल अशी कामे दोन हजार वस्तीच्या खेडेगावांतून सुरू करा."

गांधीजींचा आदेश शिरोधार्य मानून कार्यकर्ते कामास लागले. प्रत्येक राज्यातून ग्रामसेविका प्रशिक्षण कार्यालय काढायचे ठरविले. ही विद्यालये चालविण्यासाठी कार्यकर्ते तयार करण्याकरिता अखिल भारतीय स्वरूपाचे एक शिबिर १९४५ च्या मार्चमध्ये बोरिवली येथे घेण्यात आले.

बी० ए० झालेल्यांनाच त्या शिबिरात प्रवेश होता. मी फक्त मॅट्रिक होते. त्यामुळे धडपड करूनच मला या शिबिरात प्रवेश मिळाला. हा प्रवेश मिळाला नसता तर कै० पू० ताराताई मोडक मला भेटल्या नसत्या. आणि त्या भेटल्या नसत्या तर माझे आयुष्य आज आहे त्यापेक्षा कितीतरी वेगळे झाले असते !

शिबिरात आम्ही वीस राज्यांतून ऐंशी शिबिरार्थिनी होतो. संचालिका होत्या श्रीमती मृदुलाबेन साराभाई. मुख्य व्यवस्थापिका होत्या पूर्वाश्रमीच्या अनुताई भागवत आणि आताच्या सौ० अनुताई लिमये. एकेका झोपडीत भिन्नभाषीय अशा

चार-चार भगिनी राहिल्या होतो. पहाटे पाचपासून रात्री दहा वाजेपर्यंत कार्यक्रम चालत असत. सफाई, सूतकताई, व्याख्याने, खेळ वगैरे सर्व काही असे. रात्रीचा पहाराही आम्हांला करावा लागत होता. प्रत्येक राज्यातील चार भगिनींपैकी एक विद्यालय-संचालिका, दुसरी गृहमाता, तिसरी शिस्तपालन व इतर कार्य पाहणारी कार्यकर्ती व चौथी बालवाडी-शिक्षिका, अशी वाटणी होती. दिवसातला काही वेळ या विशिष्ट अभ्यासासाठी ठेवलेला होता. मी शिक्षिका म्हणून मला 'बालवाडी-शिक्षिका' गटामध्ये घातले गेले. समाजसेवा करण्यासाठी पुणे सोडलेली मी पुन्हा शिक्षिकाच होणार होते! या योगाची मला मजा वाटली. पण बालवाडी चालविणे हे काम मला अगदीच नवे होते म्हणून मला ते आवडले.

खेडेगावात बालवाडी कशी चालवावी याचा प्रयोग श्रीमती ताराताईंनी मुंबईतच एका मागास वस्तीतील कॉलनीमध्ये सुरू केला होता. त्यांनीच बोरिवली शिबिरात बालवाडीबाबत मार्गदर्शन केले. त्या दुपारी येऊन व्याख्याने देत. श्री० शेलत नावाचे तरुण गुजराती शिक्षक प्रत्यक्ष बालवाडी चालवून दाखवीत असत. मातीकाम, रंगकाम वगैरे स्थानिक वस्तूंचा उपयोग करून व्यवसाय घेणे; गाणी, गोष्टी व खेळ घेणे वगैरे प्रात्यक्षिके दाखवीत असत. गुजराती भाषेचा व माझा आतापर्यंत मुळीच संबंध नव्हता. पण येथे ती वारंवार कानावर येऊ लागली. एक अगदी नवे दालन म्हणून मला फारच मजा वाटायची.

ताराताईंनी शेलतभाईंना विचारले की, "पुढे खेडेगावात बालवाडी चालवायला योग्य अशी कुणी यांत दिसते का?" त्यावर शेलतभाईंनी ताराताईंना माझेच नाव सांगितले होते, असे पुढे मला कळले.

शिबिराच्या समारोपाला महात्मा गांधीजी स्वतः आले होते. त्यांचे प्रत्यक्ष दर्शन त्याच वेळी मला प्रथम घडले.

## शिबिरानंतर काय?

निरोप घेऊन आम्ही आमच्या ठिकाणी परतलो. बाकीच्या राज्यांनी आपापली विद्यालये सुरू केली. महाराष्ट्रात मंदगतीने हालचाल चालू होती. मी हुजूरपागेतील नोकरी सोडून बसले होते. आता काय करायचे? असा प्रश्न माझ्यापुढे होता. श्रीमती मृदुलाबेन यांच्या मागे मी तगादा लावला.

"बिहारला जाशील का?" असे मृदुलाबेननी विचारले.

"कुठेही जायची माझी तयारी आहे." मी त्यांना कळविले.

आणि एक दिवस तार आली—"बिहारला जाण्याच्या तयारीनिशी निघावे." मला आनंद झाला!

पुण्यातील माझ्या मैत्रिणींचा मी निरोप घेतला. सारसबागेतील गणपतीच्या



साक्षीने खादीचा गणवेश भेट म्हणून मला देऊन त्यांनी मला भावपूर्ण निरोप दिला.

मुंबईस आल्यावर मृदुलाबेन म्हणाल्या,

"त्यांना एकच व्यक्ती हवी होती. शेलतभाईंना पाठविले आहे."

मी हतबुद्ध झाले! आता काय करणार? असा प्रश्न मला पडला.

"मी पुण्याला परत जाणार नाही!" असे मी मृदुलाबेनना सांगितले. तेव्हा त्या म्हणाल्या, "काही दिवस तू ताराबाई मोडक यांच्या शिशुविहारमध्ये अनुभव घे. महाराष्ट्रात केंद्र लवकरच सुरू होईल."

मुंबई मला अगदीच नवीन होती. राहायचे कुठे? कसे करायचे? असे प्रश्न होते. परंतु बापूंचे भाचे श्री० दत्तोपंत दाते हे कुर्ल्याला राहत होते. त्यांच्या येथे राहण्याची सोय झाली. तेथून रोज मी शिशुविहारात येत होते.

## आईने मुलीकडून मला विकत घेतले!

शिशुविहारचा एकूण कार्यक्रम व कै० पू० ताईंची व्याख्याने या सर्वांचे मला आकर्षण होते. पण आपले सर्व अनिश्चित आहे, ही गोष्ट मी विसरू शकत नव्हते. दर पंधरा दिवसांनी मी मृदुलाबेनना भेटत असे.

"अजून काही जमत नाही—आणखी थोडे दिवस थांब!" असेच त्यांचे उत्तर असायचे. त्यांच्याकडून दरमहा पन्नास रुपये मात्र मिळत होते. आमची ही गडबड ताई पाहत होत्या. त्यांना पालघरच्या जवळपास खेडेगावात बालवाडी चालवायचा प्रयोग सुरू करायचा होता. त्यांनी मला विचारले, "तू येशील का?" त्यावर "श्रीमती मृदुलाबेननी (कस्तुरबा ट्रस्टने) सोडले तर येईन" असे मी सांगितले.

श्रीमती सरलादेवी साराभाई या नूतन बाल शिक्षण संघाच्या अध्यक्षा होत्या. खेडेगावातले हे काम नू० बा० शि० संघामार्फत चालायचे होते. मृदुलाबेन या श्रीमती सरलादेवींच्या कन्या होत्या. आईने मुलीजवळ माझी मागणी केली. आणि महाराष्ट्रात कस्तुरबा विद्यालयाचे लवकर काही जमण्याची चिन्हे नसल्यामुळे मुलीने आईची मागणी मान्य केली!

मात्र कस्तुरबा ट्रस्टने माझ्या पगारानिमित्त खर्च केलेले सहा महिन्यांचे तीनशे रुपये नू० बा० शि० संघाने परत द्यावे, अशी अट घातली. श्रीमती सरलादेवींनी ती आनंदाने मान्य केली.

अशा तऱ्हेने नू० बा० शि० संघाने मला कस्तुरबा ट्रस्टकडून तीनशे रुपयांस विकत घेतले!

अहमदाबाद येथील कॅलिको मिल्सचे मालक श्री० अंबालाल साराभाई यांच्या सरलादेवी या पत्नी होत्या. प्रसिद्ध अणुशास्त्रज्ञ श्री० विक्रम साराभाई यांच्या त्या माता होत्या. अत्यंत कर्तव्यदक्ष, साध्या राहणीच्या आणि उदार स्वभावाच्या

सरलादेवींनीही माझ्या मनावर पुष्कळ संस्कार केलेले आहेत हे जाता जाता सांगावेसे वाटते.

सप्टेंबर १९४५ मध्ये ताराताईंनी मला एकटीलांच आघाडीचा सैनिक म्हणून पूर्वतयारीसाठी बोर्डीला पाठवले.

अशा रीतीने सांधा पूर्णपणे बदलून माझ्या आयुष्याची गाडी बोर्डीच्या रूळावर आली.

## ताराताईंशी एकरूपता

मी बोर्डीला गेले आणि माझ्या जीवनाचा सूर मला सापडला. बोर्डी आणि कोसबाड येथे आमच्या 'ग्राम बाल शिक्षा केंद्रा'ने केलेल्या अक्षय्य धडपडीचे चित्र आज मला डोळ्यासमोर दिसत आहे.

जग ज्यांना श्रीमती ताराबाई मोडक म्हणून ओळखते आणि आम्ही ज्यांना ताराताई म्हणतो, त्यांच्या प्रेरणेने आणि मार्गदर्शनाने शिक्षणक्षेत्रात काही मूलभूत कामगिरी ग्राम बाल शिक्षा केंद्राने केलेली आहे.

विशेषतः ग्रामीण बालवाड्या आणि आदिवासी शिक्षण या दोन गोष्टींवर केंद्राने सर्व लक्ष केंद्रित केलेले आहे.

२४ डिसेंबर १९४५ रोजी कै० बाळासाहेब खेर यांच्या हस्ते बोर्डी येथे या केंद्राचे उद्‌घाटन झाले. त्या वेळी खेडेगावातील बालवाड्या शास्त्रीय रीतीने पण कमी खर्चात कशा चालवाव्यात याचा प्रयोग करणे एवढे एकच उद्दिष्ट संस्थेच्या डोळ्यासमोर होते.

प्रत्यक्ष काम करताना अनेक नव्या नव्या समस्या उभ्या राहिल्या. त्या समस्यांची उकल करता करताच नवे उपक्रम निघत राहिले.

आज ३८ वर्षांनंतर ग्राम बाल शिक्षा केंद्राने ग्रामीण बालशिक्षण, आदिवासी शिक्षण, प्रौढ शिक्षण, शाळा आणि व्यवसाय शिक्षण, शैक्षणिक साधने तयार करणे, अशा अनेक गोष्टींमध्ये प्रयोगात्मक काम करून महत्त्वाची मूलभूत कामगिरी केली आहे.

बालवाडी, अंगणवाडी, विकासवाडी, कुरणशाळा, रात्रशाळा, उद्योगवर्ग, कार्यानुभव-प्रकल्प, अशा अनेक प्रकारच्या शाळा आणि पूरक कामे एकातून एक निघत गेली. या सर्व गोष्टी घडत असताना कडू-गोड अनुभव येत गेले. आशा-निराशा यांचे द्वंद्व चालू होते. गावाचा सहकार, कार्यकर्ते, आर्थिक परिस्थिती वगैरे अनेक गोष्टींमध्ये अनुकूलता, प्रतिकूलता येत-जात होती.

परंतु ताराताईंची जिद्द आणि यशस्वी मार्गदर्शन यामुळे संस्थेचे कार्य थांबले नाही. उलट, दिवसेंदिवस ते विकसतच गेले.



आज संस्था कोसबाड टेकडीसारख्या निसर्गरम्य ठिकाणी स्वतःच्या जागेत काम करीत आहे. ४ पाळणाघरे, ११ बालवाड्या, १ पूर्वप्राथमिक शाळा, कुरणशाळा, ३० प्रौढ शिक्षणशाळा, कार्यानुभव-प्रकल्प, साक्षरता टिकविण्यासाठी असलेले मुद्रणालय, सुतारकामाचा कारखाना, आदी शैक्षणिक प्रकल्प चालू आहेत. त्याचप्रमाणे डी० एड० आणि प्री—डी० एड०चे वर्ग, म्हणजेच प्राथमिक आणि पूर्वप्राथमिक शिक्षकांसाठी प्रशिक्षणवर्ग, बालसेविका वर्ग, अंगणवाडी वर्कर्स ट्रेनिंग, सकस आहार प्रशिक्षण आदी प्रशिक्षणकार्यही चालू आहे.

ग्राम बाल शिक्षा केंद्राच्या कार्याचा हा व्याप उभा कसा झाला? या केंद्राच्या आद्य संचालिका कै० ताराताई मोडक यांनी भावनगरहून पूर्वप्राथमिक शिक्षणाची शिदोरी कशी मिळवली? शिशुविहार ह्या मुंबईतील संस्थेत भावनगरहून आणलेल्या शिदोरीत भर कशी घातली? त्या अनुभवांच्या जोरावर बोर्डीला ग्राम बाल शिक्षा केंद्र कसे उभे केले? हे आणि अशा तऱ्हेचे असंख्य प्रश्न आज माझ्या भोवती उत्तरांचा गोफ विणीत नाचत आहेत.

तुम्हांला काय काय सांगू आणि कसं कसं सांगू, असा प्रश्न मध्येच मला बेचैन करीत आहे.

ताराताईंनी बोर्डी आणि कोसबाड येथे उभ्या केलेल्या कार्याचा विचार, त्यांच्या भावनगर आणि मुंबईतील कार्याचा विचार केल्याविना अपुरा ठरेल.

आता माझ्या आठवणींशी आणि आयुष्याशी ग्राम बाल शिक्षा केंद्र व ताराताई यांचे जीवन एकजीव झालेले आहे. त्यामुळेच बोर्डीच्या अनुभवांकडे वळण्यापूर्वी माझे मन ताराताईंच्या पूर्वेतिहासाकडे झेपावते आहे. हा इतिहास समजल्याशिवाय आमच्या कार्याची बैठक समजू शकणार नाही.

## ताराताईंचा पूर्वेतिहास

ग्राम बाल शिक्षा केंद्राच्या मूळ सूत्रचालिका कै० ताराताई मोडक यांचा जन्म १८९२ साली मुंबई येथे झाला. श्री० सदाशिवराव केळकर व श्रीमती उमाबाई केळकर यांच्या पोटी त्यांचा जन्म झाला. ही मंडळी प्रार्थनासमाजाची निस्सीम उपासक होती. श्री० सदाशिवराव हे 'स्त्रियांनी शिकले पाहिजे, खूप कामगिरी करून दाखविली पाहिजे' या पुरोगामी विचाराचे होते. त्यामुळे त्या वेळच्या समाजाच्या आक्षेपांना न जुमानता त्यांनी आपल्या दोन्ही कन्यांना शिकविले. ताराताईंचे वडील अकाली निधन पावले तरीही त्यांच्या आईने व वडील भावाने या दोघींचे शिक्षण चालूच ठेवले. दोघींनाही पदवीधर केले. त्या काळी पदवीधर स्त्री दिसणे हे दुर्मिळच होते.

पदवीधर झाल्यावर ताराताईंचे लग्न उमरावतीचे एक हुशार वकील श्री० के० व्ही० मोडक यांच्याशी झाले. त्यांना प्रभा नावाची मुलगी झाली. श्री० मोडक हे

नावाजलेले वकील होते. पण काहीसे दुराग्रही होते. व्यसनाच्या आधीन झाले होते. त्यामुळे ताराताईंना मुलीसह घर सोडणे भाग पडले.

लौकरच राजकोट येथे बार्टन फीमेल ट्रेनिंग कॉलेजच्या लेडी सुपरिंटेंडेंट म्हणून त्यांना महत्त्वाची जागा मिळाली. यापूर्वी ही जागा युरोपियन स्त्रियांना मिळायची. ताराताई या पहिल्याच भारतीय महिला!

## ताराताईंचे जीवितकार्य ठरले

राजकोटला गुजराती भाषा. ती आपल्याला आली पाहिजे म्हणून ताराताईंनी स्वतंत्र शिक्षक ठेवून त्या भाषेचा अभ्यास केला. त्या अत्यंत सफाईने गुजराती बोलत आणि लिहीत. त्यामुळे त्यांना पुष्कळ मंडळी गुजरातीच समजत असत.

याच वेळी भावनगर येथे श्री० गिजूभाई बधेका यांनी बालशिक्षणाबाबत काही नवा उपक्रम सुरू केल्याचे त्यांनी ऐकले. प्रभा त्या वेळी अडीच-तीन वर्षांची असेल. तिला सर्व बाजूंनी योग्य शिक्षण मिळावे म्हणून त्यांचे प्रयत्न असायचे. तेव्हा ही नवीन बालशाळा कशी असावी याची त्यांना जिज्ञासा वाटणे साहजिकच होते. एका रविवारी त्या प्रभाला घेऊन भावनगरला गेल्या. तेथील बालशाळा पाहून व त्यामागील कल्पना ऐकून इतक्या प्रभावित झाल्या की राजकोटची मानाची सरकारी नोकरी सोडून त्या भावनगरला या प्रयोगातच दाखल झाल्या. आणि तेच त्यांचे जीवनकार्य ठरले! १९२३ ते १९३२ पर्यंत त्या तेथे होत्या.

## ताईंचे गुरू : श्री० गिजूभाई बधेका

श्री० गिजूभाई यांच्या विषयीची माहिती जाणून घेणे आवश्यक ठरेल. त्यांचे संपूर्ण नाव गिरिजाशंकर बधेका. वकिलीचा कोर्स करून कामानिमित्त ते आफ्रिकेलाही जाऊन आले होते. त्यानंतर वढवाण या काठेवाडमधील शहरी येऊन त्यांनी वकिली सुरू केली.

काठेवाडमध्ये त्या वेळी खूप लहान लहान संस्थाने होती. एकूण सुबत्ता होती. पण सर्वसामान्य लोक शेतकरीच होते. खेड्यापाड्यांतून त्यांची शेती चालत असे. तेथे शाळा नव्हत्या. शिक्षणाचे लोण अजून तेथपर्यंत पोहोचले नव्हते. पण काही मंडळींना वाटत होते की आपली मुले शहरात जाऊन शिकून शहाणी व्हावीत. पण त्यांना ठेवायचे कोणाकडे? शहरात सगळ्यांचेच नातेवाईक नव्हते. आणि नातेवाईक असले तरी नातेवाइकांना ती मुले ठेवून घेणे आवडतेच असे नाही. त्यामुळे भावनगरमध्ये असलेल्या छात्रालयांमध्ये काही जण आपल्या मुलांना ठेवीत असत. या छात्रालयांचे स्वरूप विद्यार्थी-वसतिगृहाचे असले तरी छात्रालय-संचालकांना विद्यार्थ्यांच्या राहणी-करणीवर देखरेख करणे जमत नसे. पुष्कळ पैसे देऊन राहणारी ही मुले! त्यांना काही बोललेले खपायचे नाही. केव्हाही यायची, केव्हाही जायची. जेवणाची, आंघोळीची कसलीच वेळ ती जुमानीत नसत. विड्या ओढणे, सिनेमा-नाटकांना जाणे सर्व चालू असायचे. पालकांना वाटे, आपली मुले शिकताहेत. ते स्वतः निरक्षर. त्यामुळे मुले मागतील तेवढे पैसे पाठवीत.



गिजूभाईंचे मामा श्री० हरगोविंददास यांना या गोष्टी फार खटकत होत्या. ते स्वतः, त्यांचे मित्र श्री० नानाभाई भट्ट आणि हरभाई त्रिवेदी या तिघांनी मिळून ठरवले की, आपण एक आदर्श छात्रालय काढावे. त्यांचे गुरू श्री० दक्षिणामूर्ती यांच्या आशीर्वादाने त्यांनी 'कुमार छात्रालय' सुरू केले. मुलांच्या चारित्र्य-घडणीकडे या मंडळींनी विशेष लक्ष दिले. परंतु त्यांच्या लक्षात असे आले की नुसते छात्रालय चांगले असून उपयोग नाही. शाळाही चांगली हवी. मग त्यांनी 'कुमार माध्यमिक विद्यालय' काढले. आता शाळा व छात्रालय दोन्ही याच मंडळींचे झाले. या शाळेत शिक्षकाचे काम करण्यासाठी ध्येयनिष्ठ असे बरेच शिक्षक आले.

## बालशिक्षणतंत्राचा साक्षात्कार

गिजूभाईंनी वढवाणची वकिली सोडून देऊन या शाळेत शिक्षकाचे काम पत्करले. अगदी कमी पगारात. मुलांचे सुचारित्र्य आणि सुशिक्षण डोळ्यासमोर ठेवून काम करणारी ही ध्येयनिष्ठ मंडळी होती. या मंडळींबरोबर काम करतानाच एक दिवस गिजूभाईंना बालशिक्षणतंत्राचा साक्षात्कार झाला व ते त्यांचे जीवनकार्य ठरले. गिजूभाईंचा या संदर्भातला इतिहासही उद्बोधक आहे.

गिजूभाई हे एकदा बाहेर जाण्याच्या तयारीत होते. त्याच वेळी त्यांचे एक मित्र दरबार गोपाळदास तेथे आले. त्यांच्याजवळ "प्रवासात वाचण्यासाठी म्हणून एखादे पुस्तक आहे का?" असे गिजूभाईंनी विचारले. तेव्हा 'मॉंटेसरी मेथड' हे पुस्तक त्यांनी दिले. गिजूभाईंना हे पुस्तक इतके आवडले की त्यांनी आपला प्रवास रद्द केला व पुस्तक वाचीत बसले! आपल्या भारतीय मुलांसाठी अशा बालशाळा असल्या पाहिजेत असे त्यांच्या मनाने घेतले.

गिजूभाईंचे मामा व श्री० नानाभाई भट्ट यांनी ही कल्पना उचलून धरली. ते म्हणाले, "तू तुझे प्रयोग कर. पैसे आम्ही पुरवू." गिजूभाई कामाला लागले.

१९२० साली भावनगरला गावाबाहेर तक्तेश्वर प्लॉटमध्ये त्यांची पहिली बालशाळा सुरू झाली. जेथे बालकांची पूजा (म्हणजेच त्यांच्या योग्य विकासासाठी सोय) केली जाते ते 'बालमंदिर'! अत्यंत पूज्य भावनेने हे काम सुरू झाले.

गिजूभाईंच्या या बालमंदिरापूर्वी भारतातील मोठ्या शहरांतून किंडरगार्टन अगर नर्सरी स्कूल्स कोठे कोठे चालत असत. इंग्लिश माध्यम, इंग्लिश चालीरीती! फी जबरीच! पैसेवाल्यांनाच परवडणारी!

एक प्रकारची पैसेवाल्यांची हौस म्हणूनच ही मुले नर्सरी स्कूलमध्ये जात असत. यामागे काही मानसिक वा शैक्षणिक कारण आहे, याची कोणीच दखल घेतली नव्हती. पण गिजूभाईंचे बालमंदिर हे सर्वसामान्यांच्या मुलांसाठी होते. तेथे मातृभाषेतून शिक्षण मिळणार होते. आतील सर्व गोष्टी भारतीय चालीरीतींना धरून होत्या. मुलांच्या विकासासाठी या पद्धतीच्या शाळा हव्यातच असे त्यांना वाटत होते. या शाळा चालवताना स्वातंत्र्य, स्वयंस्फूर्ती, स्वयंशिक्षण व व्यक्तिगत शिक्षण हे चार मूलभूत सिद्धांत त्यांनी डोळ्यासमोर ठेवले होते.

हे मंत्र जपत असतानाच ते अंमलात आणण्याचे तंत्र मात्र त्यांनी भारतीय देश-वेश, चालीरीती या सर्वांना अनुसरून त्याला पोषक असेच स्वतः प्रस्थापित केले होते. त्यांची ही बालशिक्षणक्षेत्रातील अमोल देणगीच.

## मिशीवाली आई बालसाहित्य-सम्राट झाली !

गिजूभाई गोष्टी फार चांगल्या सांगत. गोष्टींची नाटके करीत असत. स्वतः भाग घेत. मुलांचे ते फार आवडते होते. त्यामुळे उग्र, भव्य चेहरा असूनही त्यांना 'मिशीवाली आई' म्हणून मुले म्हणत असत.

त्या वेळी मुलांसाठी म्हणून बालसाहित्य नव्हतेच. म्हणून गिजूभाईंनी छान छान गोष्टी लिहिल्या. 'बाळवार्ताओ' म्हणून गोष्टींचे ५ भाग आहेत. लहान मुलांनी वाचावे अगर त्यांना वाचून दाखवावे असे लहान लहान धडे त्यांनी लिहिले. इंग्रजी 'ऱ्हाइम्स'च्या पद्धतीने बडबडगीते लिहिली. अशा रीतीने त्यांनी पुष्कळ छोटी छोटी पुस्तके लिहिली. म्हणून गुजरातमध्ये त्यांना 'बालसाहित्य सम्राट' म्हणतात.

या सर्व कामामध्ये गिजूभाईंना ताराताईंची फार मोठी मदत झाली.

## बाल अध्यापन मंदिर

गिजूभाई आणि ताराताई या दोघांचे मिळून बालशिक्षणाच्या क्षेत्रामध्ये प्रायोगिक काम चालू होते. त्याचा बोलबाला वर्तमानपत्रे, सभा, मुलाखती यांद्वारा होत होता. आपणही आपल्या गावात अशा बालशाळा काढाव्या असे अनेकांना वाटू लागले. त्यातून भावनगर येथे 'बाल अध्यापन मंदिर' (पूर्वप्राथमिक प्रशिक्षणकेंद्र) सुरू झाले. बाल अध्यापन मंदिराचा अभ्यासक्रम १ वर्षाचा होता. शैक्षणिक पात्रतेबद्दल फारसा आग्रह नव्हता. लिहिता वाचता येणे आणि मुलांविषयी प्रेम असणे या दोन गोष्टी प्रवेशासाठी आवश्यक समजल्या जात. पुरुष आणि स्त्रियांना प्रवेश होता. अभ्यासक्रम गिजूभाई आणि ताराताईंनी ठरविला होता. त्यात तात्त्विक आणि प्रात्यक्षिक असे दोन भाग होते. दोघांचीही डॉ० मॉंटेसोरींवर पूर्ण श्रद्धा होती. परंतु किंडरगार्टनमधील हस्तव्यवसाय, गोष्टी, नाटके इ० उपयुक्त विभाग त्यांनी उचलले होते.



## इसाप-पंचतंत्रातील गोष्टींना स्थान हवे

गोष्टींबद्दल डॉ० मॉंटेसोरीबाईंचा एक कटाक्ष आहे : सत्य घटनाच मुलांच्या पुढे ठेवाव्यात. काल्पनिक गोष्टी, जादू-परी वगैरेसारख्या हवेत तरंगणाऱ्या गोष्टी, राक्षस, चेटकीण यांच्या भयानक गोष्टी या सर्वांना डॉ० मॉंटेसोरींनी फाटा दिला होता. गिजूभाई व ताराताई यांनी सुवर्णमध्य साधला. काल्पनिक, अतिरंजित, भयानक गोष्टी सांगू नयेत; पण कावळा, चिमणी, मांजर, वाघ, सिंह हे एकमेकाशी बोलतात, त्यांची मैत्री होऊ शकते हे गृहीत धरून तशा गोष्टी सांगायला हरकत नाही, असे त्या दोघांचे मत पडले. इसापाच्या गोष्टी, पंचतंत्रातील गोष्टी अशांना हरकत असू नये असे त्यांचे म्हणणे होते. म्हणून तशा गोष्टी व त्यांची बालनाटके त्यांनी मोठ्या प्रमाणात दाखल केली होती. जीवन-व्यवहार-विभाग, तसेच गणित-भाषा-विभाग यांचा मोठ्या प्रमाणात विकास झाला होता.

## बालमंदिरांना राजाश्रय

प्रशिक्षणार्थी वरील सर्व तंत्र प्रत्यक्ष अवलोकनाने व कृतीने आत्मसात करीत. परीक्षा उत्तीर्ण होऊन आपापल्या गावी जाऊन बालमंदिर सुरू करीत. काठेवाडातील लहानमोठ्या संस्थानिकांनी ही नवी कल्पना ताबडतोब उचलून धरली. या राजाश्रयामुळे बालमंदिरांसाठी सुसज्ज इमारती बांधण्यात आल्या. मोरवी येथील बालमंदिराची इमारत ही एखाद्या महाविद्यालयासही मागे टाकील अशी आहे!

हौस म्हणून पालक आपल्या मुलांना बालमंदिरात पाठवत असले, तरी "शाळेत घातले की लगेच मुले अक्षर व गणित ज्ञान घेतील आणि लवकर वरच्या वर्गात जाऊन ११-१२ वर्षांच्या वयालाच मॅट्रिक होतील," अशी कित्येक पालकांची समजूत असायची.

"एवढ्या लहान मुलांसाठी कसली शाळा? हे काय नवे खूळ?" असाही सर्वसाधारण लोकांचा प्रश्न होता.

## नू० बा० शि० संघ स्थापना

गिजूभाई वेगवेगळ्या समारंभांच्या व सभांच्या निमित्ताने पालक-शिक्षक-चालक सामंजस्य निर्माण करण्याचा प्रयत्न करीत होते. बालमंदिराचे महत्त्व सांगत होते.

बालशिक्षणाच्या प्रचाराचे हे काम एकाच्या हाताने करण्यापेक्षा एखाद्या संस्थेच्या द्वारे व्हावे असे त्यांना वाटू लागले. आणि त्यामधूनच 'नूतन बाल शिक्षण संघा'ची स्थापना झाली.

नू० बा० शि० संघाची स्थापना फेब्रुवारी १९२९ मध्ये झाली. शिक्षण हे जिवंत शास्त्र असल्यामुळे त्यात बदल नेहमीच अपेक्षित आहेत. कोणतीही एक पद्धती

त्रिकालाबाधित राहू शकत नाही. म्हणून सदैव जिवंत शिक्षणपद्धती आचरणारा संघ या अर्थाने या संघटनेचे नाव 'नूतन बाल शिक्षण संघ' ठेवण्यात आले.

नू० बा० शि० संघाच्या प्रथम अध्यक्षा श्रीमती सरलादेवी साराभाई या होत्या. त्यांनी २५ वर्षेपर्यंत संघाची धुरा समर्थपणे वाहिली. संघाचे चिटणीस गिजूभाई, तर सहचिटणीस ताराताई होत्या. ट्रस्टी मंडळाचे प्रथम अध्यक्ष कै० मंगळदास पक्वासा होते. आजचे अध्यक्ष माजी पंतप्रधान मोरारजीभाई देसाई हे आहेत.

### 'शिक्षणपत्रिका'

गिजूभाईंनी नू० बा० शि० संघातर्फे बालशिक्षण-प्रचारासाठी 'शिक्षणपत्रिका' हे मासिक मुखपत्र सुरू केले. या मासिकात ते स्वतः पुष्कळ लिहीत असत. ताराताई आणि अन्य सहकाऱ्यांनाही लिहायला लावीत. पालक-शिक्षक-बालक आणि बाल-मंदिरे-चालक यांना मार्गदर्शन करणारे लेखन या पत्रिकेतून प्रसिद्ध होई. घरामध्ये पालकांचे मुलांशी वागणे, परस्परांशी वागणे, घरातील वातावरण व त्याचा मुलांच्या चरित्रघडणीवर होणारा परिणाम इत्यादींची चर्चा पत्रिकेत असे.

### बच्चू आणि लाडू

श्री० गिजूभाई घरातील बालके व पालक यांचे होणारे प्रेमळ तंटे, वादविवाद गंमतीने रंगवीत असत :

"आज बच्चूने लाडू मागितला. आईने दिला नाही. मग त्याने डबा पाडला. लाडू सांडले. मग बच्चूच्या आईने बच्चूला धम्मकलाडू दिले!"

### साग्रसंगीत वेणी

"आज मृदुलाची आई तिची वेणी घालीत होती. मृदुलला आईने घेतलेले केसाचे वळण पसंत नव्हते. आईला मृदुलचे म्हणणे मान्य नव्हते. मग मृदुल वेणीसाठी नीट बसत नव्हती. आई तिला धपाटे घालीत होती. केसाची हिसकाहिसक होत होती. अशी साग्रसंगीत वेणी चालली होती."

### "कर्णपिशाच्च अनुकूल?"

"आज रमेशच्या आई-वडिलांना सिनेमाला जायचे होते. पण रमेशला न्यायचे नव्हते. त्याला लाडीगोडी लावून आत्याच्या घरी पाठवून दिले होते. पण ऐन बाहेर पडायच्या वेळी रमेशची स्वारी घरी परतली. दारातच गाठ पडली. रमेश आईला सोडीना! आणि मग पुढे काय झाले असेल? तुम्हीच कल्पना करा."



—अशा रीतीची, घराघरातून घडणारी कितीतरी उदाहरणे शिक्षणपत्रिकेतून येत असत.

पालक म्हणायचे, "या गिजूभाईंना कर्णपिशाच्च अनुकूल आहे काय? आमच्या घरातील खडान्खडा माहिती यांना कशी मिळते?"

शिस्तीच्या नावाखाली मुलांना घरामध्ये फार क्रूरपणे वागविले जाते, असे गिजूभाईंचे म्हणणे होते. मुलांना मारू नका, त्यांना सन्मानाने वागवा, असे त्यांचे आग्रहपूर्वक सांगणे होते.

गुजराती भाषेतील ही पत्रिका १९५६ पर्यंत चालली. मराठी शिक्षणपत्रिका ताराताईंनी १९३३ साली सुरू केली-ती अजूनही चालू आहे. हिंदी पत्रिकाही ताराताईंनी सुरू केली होती, ती १० वर्षे चालली.

नू० बा० शि० संघातर्फे बालशिक्षणाचा प्रचार करण्यासाठी संमेलने भरत असत. संघाच्या अनेक शाखाही निघाल्या.

### गिजूभाईंचे निधन

१९३२ साली श्रीमती ताराताईंनी घरगुती कारणासाठी भावनगर सोडले. श्री० गिजूभाई नंतर १९३८ साली भावनगर सोडून आजारपणाच्या कारणास्तव राजकोटला गेले. तेथेही बिछान्यात पडून ते बालअध्यापन मंदिर चालवत होते.

२३ जून १९३९ रोजी मुंबई येथे हरकिसनदास हॉस्पिटलमध्ये गिजूभाईंचे निधन झाले.

### महात्माजींनी त्रिसूत्री दिली

गिजूभाईंची डॉ० मॉंटेसोरींवर अतिशय निष्ठा होती. एकलव्याप्रमाणे ते भक्ती करीत होते. इटलीमधील राजकीय परिस्थितीमुळे डॉ० मॉंटेसोरींना तेथून हद्दपार व्हावे लागणार असल्याचे कळताच गिजूभाईंनी त्यांना भारतात येण्याचे आग्रहाचे निमंत्रण केले. त्यांच्या स्वागताची ते तयारी करीत होते. पण या गुरुशिष्यांच्या प्रत्यक्ष भेटीचा योग नव्हता! गिजूभाईंच्या निधनानंतर १ वर्षाने डॉ० मॉंटेसोरी भारतात आल्या! मद्रासजवळील अड्यार गावी थिऑसॉफिस्ट सोसायटीमध्ये श्रीमती रुक्मिणीदेवी अरुंडेल यांच्या त्या पाहुण्या होत्या. ८ वर्षे त्या भारतात राहिल्या. मोठमोठ्या शहरी त्यांचे ३/३ महिन्यांचे प्रशिक्षण-वर्ग झाले. या वर्गात नुसती व्याख्यानेच होत असत. त्यानंतर खास मॉंटेसोरी पद्धतीने चाललेल्या बालमंदिरात एक वर्ष अनुभव घ्यायचा; मग सर्टिफिकेट मिळत असे. हे वर्ग इंग्रजी माध्यमातून चालत असत. फी जबर होती. तो काळ स्वातंत्र्य-आंदोलनाचा होता. परदेशी कोणत्याही गोष्टीबद्दल विचारवंत व भावनाशील मंडळींना तिरस्कार होता.

तो स्वाभाविक होता. डॉ० मॉंटेसोरी या युरोपियन बाई, त्यांची पद्धती महागडी, तेव्हा आपल्या देशाला ती नकोच, असे या मंडळींचे मत झाले होते. विचारवंतांच्या नव्या बालशाळांना यामुळे पाठिंबा मिळत नव्हता. म्हणूनच १९४६ साली श्रीमती ताराताई महात्मा गांधीजींना महाबळेश्वर येथे भेटल्या. त्यांनी मॉंटेसोरी पद्धतीची सर्वसामान्यांसाठी—ग्रामीण बालकांसाठीसुद्धा—कशी जरुरी आहे ते पटवून दिले. महात्माजींना ते पटले. त्यांनी एक त्रिसूत्री दिली :

१. साधने गावातील कारागिरांनीच तयार करावी.

२. करता येतील तेवढी साधने शिक्षकांनी बनवावीत.

३. आजूबाजूच्या परिसरातील उपलब्ध असणाऱ्या वस्तूंमधूनच शक्यतो साधने बनवावीत.

ताराताईंच्या विचारास पोषक अशीच ही त्रिसूत्री होती. त्यामुळे ती अत्यंत निष्ठेने अंमलात आणली गेली. आणि ग्रा० बा० शि० केंद्रात अजूनही अत्यंत कटाक्षाने पाळण्यात येते.

## संघाची चार कामे

गिजूभाई यांच्या निधनानंतर श्रीमती ताराताई या नू० बा० शि० संघाच्या मुख्य चिटणीस झाल्या. संघ त्यांनी रजिस्टर करून घेतला. संघाच्या कामाला वेग येण्यासाठी गुजराती, मराठी, हिंदी अशा भाषिक शाखा ठरविण्यात आल्या.

भाषिक शाखेतर्फे बडोदा येथे संमेलन भरवले गेले. इंदूर येथे १९४६ साली बाल-निकेतन संघाच्या सहकाऱ्यांची अखिल भारतीय बालशिक्षण परिषद झाली. तिचे उद्घाटन डॉ० झकीर हुसेन (त्या वेळचे उपराष्ट्रपती) यांनी केले.

१९४७ मध्ये मालाड येथे आंबेवाडीत ३ दिवसांचे एक शिबिर भरले होते. त्या वेळी ताराताईंना सतत तीन तास बोलताना आम्ही पाहिले. त्यांच्या वक्तृत्वाने मी फारच प्रभावित झाले.

ताराताईंनी संघाची मुख्य चार कामे ठरविली :

१. बालशिक्षणाचा प्रचार करणे; त्यासाठी सभा, संमेलने, परिषदा आदींची योजना करणे.

२. संघाला जोडलेल्या बालमंदिरांचे निरीक्षण करून मार्गदर्शन करणे.

३. 'शिक्षणपत्रिका' चालविणे.

४. ग्रामीण विभागात बालशिक्षणाचे कार्य कसे करता येईल हा प्रयोग स्वत: करून पाहणे.

वार्षिक १० रुपये देऊन १०० बालमंदिरे संघाला जोडली गेली होती. आता शासनाकडून बालमंदिराला मान्यता मिळते व वार्षिक तपासणी होते. त्यामुळे संघातर्फे होणाऱ्या तपासणीची गरज उरलेली नाही.



## ताराताई आणि राजपुत्र

ताराताईंनी नू० बा० शि० संघाची जी ४ कामे ठरविली त्यांपैकी खेडेगावात प्रत्यक्ष प्रायोगिक स्वरूपाचे काम करणे हे एक होते. त्यासाठीच १९४५ साली बोर्डी येथे ग्राम बाल शिक्षा केंद्राची स्थापना केली. पण त्याआधी ताराताईंचे बासदामधील व मुंबईतील कार्य माझ्या डोळ्यांसमोर उभे राहते.

भावनगर सोडल्यानंतर एक-दीड वर्ष ताईंनी गुजरातमधील बासदा संस्थानच्या राजपुत्राच्या शिक्षिकेचे काम केले. सहा बहिणींवरचा हा एकुलता एक भाऊ. राजपुत्र. सर्वांचा लाडका. वय ६ वर्षे. ताईंनी भावनगर येथे जमविलेल्या शिदोरीच्या आधारे त्याला शिकवायला सुरवात केली. खरे म्हणजे 'शिकविणे' हा शब्द मॅडम मॉंटेसोरी, गिजूभाई आणि ताराताई यांच्या शब्दकोशात नव्हता. 'शिकणे' हाच शब्द होता. मुलांनी स्वतःच्या प्रयत्नांनी शिकायचे. त्यासाठी योग्य वातावरण तयार करणे, सोयी व संधी उपलब्ध करून देणे, आणि योग्य तेथे मार्गदर्शन करणे हे शिक्षकांचे काम आहे, अशी त्यांची भूमिका होती. ताई राजपुत्राशी त्याच भूमिकेने वागत. दोघांनी मिळून छोटी बाग तयार केली. राजपुत्राने झाडाला पाणी घालायचे म्हणजे काय? लोकांना आश्चर्य वाटायचे. भीती पण वाटायची. पण ताई निर्भय होत्या. महाराज ताईंच्या पद्धतीवर खूष होते. मांसाहेबांना थोडी धाकधूक वाटत होती—आपला बाळ आजारी पडला तर? पण स्वतः राजकुमार खूष होता!

राजकुमार आता बासदा संस्थानचे महाराज आहेत! संस्थाने विलीन झाली तेव्हा हे छोटे संस्थानही विलीन झाले. पण हे महाराज (आम्ही त्यांना लालजी-साहेब म्हणतो), त्यांच्या पत्नी, दोन्ही मुले, बहिणी या सर्व मंडळींना ताईंच्याविषयी नितांत आदर आहे.

## ताराताई मुंबईत

बासदा सोडल्यावर ताई मुंबईला आल्या. तेथे एक आदर्श बालमंदिर सुरू करावे असे प्रयत्न सुरू झाले. दादर भगिनी समाजाने पाठिंबा दिला. श्री० गो० रा० परांजपे (एस्० एस्० सी० बोर्डाचे पहिले चेअरमन) व त्यांच्या पत्नी मालतीबाई यांनी सक्रिय सहकार दिला. हिंदू कॉलनी (दादर) येथे आपल्या बराच्या खालचा सर्व भाग बालमंदिरासाठी काही दिवस बिनामूल्य व नंतर अल्प भाड्याने त्यांनी दिला.

१९३६ साली मुंबईतील हे बालमंदिर 'शिशुविहार' या नावाने सुरू झाले. भगिनी समाजामध्ये वाद निर्माण होऊन 'शिशुविहार मंडळ' निघाले. त्या मंडळातर्फे ताईंनी शिशुविहाराचे काम चालू केले. प्रथमपासूनच मराठी व गुजराती दोन्ही

भाषांतील मुले त्या शिशुविहारात येत असत. गाणी, गोष्टी, खेळ दोन्ही भाषांमध्ये चालत असत. गणित-भाषेसारखे व्यवसाय त्यांच्या त्यांच्या मातृभाषेतून देत. लहान मुलांना दोन्ही भाषा समजू लागल्या.

### "छे! ती जोरात चालली आहे!"

अगदी लहानग्यांसाठी ही शाळा, म्हणून लोकांना फार कौतुक वाटे. काम करणाऱ्या ताराताई एकट्याच. पण अनेक व्यवसायांत मुले गुंतल्यामुळे शांतता असायची.

एकदा त्या वेळच्या कडक शाळातपासणीस मिस दस्तुर आल्या होत्या. त्या व्हरांड्यात उभ्या राहून म्हणाल्या,

"आज तुझी शाळा बंद आहे का?"

त्यावर ताईंनी सांगितले,

"छे, ती जोरात चालली आहे!"

मग आत जाऊन बाईंनी सर्व दालने बघितली. मुले आपआपल्या व्यवसायामध्ये तल्लीन होती. कोणी पाहुणे आल्याची त्यांनी दखलही घेतली नाही. दस्तुरबाई खूष झाल्या. त्या म्हणाल्या, "आतापर्यंत शाळा म्हणजे गलबला, गोंगाट—अगदी फर्लांगावरून ओळखावे येथे शाळा आहे—असा माझा अनुभव होता. पण आजचा हा अनुभव अपूर्व आहे!"

तेव्हापासून शिशुविहार पाहण्यास येणाऱ्या पाहुण्यांची वर्दळ वाढली. त्यांत अनेक शिक्षणतज्ज्ञ असायचे. ट्रेनिंग कॉलेजचे प्राध्यापक, विद्यार्थी वगैरेही असायचे.

### "गणित लवकर येण्यासाठी शाळा नाही!"

अशा रीतीने ताईंच्या या बालशाळेचा बोलबाला होत होता. पण तेथेही काही पालकांची समजूत घालावी लागत असे. सुशिक्षित पालकांची समजूत काढणे हे जास्त अवघड काम! एका पदवीधर मातेने आक्षेप घेतला होता,

"माझ्या मुलाला तुमच्या शाळेत येऊन ६ महिने झाले, तरी अजून एकही अक्षर लिहिता वाचता येत नाही!"

ताईंनी समजावले,

"लिहिणे-वाचणे लवकर यावे म्हणून ही शाळाच नाही! ठराविक वयात ठराविक मानसिक, बौद्धिक शक्तींचा विकास होत असतो. त्यास वाव देण्याचे आमचे प्रयत्न आहेत. तुमचा मुलगा लवकर लवकर अक्षर, गणित शिकेल असेही मी सांगणार नाही! कधीच शिकणार नाही असे पण मी म्हणत नाही. त्याने मागणी करताच अक्षर, गणित विषयाची साधने त्याला मिळतील. विकासाची ठराविक अवस्था येईल तेव्हा तो मागणी करीलच."



### बाल अध्यापन मंदिर

अशा रीतीने शिशुविहाराचे काम चालू होते. श्री० बाळ ओझरकर, श्री० शेष नामले यांच्यासारखे बालकनिष्ठ, हौशी व जिद्दी युवक ताईंना मिळाले. त्यामुळे कामास अधिक रंग चढला. हिंदू कॉलनीतील लहान मुले शिशुविहारामध्ये येत असत. त्यांना पोचविण्यासाठी व नेण्यासाठी माता येत. त्या काही वेळ तेथेच बसून बाल-लीला पाहत राहायच्या. काही जणी दुपारच्या निवांत वेळीही येत. अशा मातांपैकी एक सौ० सरलाताई देवधर होत्या. त्या म्हणाल्या,

"ताई, तुम्ही इतक्या मुलांना कसे छान खेळवता? आम्ही एकएकट्या मुलांना सांभाळताना पण कंटाळून जातो! कसे जमते तुम्हांला?"

"ती एक जादू आहे!"

"मग आम्हांला शिकवा ना ती जादू—"

"येत जा तुम्ही दुपारी चारच्या सुमाराला. आपण बोलू त्यासंबंधी."

—आणि हीच शिशुविहारमधील बाल अध्यापनाची सुरवात ठरली!

भावनगर येथे चालत असलेल्या अध्यापन मंदिरामध्ये प्रवेशासाठी शैक्षणिक पात्रतेची विशेष अट नव्हती. अभ्यासक्रम अनुभवातून तयार होत होता. सर्टिफिकेट गिजूभाईंच्या सहीने मिळत होते. त्यांची व पुढे ताईंची सही असल्यावर त्या सर्टिफिकेटच्या आधारावर चटकन काम मिळत असे. पण या प्रशिक्षणास अधिक व्यवस्थित स्वरूप ताईंनी दिले.

### पूर्वप्राथमिक अध्यापन नियंत्रण समिती

नू० बा० शि० संघातर्फे एक पूर्वप्राथमिक अध्यापन नियंत्रण समिती नेमली. या समितीने पुढील गोष्टी ताबडतोब केल्या—

१. प्रवेशासाठी शैक्षणिक पात्रता : मॅट्रिक्युलेशन पास.

२. अभ्यासक्रमाची मुदत : १ वर्ष.

३. वय : १७ वर्षे पूर्ण

सहामाही, वार्षिक परीक्षा घेणे, त्यासाठी परीक्षकांची नेमणूक करणे, प्रश्नपत्रिका काढणे वगैरे सर्व पद्धतशीर व्हावे.

सर्टिफिकेट नू० बा० शि० संघाच्या अध्यक्षांच्या सहीने मिळत असे. एक सही प्रिन्सिपॉलची असायची. अभ्यासक्रमाचे नाव 'बालवर' होते. मॅट्रिकपेक्षा कमी शिक्षण झालेल्यांसाठी काही दिवस अल्प मुदतीचा व पुढे वर्षाचा 'बाल अध्यापन प्रवेश' अगर 'क्रीडांगण' अभ्यासक्रम सुरू केला आणि सर्टिफिकेट देण्याची व्यवस्था केली. अर्थात दोन्हींच्या अभ्यासक्रमांत फरक होता. क्रीडांगणाच्या मंडळींसाठी तात्त्विक भाग कमी असायचा.

या समितीद्वारा मोठे काम झाले. ते म्हणजे पूर्वप्राथमिक शिक्षक प्रशिक्षणासाठी अभ्यासक्रम तयार करणे. समितीचे नाव असले तरी काम ताईंचेच होते. तासिका प्रश्नपत्रिका किती असाव्यात, विषय कोणते, प्रात्यक्षिकामध्ये काय काय असावे? अवलोकने, नमुना पाठ, विद्यार्थ्यांचे पाठ, हस्तव्यवसाय आदी सर्व गोष्टी नक्की झाल्या. अभ्यासक्रमाची ही मूळ चौकट. त्यानंतर कारणानुसार कालौघाप्रमाणे या अभ्यासक्रमावर अनेक हात फिरले आहेत; पण मूळ बैठक कायम आहे.

पूर्वप्राथमिक शिक्षण अगर प्रशिक्षण याकडे शासनाचे लक्ष वेधावे असे ताईंचे प्रयत्न असत. म्हणून या अध्यापन नियंत्रण समितीवर त्यांनी शासनाचा एक प्रतिनिधी घ्यावयास सुरवात केली. काही वर्षांनंतर प्राथमिक शिक्षक प्रशिक्षणाप्रमाणे पूर्वप्राथमिक शिक्षक प्रशिक्षण मंडळाचे काम करण्यासाठीही शासनातर्फे बोर्ड नेमण्यात आले. या बोर्डावर नू० बा० शि० संघाचे प्रतिनिधी अवश्य असत. पुष्कळ वर्षे ताईच प्रतिनिधीचे काम करीत होत्या.

शासकीय बोर्डातर्फे १९४९-५० पासून पूर्वप्राथमिक शिक्षक प्रमाणपत्र परीक्षा सुरू झाली. आता शासनाकडून सर्टिफिकेटे मिळू लागली. या सर्टिफिकेटांच्या आधारे बालमंदिर शिक्षक व प्राथमिक शाळेतील खालच्या दोन वर्गांचे शिक्षक, अशी पात्रता मान्य झाली. मुंबई-पुणे येथे हे अभ्यासक्रम चालू झाले. ५१ सालापासून बोर्डीलाही हा अभ्यासक्रम चालू झाला. शासकीय मान्यतेमुळे हा अभ्यासक्रम जास्त उपयुक्त ठरला. नू० बा० शि० संघातर्फे होणाऱ्या परीक्षांचे काम संपले. तरीही गुजरात व मध्यप्रदेश येथे अजून शासनातर्फे परीक्षा सुरू झाल्या नव्हत्या. म्हणून भावनगर, अहमदाबाद, बडोदे, इंदोर येथे नू० बा० शि० संघातर्फे 'बालघर' व 'क्रीडांगण' अभ्यासक्रम जवळजवळ १९६० पर्यंत चालू होते. पुढे त्या त्या राज्यानेही शासकीय परीक्षा सुरू केल्यामुळे नू० बा० शि० संघाचे हे काम पूर्ण झाले. पूर्वप्राथमिक अध्यापन नियंत्रण समितीचे चिटणीस म्हणून श्री० भास्करराव कर्वे यांनी पुष्कळ वर्षे अत्यंत व्यवस्थितपणे काम केले.

## ग्राम बाल शिक्षा केंद्रापूर्वी

ताईंची मुंबईस शिशुविहार, बालअध्यापन मंदिर, मराठी-गुजराती-हिंदी या तीनही भाषांतील 'शिक्षणपत्रिके'चे संपादन, त्याची ग्राहकसंख्या वाढविणे, बालशिक्षणविषयक विचारांचा प्रचार करणे वगैरे कामे धूमधोकार चालली होती. बालमंदिरे फक्त शहरातच चालू शकतात, फी देऊ शकतील अशा श्रीमंत मंडळींचे हे एक नवीन वेड आहे, असे सर्वसाधारण मत होते.

"बालमंदिरांची खेड्यापाड्यांतून आवश्यकता आहेच. शहरापेक्षाही जास्त आहे. मुले येथून तेथून सर्व सारखी. त्यांत गरीब-श्रीमंत, शहर-खेडे असा फरक करण्याचे



कारण नाही." असे ताई पत्रिकेतून लेखांद्वारा किंवा व्याख्याने वा गप्पागोष्टींमधून जेथे जेथे संधी मिळेल तेथे तेथे प्रतिपादीत असत. बालशिक्षण खेड्यातून स्वस्तामध्ये करता येईल, अशी त्यांची खात्री होती. "तुम्ही करून दाखवा" अशी आव्हाने त्यांना मिळत होती. श्री० गिजूभाईसुद्धा "खेड्यामध्ये आपले काम सुरू झाले पाहिजे" असे म्हणत असत. भावनगरला हरिजन वस्तीमध्ये एक लहानसे बालमंदिर त्यांनी सुरू केले होते. या सर्वांचा परिपाक म्हणजे १९४३ मध्ये नू० बा० शि० संघाने खेड्यांतून बालशिक्षणाचे प्रत्यक्ष काम करण्याचे ठरविले. त्यासाठी प्रायोगिक स्वरूपात तीन केंद्रे प्रथम सुरू केली :

१. आमला (काठेवाड)—श्री० नानाभाई मट्ट यांच्या देखरेखीखाली.

२. वेडछी (गुजरात)—श्री० जुगतरामभाई दवे यांच्या देखरेखीखाली.

३. मुंबई (महाराष्ट्र)—श्रीमती ताराताई मोडक यांच्या देखरेखीखाली.

या प्रयोगांसाठी नू० बा० शि० संघाच्या अध्यक्षा सरलादेवी साराभाई यांनी प्रत्येकी तीन हजार रु० दिले होते.

पहिल्या दोन संस्थांना ४२च्या आंदोलनाच्या अनुषंगाने काही उपसर्ग पोहोचला होता. त्यामुळे तेथे काही दिवस काम थंडावले होते.

## बालमंदिर सुरू झाले

मुंबईस ताईंनी भंगीकॉलनीमध्ये गुजराती समाजाने चालविलेल्या सेवामंदिरात बालमंदिराचे प्रायोगिक काम सुरू केले. या कामासाठी श्री० भगवतीप्रसाद शेलत या सेवानिष्ठ, जिद्दी आणि हौशी कार्यकर्त्यांची नेमणूक झाली. शेलतभाईंनी जुगतरामभाई दवेंच्याकडून निःस्वार्थी सेवेचा धडा घेतला होता. ताईंचे मार्गदर्शन व स्वतःची कल्पकता या दोन्हींच्या जोरावर त्यांनी खेडेगावातील बालशाळेच्या कार्यपद्धतीची मूळ चौकट तयार केली.

सेवामंदिरात महिलांचे उद्योगवर्ग, प्रौढ शिक्षणवर्ग वगैरे काम चालत होते. त्या जोडीला आता बालमंदिर सुरू झाले. आई-वडील सकाळीच कामाला जात असत. मुले घरीच असायची. कुठेतरी खेळत असायची. वेणी, आंघोळ, नीटनेटके कपडे वगैरे कशाचाच पत्ता नसायचा. तसे म्हटले तर हे पालक अगदीच गरीब होते असे नाही. पण त्यांना वेळ कमी व बालसंगोपन कसे केले पाहिजे याची जाणीव नाही. त्यामुळे मुलांची अशी अनास्था होते. म्हणून बालमंदिराच्या कामांत 'मुलांना स्वच्छ करून घेणे' या गोष्टीचाही समावेश करण्यात आला. सकाळी ९ वाजता काम सुरू होई. मुलांच्या आंघोळी, कपडे धुणे, वेणी-फणी आदी कामे होत. त्यासाठी जरूर ती सर्व व्यवस्था भगिनी समाजाने करून दिली.

या समाजाच्या चिटणीस श्रीमती सरोजबेन योध या नू० बा० शि० संघाच्याही

कोषाध्यक्ष होत्या. सरोजबेन फारच भाविक आणि जिद्दीच्या कार्यकर्त्या आहेत. पुढेही नू० बा० शि० संघाच्या आणि ग्रा० बा० शि० केंद्राच्या कामास त्यांनी पुष्कळ आर्थिक मदत मिळवून दिली आहे.

## बालवाडीची नांदी

व्यक्तिगत स्वच्छता, आवार-स्वच्छता वगैरे कामे झाल्यावर मग प्रार्थना, धून व काही गाणी व्हायची. त्यानंतर फराळाची तयारी. भाजी, कोशिंबीर अशा वस्तू मुलांच्या मदतीने त्यांच्या समोरच तयार व्हायच्या. मग मुले घरी जाऊन भात, भाकरी, पोळी वगैरे आणायची. शिक्षकांसह सगळ्यांचे एकत्र जेवण व्हायचे. मग थोडी झोप. त्यानंतर दुपारचा कार्यक्रम. यामध्ये मातीकाम, चित्रकाम, शिवणकाम अशा हस्तव्यवसायावर पुष्कळ भर होता. गाणी, गोष्टी, नाटके वगैरे होत असत. मुक्त व्यवसायासारखे काही खेळ होते, पण त्यावर विशेष भर नव्हता. या मुलांचे मातीकाम खूपच प्रगत झाले होते. एकदा एका मुलाने तळ्याचा आकार केला. त्यात दोन बाहुल्या निजवल्या. एक मोठी, एक लहान. "हे काय केलेस?" असे विचारले तेव्हा त्याने सांगितले की, "तळ्यात पोहायला उतरले आहेत—एक शेल्तभाई आणि एक मुलगा!" मातीचे मुखवटे करणे, पावले करणे वगैरे कृतीही ही मुले करीत असत. कंतानच्या फळ्यावर ओल्या मातीच्या रंगाने चित्रकामही सुरू केले होते.

पुढे ग्राम बाल शिक्षा केंद्रामध्ये खेडेगावच्या बालवाडीसाठी बोर्डीत आणि कोसबाडला जे विविध प्रयोग झाले, त्याची सेवामंदिरातील ही कामे म्हणजे नांदीच होय.

## बोर्डीचीच निवड का केली?

ताराताईंनी बोर्डीचीच निवड का केली हे थोडक्यात सांगणे आवश्यक वाटते. मुंबईपासून जवळचे एखादे खेडे ग्राम बाल शिक्षा केंद्रासाठी शोधण्याचे काम सुरू झाले होते. पालघरजवळील मासवण येथे काम सुरू करण्याचा प्रथम विचार होता, पण तेथे काही अडचण आल्यामुळे दुसरे खेडे शोधण्याचे काम सुरू झाले. त्याच वेळी बोर्डी येथील समाजसेवक आणि महिला-हितचिंतक कै० श्री० मुकुंदराव सावे यांनी बोर्डीला महिलांच्या एका साप्ताहिक अभ्यासवर्गामध्ये व्याख्यान देण्यासाठी ताईंना बोलावले होते. त्या वेळी ताईंनी आपला खेडेगावात जाण्याचा विचार तेथील मंडळींना बोलून दाखविला होता. तेव्हा बोर्डीचे पूजनीय आचार्य श्री० भिसे व बाकीच्या मंडळींनी बोर्डीसच येण्याचा ताईंना आग्रह केला.



नू० बा० शि० संघाच्या बैठकीत बोर्डी गावी काम सुरू करण्याची ताईंनी संमती घेतली. पहिल्या वर्षीच्या खर्चासाठी श्रीमती सरलादेवींनी साडेसात हजार रुपये दान दिले. आणि मग सप्टेंबर १९४५मध्ये यापूर्वी सांगितल्याप्रमाणे मी बोर्डीला रवाना झाले.

मला मुंबईपासून सुरतकडची ही बंदरपट्टी अगदी नवीन होती. सानेगुरुजींचे बंधू कै० श्री० अप्पा साने यांच्या घरी मी राहत असे व शारदाश्रमच्या बोर्डिंगमध्ये जेवत असे. येथेच मला सानेगुरुजींचाही अल्प सहवास लाभला.

श्री० गोपाळराव पाटील हे बोर्डीमधील पुरोगामी विचारांचे निष्ठावंत व वजनदार नागरिक होते. थोडे वयस्करच होते. बोर्डी गावात जाऊन तेथील पूर्वप्राथमिक वयाच्या बालकांची नोंद करणे, ग्रामस्थांशी परिचय करून घेणे वगैरे कामांत मला त्यांची फारच मदत झाली. दिवसातून दोन वेळा आम्ही समुद्राच्या रेतीपटावरून गावात जात-येत असू.

"अनसूया, चल!" अशी त्यांची वडिलांसारखी प्रेमळ हाक अजूनही अनेकदा माझ्या कानांत घुमत असते.

राहुरीच्या कृषि विद्यापीठाचे माजी कुलगुरू श्री० ह० गो० पाटील हे गोपाळरावांचे चिरंजीव आहेत. त्यांच्याप्रमाणेच त्यांचे मेहुणे श्री० मदनराव ऊर्फ नाना राऊत, जावई श्री० आत्मारामपंत सावे, श्री० मुकुंदराव सावे, डॉ० चुरी, श्री० शामराव पाटील अशा अनेक मंडळींची मला फार मोलाची मदत झाली. संस्थेला व्यवस्थेच्या कामात या मंडळींनी कोणतीही अडचण येऊ दिली नाही.

## अनुकूल मनोभूमी

आम्हांला जी जागा मिळाली होती ती समुद्रकिनाऱ्यावर होती. प्रशस्त, संस्थेला हवी अशीच ती होती. त्या वेळी आम्ही दीडशे रुपये महिना भाडे भरत होतो. त्यात एक बंगला, एक चार खोल्यांची दुमजली चाळ, एक भातगिरणीसाठी तयार केलेला प्रशस्त हॉल, विहीर, संडास वगैरे सर्व काही आले. इमारत बरेच दिवसांत कोणाच्या वापरात नव्हती, त्यामुळे डागडुजी व आवारसफाई यांची जरुरी होती. ते काम एकीकडे चालू होते आणि बालकनोंदणीचे कामही चालू होते.

आमची इमारत हरिजनवाड्यास लागून होती. समोरच्या बाजूस दोन-तीन मुस्लिम बिऱ्हाडे होती. नंतर भंडारी, कुंभार अशी मंडळी होती. ही सर्व मंडळी गुजरातीभाषी होती. मराठीभाषी त्यापलिकडे होती. गाव तसे लहानच होते. दोन-अडीच हजाराची वस्ती होती. साधारणतः गुजराती-मराठी भाषिक आणि आर्थिक दृष्ट्या गरिबापासून श्रीमंतापर्यंत मिश्र असा हा समाज होता.

हे गाव आचार्य भिसे गुरुजी आणि चित्रे गुरुजी यांच्यासारख्यांच्या प्रयत्नांमुळे

सुसंस्कृत झालेले, कोणतीही नवी चांगली गोष्ट घेण्यास उत्सुक असलेले असे होते. आमच्या कामासाठी ही मोठी अनुकूल मनोभूमी होती.

माझे बालक-नोंदणीचे काम सुरू झाले ते प्रथम गुजराती भाषिकांमध्येच. आमच्या जागेच्या अवतीभवती त्यांचीच वस्ती होती. पण मला त्यांची भाषा कळत नव्हती ही मोठीच अडचण होती. शिवाय, "मुलांची नावे कशाला हवीत? मुलांना पकडून पुलाच्या बांधकामामध्ये बळी देणार आहेत काय? ही मुंबई बाजूची मंडळी येथे कशासाठी येत आहेत?" अशा तऱ्हेच्या शंकाकुशंकांनी पालकांचे मन ग्रासलेले होते.

मी ताईंना लिहिले, "येथे सगळे गुजराती बोलतात. मला गुजराती येत नाही. तरी एखादे पूर्ण मराठी भाषिक गाव मला द्यावे." ताईंनी कळविले, "दोन महिन्यांत तुम्ही गुजराती शिकाल. तेथेच काम करायचे!"

मग काय? कंबर बांधावीच लागली! हरिजन वाड्यातील मध्यम वयाची एक माणकूबाई व एक नवतरुणी काकूबाई या दोन मैत्रिणी मिळविल्या. त्यांच्या मध्यस्थीने व दुभाषीपणाने माझे बालक-नोंदणीचे काम सुलभ झाले.

दिवाळीनंतर म्हणजे नोव्हेंबर १९४५ च्या सुरुवातीस आमच्या त्या भाड्याच्या घरात प्रत्यक्ष कामास सुरुवात केली. त्यासाठी भावनगरहून श्री० रामनारायण पाठक हे व्यवस्थापक म्हणून आले. रामभाई हे कट्टर गांधीवादी, श्रमप्रतिष्ठा मानणारे, ताराताईंचे शिष्य! शिवाय, रसाळ वाणीने गोष्टीही सांगणारे, सुबोध भाषेत कथा-कादंबऱ्या लिहिणारे असे असल्यामुळे ताईंच्या या नव्या प्रयोगासाठी अगदी योग्य असे होते. काठेवाडहून या कामासाठी मुद्दाम यायचे म्हणजे त्यांना बरेच त्रासाचे होते. तेथे त्यांची लहानशी शेती होती. आणि पत्नी नर्मदाबेन यांना तर तेथून हलायचे नव्हते. तरीही पत्नी व तीन छोट्या मुलींसह ते बोर्डीस आले होते. 'ग्राम बाल शिक्षा केंद्रा'चे व्यवस्थापन आणि शिक्षणपत्रिकांचे संपादन अशी दोन कामे ते सांभाळीत होते. शिक्षक म्हणून भगवतीप्रसाद शेलत यांची योजना झाली होती व मी त्यांची मदतनीस होते.

आम्ही तीनही कार्यकर्ते आपल्या बिऱ्हाडबाजल्यासह बोर्डीस दाखल झालो. पहिले दोघे कुटुंबासह आणि मी एकटीच. ताई सुरुवातीस काही दिवस बोर्डीला राहिल्या. नंतर पुढे आठवड्यातून तीन दिवस मुंबई व तीन दिवस बोर्डी असा त्यांचा कार्यक्रम सुरू झाला.

नाशिक जिल्ह्यात तीन वर्षे लोकलबोर्डामध्ये आणि पुण्यात तेरा वर्षे हुजूरपागेमध्ये मी प्राथमिक शिक्षिकेचे काम केले होते. चांगली शिक्षिका म्हणून मी ओळखली जात होते. पण हे बालमंदिराचे तंत्र मला अगदीच नवीन होते. त्यामुळे शेलत भाईंच्या मी मागे मागे असायची.



## श्री० शेलतभाई

शेलतभाई हे जातिवंत शिक्षक होते. पहिल्याच दिवशी हातात झांजा घेऊन "रघुपति राघव राजाराम" असे भजन करीत आम्ही जवळच्या हरिजनवाड्यात शिरलो. लहान-मोठी मुले आमच्या दिंडीत सामील झाली. मग ही दिंडी गावात शिरली. तेथील लहानमोठी मुलेही या दिंडीत सामील झाली. सुमारे १५० मुलांची ही दिंडी बालमंदिराच्या आवारात विसर्जित झाली. मग विहिरीचे पाणी काढून सर्वांनी हातपाय धुतले-पुसले. आत जाऊन शांतपणे बसलो. मुलांना हे सारे नवीन होते. त्यांची उत्सुकता शिगेला पोहोचली होती. मग "रघुपति राघव राजाराम" धून जोरात झाली. शेलतभाईंनी काही गुजराती बालगीते, बडबडगीते सांगितली. गूळ-खोबरे वाटून कामाला सुरुवात झाली. पुढे यापूर्वी उल्लेख केल्याप्रमाणे २४ डिसेंबर १९४५ रोजी त्या वेळचे मुंबईचे मुख्यमंत्री श्री० बाळासाहेब खेर यांच्या हस्ते उद्घाटन-समारंभ होऊन कामाला रीतसर सुरुवात झाली.

शेलतभाई सकाळीच उठून कामाला लागत असत. आवारात खूप गवत वाढले होते. चहा घेण्याच्या आधीच त्यांचे गवत खुरपणे सुरू होई. भोवतालची मुले येत. त्यांच्यासाठी खुरप्या तयार होत्या. मग मी पण या कामात सामील होत असे. शिक्षकांनी कमरेवर हात ठेवून मुकादमासारखे हुकूम सोडायचे आणि त्यांच्या देखरेखीखाली विद्यार्थ्यांनी काम करायचे, हे मी आतापर्यंत पाहिले होते. पण शिक्षकांनी स्वतः कामास लागायचे, त्यामुळे मुलांनी आपणहून कामास लागायचे, हा धडा मला शेलतभाईंकडून मिळाला.

हळूहळू मातीकाम, रंगकाम, जीवनव्यवहार विभाग वगैरे विभाग सुरू झाले. दिवाळीची सुट्टी अजून चालू होती. तोपर्यंत मुलांचा लोंढाच्या लोंढा येत असे. पण प्राथमिक शाळा सुरू झाल्या तशी मोठी मुले आपोआप कमी झाली. बालमंदिराच्या वयाचीच मुले येऊ लागली. त्यांत हरिजनांची मुले पुष्कळ होती.

बालवाडीला लागूनच हरिजनांची वस्ती असल्यामुळे हरिजनांची मुले बालवाडीत जास्त संख्येने येणे स्वाभाविक होते. आमच्या या नव्या शाळेत एकत्र बसून फराळ करण्याची व्यवस्था होती. त्यामुळे सवर्णांना आपली मुले पाठविण्यास संकोच वाटत होता. सगळ्यांनी एकत्र बसून खायचे, पाणी प्यायचे म्हणजे शिवाशीवच झाली! कोणी उघड बोलत नव्हते, पण हळूहळू सवर्णांची मुले कमी होऊ लागली. एक दिवस तर भंग्यांची मुले आली म्हणून इतर हरिजनांची मुलेही घरी निघून गेली! बालवाडीत फक्त तीनच मुले उरली!!

शेलतभाईंनी या गोष्टीचा फारच धसका घेतला. आणि एक दिवस एका बकरीला हाकलण्यासाठी तिच्या मागे ते धावले. त्यामुळे छाती दुखायला लागली. ते दुखणे जीवघेणे ठरले! २७ एप्रिल १९४६ रोजी शेलतभाई इहलोक सोडून गेले. वास्तविक

ते आजारी पडल्यावर लगेचच जानेवारी महिन्यात त्यांना घरी पाठविण्यात आले होते. पुष्कळ उपचार झाले. पण यश आले नाही. बेशुद्धीतही "ताराबेन" व "बोर्डीची संस्था" यांचाच जप चालला होता.

बालशिक्षणाच्या नव्या क्षेत्रात शेलतभाईंच्यापासून मला खूपच शिकायला मिळाले होते. दुर्दैवाने त्यांचा सहवास मला तीनचार महिनेच मिळाला. अवघ्या ३० वर्षे वयातच त्यांचे अत्यंत अल्पशा आजाराने निधन झाले.

ताईंना आणि मला हा फार मोठा धक्का होता.

## ताईंचा मंत्र

स्पृश्यास्पृश्यतेचा प्रश्न बालवाडीच्या संदर्भात आमच्यापुढे अनाहूतपणे आलेला होता. तो सोडविण्याचे अनेक प्रकार झाले. मी घरोघरी जाऊन अर्धा-अर्धा तास समजूत घालीत असे. "आमच्या मुलांच्यावर त्यांच्या मुलांच्या संस्कृतीची छाप पडेल." असे सवर्ण सुशिक्षितांचे म्हणणे होते.

"तुम्ही हरिजनांचे काम करा; त्यांना पुढे आणा. आमची सर्व मदत होईल. पण आमच्या मुलांना बालवाडीत पाठविण्याचा आग्रह करू नका!" असे एका पालकाने मला स्पष्टपणे सांगितले. ते पुढे असेही म्हणाले, "आमचे सगळ्यांचे हेच म्हणणे आहे, पण कोणी उघडपणे तुम्हांला हे सांगत नाही."

मी त्यांना विचारले, "बालवाडीत तुमची मुले जास्त असतील व हरिजनांची कमी असतील, तेव्हा तुमच्या मुलांचे संस्कार त्या मुलांच्यावर पडून ती सुधारतील, असे तुम्हांला का वाटू नये?"

या प्रश्नाला त्यांच्याजवळ उत्तर नव्हते.

हरिजनांच्या बरोबर सवर्णमंडळी आपली मुले पाठविण्यास तयार नव्हती म्हणून एकदा चिडून मी ताईंना म्हटले, "ताई, आपण गाव बदलू या!"

त्यावर ताईंनी शांतपणे सांगितले, "मुळीच नाही. मळलेल्या पायवाटेने कुणीही जाईल. आपल्याला नवी पायवाट पाडायची आहे. तेथे काटेकुटे, खाचखळगे, झाडे-झुडपे असणारच! विषारी जनावरे आणि हिंस्र पशूही असणार. विचाराने आणि निर्धाराने आपण पावले टाकीत गेलो तर हीच जागा नंदनवन होईल!"

ताईंचा हा बहुमोल मंत्र मी आजन्म सांभाळून ठेवला आहे.

## ताईंच्या ठायी ऋषींची कठोरता

ताईंनी मला वेळोवेळी अशा प्रकारे समर्थ शिकवण दिलेली आहे. १९४५ ते १९५६ या बारा वर्षांच्या काळात मी बोर्डीत होते. माझ्या सामाजिक कामाचा श्रीगणेशा येथेच झाला. ताईंचा आणि माझा गुरु-शिष्य भाव इथेच फुलारला. हा



भाव जरा आगळाच होता. मुंबईहून बोर्डीला आठवड्यातून तीन दिवस त्या येत. आल्या आल्या त्या झालेल्या कामाचा आढावा घेत. जाताना नवी कामे आणि नवी दिशा दाखवून जात. त्यांनी सांगितलेल्या कामातील काही कामे फारच कठीण असायची. पूर्वीच्या ऋषींनी कठोरपणे करून घ्यावी अशा कठोरपणे त्या माझ्याकडून काही कामे करवून घेत.

ताईंमुळेच मी गुजराती शिकले. मोठमोठ्या कादंबऱ्या, कविता, लघुकथा वगैरे गुजराती वाङ्मयातून वाचून काढल्या. सुरुवातीला हरिजनांपासून गुजराती भाषा शिकल्यामुळे जाणती गुजराती मंडळी "घेडगुजराती भाषा" म्हणून माझ्या भाषेला चिडवीत असत.

ताईंनी मला येईल की नाही याचा विचार न करता माझ्यावरती अनेक कामांच्या जबाबदाऱ्या टाकल्या. माझ्या अनेक कठीण परीक्षा घेतल्या.

बोर्डीला खेडेगावात बालवाडी कशी चालवावी, हा प्रयोग करण्यासाठीच आम्ही आलो होतो. पण 'कस्तुरबा ट्रस्ट'ची ग्रामसेविका विद्यालये राज्याराज्यातून निघत होती. त्यांना त्वरित बालवाडी शिक्षिका पाहिजे होत्या. म्हणून ताबडतोब बालवाडीचा प्रशिक्षणवर्ग सुरू करण्याचा त्यांनी आग्रह धरला. ताईंनी नाइलाजाने होकार दिला. आणि मार्च १९४६ मध्ये पहिला बालवाडी प्रशिक्षणवर्ग सुरू झाला. हा साडेतीन महिन्यांचाच होता.

या प्रशिक्षणवर्गास ताईंनी मान्यता दिली ती मुख्यतः शेलतभाईंच्या आधारावर. पण ते अचानक आजारी पडून स्वर्गवासी झाले! आणि एके दिवशी तार आली—"बिहारहून अमुक गाडीने सात भगिनी प्रशिक्षणासाठी निघाल्या आहेत."

झाले! येथे तर काहीच तयारी नव्हती. मग त्या वेळचे व्यवस्थापक श्री० रामभाई पाठक यांनी मला बोलाविले आणि सांगितले, "उद्यापासून बालवाडीबरोबरच गृहमातेचेही काम तुम्हांला करावयाचे आहे."

मी पुरतीच हबकून गेले. घरीसुद्धा मी चुलीपासचे काम अथवा इतर घरगुती सामान आणणे, ठेवणे, पुरवणे वगैरे कामे केलेली नव्हती. 'गृहमाता' म्हणून मला कसलाच अनुभव नव्हता. पण ताई आणि रामभाई यांनी मला सांगितले, "तुम्हांला सगळे येते! आता नाही म्हणू नका."

झाले! दुसऱ्या दिवसापासून बालवाडी शिक्षिका व गृहमाता अशी दोन मुख्य कामे मी करू लागले.

वसतिगृहामध्ये अखिल भारतामधून ३० विद्यार्थिनी व गुजरातचे स्वखर्चाने आलेले बंधुभगिनी मिळून २० जण असे एकूण ५० प्रशिक्षणार्थी होते.

### "—तर आम्ही मरून जाऊ!"

सकाळची प्रार्थना, सफाई, नाश्ता (चहा नाही!), पाळीपाळीने स्वयंपाक करणे, वाढणे, आवराआवर, पुन्हा दुपारी नाश्ता, संध्याकाळी भोजन...या चक्रात 'सकाळ झाली; आता दुपारी काय करायचे?', 'दुपार झाली; आता संध्याकाळी काय करायचे?' अशा विवंचनेत माझा दिवस जायचा! रोज रात्री ११-११॥ला मी झोपत असे. एकदा पुण्याच्या आमच्या पार्वतीबाई आठवले आल्या होत्या. त्यांनी बसल्या बसल्या नोंद घेतली "तुमचे काम १७ तास चालते" म्हणून!

कामाचे मला काही वाटत नव्हते; पण जबाबदारी जास्त होती. देशाच्या सर्व भागांतील मंडळी आलेली होती. त्यांच्या आवडीनिवडी निरनिराळ्या! कोणी म्हणायचे, "वरणात गूळ घातला तर आम्ही मरून जाऊ!" तर कोणी म्हणायचे, "वरणात गूळ न घातला तर आम्ही मरून जाऊ!"

दुधात गूळ घातल्याने विष होते असा कोठे समज होता, तर कढीत गूळ घालणे कोणाच्या दृष्टीने निषिद्ध होते. त्यामुळे माझी अगदी तारांबळ उडायची. पुन्हा भाषेची गडबड होतीच.

### कडक!

पण सेवाग्रामच्या श्रीमती आशादेवी आर्यनायकम् यांनी आमच्या संस्थेस भेट दिली. त्या वेळी त्यांनी वसतिगृहाचे सेवामंडळ करणे, त्यांना काम वाटून देणे आणि त्यांच्या मदतीने काम पाहणे याची शिकवण मला दिली. त्यामुळे मला हलके वाटले व कामाची बडी इतकी छान बसली की पुढे जीवनशिक्षण मंदिराच्या प्राचार्या व प्रसिद्ध शिक्षणमंत्री श्रीमती सुलभाताई पाणंदीकर यांनी या शिस्तीबद्दल माझी पाट थोपटली.

अखिल भारतामधून आलेल्या या विद्यार्थिनींकडूनही खूप शिकायला मिळाले. चालीरीती, भगिनींवरील अन्याय, देशाचे दारिद्र्य व इतर प्रश्नांची जवळून ओळख झाली. व्यक्तिगणिक भिन्न स्वभाव. ते हाताळून शिस्त राखणे कठीण होते. प्रसंगी संतापावे लागे, प्रसंगी प्रेमळ व्हावे लागे. पण 'कडक' अशीच माझी प्रतिमा निवासींच्या मनात तयार झाली होती. (अजूनही माझ्याविषयीची हीच प्रतिमा कायम आहे!) १९५९ पर्यंत हे गृहमातेचे काम माझ्याकडे होते.

### गुजरातच्या बालमंदिरांचे निरीक्षण

आणखी एक अशीच अवघड कामगिरी ताईंनी माझी योग्यता न पाहता माझ्यावर टाकली. त्या वेळी नू० बा० शि० संघाला जोडलेल्या बालमंदिरांना भेट देऊन मार्गदर्शन करणे हे काम संघाकडे होते. बालमंदिराची गुणवत्ता वाढण्याच्या दृष्टीने पहाणी करणे, शिक्षकांच्या, चालकांच्या आणि पालकांच्या अडचणी समजावून घेणे, शक्य ते उपाय सुचविणे, अशी ही कामे होती. गुजरातमधील बालमंदिरांचे निरीक्षण ताईंनी माझ्यावर सोपविले. बालमंदिराचा मूळ स्रोत गुजरातमधून आलेला आहे. तेथे मूलभूत पुष्कळ गोष्टी चालत होत्या. त्या मला अनायसे पाहायला मिळतील हा ताईंचा एक दृष्टिकोण असावा.



सुरत, बडोदा, अहमदाबाद, सुरेंद्रनगर, साबरमती, भावनगर, जामनगर, मोरवी, मांगरोळ, नडियाद, द्वारका अशा अनेक ठिकाणी या कामानिमित्त माझा प्रवास झाला. अनेकांच्या ओळखी झाल्या. माझ्या मोडक्यातोडक्या गुजरातीमध्ये मी पालकसभाही घेतल्या. त्या बऱ्याच लोकप्रिय झाल्या होत्या. कोठे कोठे आमच्या विद्यार्थिनी व विद्यार्थी भेटत. ते अत्यंत प्रेमाने माझे स्वागत करीत. "तुमच्या कडकपणाच्या मागील शुद्ध हेतू व माया आता आमच्या लक्षात येते," असे ते म्हणत असत.

सौराष्ट्रातील शिक्षणप्रेमी जनतेने आणि संस्थानिकांनी बालशिक्षणाची नवी कल्पना उचलून धरली होती. त्यामुळे बालमंदिराची कल्पना तेथे चांगलीच फोफावली. बालमंदिरासाठी सुंदर सुंदर इमारती व साधने मला पाहावयास मिळाली. तेथे सर्व ठिकाणी बालमंदिराला स्वतंत्र गायनशिक्षक आढळतो.

श्री० गिजूभाईंच्या नंतर भावनगर अध्यापन मंदिराचे काम थोडे विस्कळीत झाले होते. गिजूभाईंचे चिरंजीव श्री० नरेंद्र ऊर्फ बच्चुभाई बधेका शांतिनिकेतनमधून शिकून आले होते. ते प्रसन्न, अभ्यासू, शांत आणि गोड स्वभावाचे होते. त्यांनी आपल्या वडिलांचे काम अंगावर घेतले. त्यांच्या पत्नी सौ० विमलाबेन बधेका याही कर्तृत्ववान भगिनी आहेत. या उभयतांनी कामास सुरुवात केली त्या वेळी ताईंना घडी बसवून देण्यास बोलावले. ताई तेथील नियामकही होत्या. बोर्डीला सुट्टी होती म्हणून ताईंनी मलाही बरोबर नेले. नुसते नेलेच नाही तर तेथे पक्के कामाला लावले. अध्यापन मंदिराचे वेळापत्रक बसविणे, हस्तव्यवसाय दाखवून देणे, साधनांची ओळख करून देणे व काही नवीन साधने तयार करून घेणे, वनस्पतिविषयक प्रदर्शनाची मांडणी करणे, आदी कामे माझ्याकडून करवून घेतली. रास, गर्बा, लोकगीते वगैरे गोष्टी मला तेथे ऐकायला आणि पाहायला मिळाल्या. शिशुविहार नावाच्या आदर्श क्रीडांगणाची माहिती मिळाली. ताईंच्या बरोबर असल्यामुळे सगळीकडे मी मानापानाने जात होते.

या मुक्कामात श्री० बच्चुभाईंशी फार जवळून ओळख झाली. ते माझ्याशी धाकट्या भावाप्रमाणे वागत असत. देवाने त्यांनाही अल्पवयातच—म्हणजे अवघ्या एकावन्नाव्या वर्षी—आपल्याकडे नेले. श्रीमती विमलाबेन समर्थपणे त्यांचे काम पुढे चालवीत आहेत.

## सौराष्ट्राची सफर

गुजरातच्या बाजूची आणखी एक गोड आठवण माझ्या मनात जागी झाली आहे. सौराष्ट्राला पूर्वी काठेवाड म्हणत असत. काठेवाडात अनेक संस्थाने होती. ती पुढे एकत्र होऊन त्याचे 'सौराष्ट्र' बनले. पूर्वी संस्थानिकांनी आपापल्या राजधानीच्या गावी बालमंदिरे काढली होती आणि ती सरकारी खर्चाने चालविली जात होती. आता सौराष्ट्र शासनास ते काम परवडणारे नव्हते. म्हणून, "नूतन बाल शिक्षण संघाने हे काम घ्यावे, शासन काही प्रमाणात अनुदान देईल," अशी एक सूचना सौराष्ट्र शासनामार्फत ताईंकडे आली होती.

सौराष्ट्र शासनाच्या सूचनेचा विचार करण्यापूर्वी ही बालमंदिरे कोणत्या स्थितीत आहेत त्याची पाहणी करण्याचे ठरले. ते काम मी व संघाच्या सहचिटणीस श्रीमती यशस्वतीबेन भट यांनी करावे असे ठरले. श्रीमती यशुबेन या गिजूभाईंच्या विद्यार्थिनी होत्या. अहमदाबादला त्या दोन बालमंदिरे उत्तम प्रकारे चालवीत होत्या. त्या आणि मी सरकारी पाहुणे म्हणून राजकोटला गेलो. त्या वेळचे सौराष्ट्राचे शिक्षणमंत्री, गिजूभाईंचे एक मित्र व पुढे संघाचे अनेक वर्षे कार्याध्यक्ष आणि आताचे ट्रस्टी श्री० जादवजीभाई मोदी यांच्या घरीच आमचा मुक्काम होता. उपशिक्षणसचिव श्री० त्रिवेदी यांच्याबरोबर सरकारी मोटारीतून हिंडून आम्ही दहा बालमंदिरे पाहिली. राजकोट ते पोरबंदरपर्यंत मोटारीने केलेला हा प्रवास चिरस्मरणीय झाला. शिक्षणाधिकारी बरोबर असल्यामुळे बालमंदिरांच्या बरोबरच प्राथमिक शाळाही पाहावयास मिळाल्या. पोरबंदर येथील महात्मा गांधीजींचे स्मारक पाहून मन भरून आले. श्री० त्रिवेदी चांगले विद्वान, बहुश्रुत आणि संस्कारी गृहस्थ होते. त्यामुळे बालमंदिराबरोबरच अनेक विषयांवर आमच्या गोष्टी झाल्या. जुनागडला वरपर्यंत जाऊन आलो. मधूनमधून वनभोजनही झाले.

ही बालमंदिरे संघाने चालवायला घेतली नाहीत, कारण अनुदान अगदीच तुटपुंजे मिळणार होते. दूर राहून योग्य प्रकारे देखरेखही करता आली नसती. त्यामुळे तो प्रश्न तेथेच संपला. परंतु आम्हांला सौराष्ट्राची चांगली सहल घडली.

याच प्रवासात श्रीमती यशूबेन आणि मी अगदी जवळ आलो. दुर्दैव हे की, अल्पवयातच त्याही वारल्या. अनेक चांगली चांगली, माझी अशी झालेली माणसे काळाने हिरावून नेली. त्यांच्या आठवणी माझ्याजवळ राहिल्यात. अशा आठवणी मी किती वर्षे सांभाळणार आहे कोणास ठाऊक!

## पहिली दीक्षा

ताईंनी मला बेधडक कामाला लावल्याची आणखी एक आठवण आता माझ्या मनात जागी झाली आहे.



१९५२ साली संघाला २५ वर्षे पूर्ण होत होती. संघाचा रौप्यमहोत्सव करायचा तो एके ठिकाणी न करता बालशिक्षणाचा प्रचार होईल असा कार्यक्रम करावा असे ठरले. त्यासाठी बालशिक्षण नगरे ठिकठिकाणी भरविणे, व्याख्याने देणे व फंड गोळा करणे ही कामे करावयाची होती.

गुजरातमध्ये श्री० शेष नामले यांनी अहमदाबादेत सहा बालशिक्षण नगरे भरविली. वापी (बडोदे) येथे श्री० जयंतभाई शुक्ल यांनी हे काम केले.

महाराष्ट्राचे काम माझ्याकडे आले.

तीन मोठाल्या ट्रंका भरून साधने, फळे व इतर लाकडी सामान असे बरेचसे साहित्य घेऊन महाराष्ट्रातील बारा गावे मी हिंडले. बरोबर फक्त एक १५ वर्षे वयाचा शिपाई होता. सुरुवात नंदुरबारला झाली. तेथे माझ्याबरोबर आमच्या विद्यार्थिनी कु० सुमती बेंद्रे व तारा देशमुख या होत्या. गावातली मुले गोळा करून बालवाडी चालवून दाखविणे, प्रदर्शन मांडणे, व्याख्यान देणे वगैरे सगळी कामे झाली. गावातल्या मंडळींनी सहकार्य चांगले दिले. पण पुढे फंड गोळा करण्याचे काम होते ते कठीण ठरले. तेथील डॉ० भट यांच्या घरी माझा १५ दिवस मुक्काम होता. फंड गोळा करण्याच्या पद्धती मला माहीत नव्हत्या. भटांच्या मार्गदर्शनाने होईल तसे करीत होतो. "५०० रु० झाल्याशिवाय नंदुरबारहून हलायचे नाही" असा आदेश होता. शेवटी अक्षरशः पानवाले व किरकोळ दुकानवाले यांच्याकडून मी चार-आठ आणे पण गोळा केले. ५०० रु० झाले तेव्हा नंदुरबार सोडले! तळोदे, धुळे, जळगाव, पाचोरा, जव्हार, भिवंडी, वाडा, डहाणू, चाळीसगाव, कोल्हापूर, निपाणी वगैरे गावांतून सामानासह हिंडले. भिवंडीहून ११०० रु० मिळाले. बाकी सर्व ठिकाणांहून थोडे थोडे आणले. पण फंड गोळा करण्याची माझी पहिलीच दीक्षा होती.

"वाटेल ते काम सांगा, पण पैसे गोळा करण्याचे काम सांगू नका!" असे मी ताईंना याच संदर्भात म्हणायची. आणि "सरदारीणबाई" म्हणून ताई मला चिडवायच्या आणि फंड गोळा करण्याचे कामही माझ्याकडून करवून घ्यायच्या, याचा उल्लेख प्रारंभी केला आहेच! अनेक प्रकारे अवघड अवघड कामे करावयास मला सांगून ताईंनी जाणीवपूर्वक मला घडविले. आईची ममताही मला दिली.

बोर्डीला मी धडाकून काम करीत होते, पण पूर्वप्राथमिक शिक्षकाचे सर्टिफिकेट माझ्याजवळ नव्हते. म्हणून १९५० साली मुंबईस शिशुविहारला एक वर्ष प्रशिक्षणासाठी मला पाठविले. श्री० नामले भाऊंच्या हाताखाली या वर्षात मी पूर्वप्राथमिक शिक्षणाचे तंत्र व मंत्र माझ्या कुवतीप्रमाणे जाणून घेतले.

वयाच्या ५१ व्या वर्षी डोळ्यात मोतीबिंदू झाले असताना बी० ए०च्या परीक्षेला ताईंमुळेच मी कशी बसले आणि उत्तीर्ण झाले हे प्रारंभीच सांगितले आहे.

### लेखन-संपादनाचा ताईंनी लावलेला छंद

लेखनाच्या बाबतीतही ताईंनी मला खूप घडविले आहे. बोर्डीला ताई गुजराती, मराठी, हिंदी या तीनही भाषांतील 'शिक्षणपत्रिका' चालवीत असत. पुरेसे लेख मिळत नव्हते. त्या स्वतःच खूप लिहीत असत. त्यांचे ते लिहिणे बालशिक्षण क्षेत्रातील मंडळींना मार्गदर्शकच होते. पण तीनही भाषांत लिहिणे कठीण, म्हणून त्यांनी एका गुजराती लेखाचे मराठी भाषांतर मला करायला सांगितले. ते त्यांना आवडले. आणि मग त्या गुजरातीतच लिहू लागल्या. सगळे मराठी भाषांतर माझ्याकडून करवून घ्यायच्या. त्यांच्या नादाने लहान लहान बडबडगीते, कविता, धडे लिहिण्याचाही मला नाद लागला. आणि 'शिक्षणपत्रिका' माझी अत्यंत लाडकी—काय म्हणू?—मुलगी ठरली! कारण पुढे श्री० नामले संपादक झाले तरीही माझा शिक्षणपत्रिकेत बराच भाग असायचा. आता १९७० पासून संपादिका म्हणूनच मी पत्रिकेचे काम करीत आहे. हे काम मला कधीच लादलेले असे वाटले नाही. मी ते आवडीने केले आणि करते आहे. ताईंनी भाषांतराचे काम देऊन गोडी लावल्यामुळेच हा छंद मला लागला.

### ताईंनी माझ्या अंतःचक्षूंना दृष्टी दिली.

ताई आणि मी! किती लिहू? १९४५ ते १९७३ पर्यंत आम्ही एकत्र काम केले. लिहिले, वाचले, चर्चा केली. आर्थिक आणि इतर समस्या एकमेकींशी बोलून दूर केल्या. भार हलके केले आणि भांडलोसुद्धा! अत्यंत प्रेमळ आई, कडक गुरुजी आणि जिवाभावाची सखी, अशा अनेक नात्यांनी त्यांनी मला सांभाळले. वाढवले. मोठे केले.

माझ्या मोतीबिंदूंच्या अंधत्वातून नेत्रविशारद डॉ० चिटणिसांच्या द्वारे माझ्या डोळ्यांना ताईंमुळेच दृष्टी मिळाली.

पण माझ्या अंतःचक्षूंना दृष्टी देण्याचे नेत्रविशारदाचे काम माझ्या पूजनीय ताराताईंनीच मोठ्या कौशल्याने केले आहे!

### बालशिक्षणनगर

ताराताईंनी मला कशी समर्थ शिकवण दिली हे सांगायला सुरुवात केल्यावर असंख्य प्रसंग आणि आठवणी मनात जाग्या होणे स्वाभाविक होते. परंतु या आठवणींना तसा अंत नाही, हेच खरे! म्हणून बोर्डीतील बालवाडीच्या संदर्भातील आठवणींचे सूत्र पुन्हा पकडते.

बालवाडी यशस्वी करण्यासाठी १९५० मध्ये बोर्डीस लहान प्रमाणात ७ दिवसांचे एक बालशिक्षणनगर आम्ही भरविले होते.




अनुताईंचे वडील कै० बाळकृष्ण धुंडिराज वाघ आणि
आई कै० यमुनाबाई बाळकृष्ण वाघ



परकरी अनुताई : वय वर्षे ५

पक्षांची पिसे -

पक्षांची इकडे तिकडे पडलेली पिसे गोळा करण्याचा मुलांना छंद असतो. या छंदाला उत्तेजन दिले पाहिजे - ~~पिसांचा संग्रह असला पाहिजे~~ पिसे आणून देणाऱ्या मुलांचे कौतुक करायला पाहिजे त्यांचा योग्य संग्रह करायला पाहिजे - त्यामुळे या पिसांचा शैक्षणिक साधन म्हणून कितीतरी उपयोग होतो

(१) पिसांचे वर्गीकरण करणे - ही चिमणीची, ही कावळ्याची, ही बदकाची, ही मोराची — अशी निरनिराळ्या पक्षांची पिसे ओळखून वर्गीकरण करणे

(२) काळी, पांढरी, निळी, हिरवी, पिवळी रंगांची या प्रमाणे पिसांच्या रंगानुसार वर्गीकरण करणे,

(३) लहान, मोठी, लांब, आखूड या प्रमाणे आकारा-वरून वर्गीकरण करणे

असे कितीतरी प्रकारांनी वर्गीकरण करता येईल.

अनुताई वाघ

अंगणवाडी

मूक-बधिर उद्योगालय, डहाणू : उद्घाटन दि० २४-७-८३



ताईंच्या आदिवासी मुली : ताया आणि सुंदर
ताया ही सुमारे दीड वर्षाची असताना पाळणाघरात आली. आज ती बालवाडी-शिक्षिका आहे. सुंदर ही बालवाडीत शिकण्यास आली आणि तीही आता बालवाडी-शिक्षिका आहे.



बोर्डीची बालवाडी
झोपडीबाहेरच अंगणात भरलेल्या बालवाडीत स्वच्छता, वेणीफणी, खेळ आणि शिक्षणही!



कोसबाड टेकडीवरील ग्राम बाल केंद्राच्या प्रवेशद्वाराने आजपर्यंत असंख्यांचे स्वागत असे विनम्रभावाने केलेले आहे! डवरलेला हिरवागार वृक्ष आणि वसतिगृहाच्या इमारती अनुताईंच्या प्रेमभऱ्या आधाराची ग्वाहीच देत असतात! फोटोत श्री० अप्पा कोसके (उपसंचालक) आणि श्री० राम कदम (कार्यालय-कार्यवाह) दिसत आहेत



कोसबाड टेकडीवरील पाळणाघर

आदिवासींची १ महिन्यापासून ६ वर्षे वयापर्यंतची मुले येथे ठेवली जातात. त्यांची देखभाल करण्यास एक बालसेविका आणि तिची एक साहाय्यक आदिवासी तरुणी असते. मुलांना दूधपाणी-खाणेपिणे दिले जाते. आरोग्यकेंद्रातर्फे डॉ० जैन या मुलांची विनामूल्य देखभाल करतात.



पूर्वप्राथमिक विभागातील आदिवासी बालके आणि त्यांचा चित्रकलेतील मुक्तहस्त



बोर्डीच्या बालशिक्षणनगराची आठवण आल्याबरोबर १९४८ मध्ये मुंबईच्या विल्सन कॉलेजमध्ये भरलेल्या बालशिक्षणनगराची आठवण आली !

पूर्वप्राथमिक शाळांची कल्पना सर्वसाधारण जनतेपर्यंत पोहचविण्यासाठी बालशिक्षण-नगराचा फार उपयोग होतो असे आमच्या लक्षात आले होते.

विल्सन कॉलेजच्या २२ वर्गांतून आम्ही २१ दिवस बालशिक्षणनगर वसविले होते. मुंबईच्या २५ बालमंदिरांनी त्यात प्रत्यक्ष भाग घेतला होता. शिशुविहार मंडळ आणि नूतन बाल शिक्षण संघ यांच्यातर्फे भरलेल्या मुंबईच्या या बालशिक्षण नगराचे उद्घाटन मॅडम मॉंटेसोरी यांनी केले होते.

बालशिक्षण नगरात प्रशस्त जागेत बालमंदिरातील सर्व दालने मांडायची आणि बालमंदिराप्रमाणेच तेथे खेळत असलेल्या मुलांना पालक व इतर मंडळींनी सभोवती बांधलेल्या काठ्यांच्या बाहेर उभे राहून पाहायचे, अशी कल्पना होती.

ज्याप्रमाणे सर्कस पाहताना भोवती प्रेक्षक असतात व मध्यभागी खेळ चालतो त्याप्रमाणेच बालशिक्षण नगरातील खेळ चालतो !

१९५० च्या बोर्डीतील बालशिक्षणनगराचे आयोजन मराठी शाळेच्या पटांगणात तट्ट्यांची पार्टिशन्स करून ७ खोल्या तयार करून तेथे केले होते. शक्य तितक्या कमी खर्चातील, शिक्षकांनी वा गावातील कारागिरांनी तयार केलेली शैक्षणिक साधने तेथे ठेवली होती. तेथे गावातील सर्व मुले मुक्तपणे खेळत असत आणि ग्रामस्थ भोवती उभे राहून पाहत असत.

सहा वर्षे वयापर्यंतच्या मुलांची आम्ही आरोग्यतपासणी केली. त्यासाठी बरीच डॉक्टरमंडळी आपण होऊन आली होती. जवळपासच्या खेड्यांतून बैलगाड्यांतून लहान-मुलांना पालक घेऊन येत होते. १००० बालकांची आरोग्यतपासणी होऊन सुदृढ बालकांना व त्यांच्या मातांना बक्षिसे देण्यात आली.

डॉ० कामत यांनी आपल्या प्रशिक्षणार्थी विद्यार्थ्यांच्या मदतीने ५०० बालकांचा बुद्ध्यांक काढला.

शिक्षक आणि मुले यांची परस्पर-ओळख नसताना शैक्षणिक साधनांशी, खोडकरपणा विसरून, एकाग्रतेने मुले कशी खेळतात याचा अचंबा ग्रामस्थांना वाटला. त्यांना ही एक मोठी जादूच त्यांना वाटली.

पण जादू कसली ? मुलांना हवे असलेले बौद्धिक खाद्य मिळाल्यावर ती अशीच त्यामध्ये गर्क होतात !

अशा तऱ्हेच्याच एका बालशिक्षण नगराचे दर्शन आम्ही पुढे १९७७ च्या डिसेंबरमध्ये कोसबाडला अखिल भारतातून आलेल्या ५०० प्रतिनिधींना घडविले होते.

## स्वच्छता—बालवाडीचाच कार्यक्रम

बोर्डीत बालशिक्षणनगर भरविण्याचा हेतू ग्रामस्थांत पूर्वप्राथमिक शिक्षणाविषयी आस्था निर्माण करणे हाच होता. बालवाडी आम्ही चालू केली तेव्हा स्पृश्य-अस्पृश्यांचा प्रश्न अनाहूतपणे कसा उद्भवला ते मी यापूर्वी सांगितलेच आहे.

गावातून व हरिजनवाड्यातून मुले आणून ती एकत्र खेळविणे, खाणे-पिणे एकत्र करणे, यासाठी लोकांचे विचारपरिवर्तन करण्याकरिताही पुष्कळ प्रयत्न करावे लागले. त्याचबरोबर हरिजन मुलांना स्वच्छ करण्याचे प्रयत्न कसून करावे लागले.

बालवाडी सुरू केल्यावर जवळच्याच हरिजनवाड्यामधून बहुसंख्येने येणारी हरिजन मुले अत्यंत अस्वच्छ असत. केसांच्या जटा झालेल्या. खरजेने भरलेली. उवांचा सुळसुळाट झालेला. मळके-फाटके कपडे. त्यांच्या आयांना, मुलांना स्वच्छ ठेवायला, हवे ही जाणीवच नव्हती. तेल-साबू-सोडा यासाठी खर्च करण्याची त्यांची कुवतही नव्हती.

त्यामुळे, 'मुलांची स्वच्छता' हा ग्रामीण बालवाडीमधील पहिला कार्यक्रम म्हणून आम्ही निश्चित केला. त्यासाठी वेण्या-फण्या, आंघोळी, कपडे धुणे वगैरे सर्व गोष्टींची सोय केली. एक एक जोड कपड्यांचा दिला. अंग पुसायला रुमाल दिला. मोठ्या चुलीवर मोठ्या पातेल्यात पाणी तापवायचे. शिक्षकांनी ते लहान बादल्यांत काढून द्यायचे. त्यात हवे तितके थंड पाणी मुलांनी घालून घ्यायचे. लाईफबॉय साबण लावून आंघोळ करायची. एकमेकांपुढे बसून पाठी धुवायच्या. मोठ्या भावंडांनी लहान भावंडांना आंघोळ घालायची. आंघोळीची अशी एकच धमाल उडत असे!

काढलेले कपडे सोडा-साबण भिजत घातलेल्या उकळत्या पाण्यात मुलांनी काठीने बुडवायचे. नंतर मोठ्या भावंडांच्या मदतीने आम्ही शिक्षक ते कपडे धूत असू. मुलांचे हात पोहोचतील या बेताने दोऱ्या बांधल्या होत्या. तेथे मुलांनीच झटकून ते कपडे वाळत घालायचे. दुपारी येऊन वाळलेले कपडे काढून दाबून घडी घालून जागेवर ठेवायचे. ज्याची त्यानेच करावयाची ही कामे मुले मोठ्या आनंदाने करीत.

आंघोळी घालून स्वच्छ करून घेण्याच्या या गरजेमध्येही मुलांना जीवनशिक्षण मिळावे, चांगल्या सवयी लागाव्यात, या गोष्टींकडे दक्षतेने पाहिले जाई.

मी बालवाडी शिक्षिका असल्याने मुलांना बोलावण्यास जाणे, पोहोचविणे, त्यांना स्वच्छ करून घेणे, ही सर्व कामे माझ्याकडे होती. हरिजनवाड्यातून मुले आणणे एकवेळ सोपे जाई, पण गावातून मुले आणणे कठीण असे! कित्येक घरांतील मुलांना मी कपडे घालून तयार करून आणीत असे. बालवाडीतील पटसंख्या वाढविण्यासाठी आम्ही हरप्रकारे झटत होतो.

गृहभेटी, प्रचारवाड्या, गावातील तात्पुरती बालवाडी, बालशिक्षणनगर आदी



उपक्रमांमुळे पटसंख्या थोडीफार वाढली होती. तरीही, स्पृश्यास्पृश्यतेची बोचणी अजूनही पूर्णपणे गेली नव्हती. त्यामुळे एक नवीन उपाय योजला. बोर्डीच्या सु० पे० हायस्कूलचे मुख्याध्यापक श्री० आत्मारामपंत सावे हे गृहभेटीच्या वेळी माझ्या-बरोबर फिरत होते. हायस्कूलच्या जवळपास राहणारी मंडळी आपली मुले बालवाडीत पाठविण्यास तयार होती. पण या दोन्हीमध्ये अंतर खूप होते. लहान मुले इतक्या लांबून चालत येणे शक्य नव्हते. म्हणून एका बैलगाडीची योजना झाली.

हायस्कूलपासून ही बैलगाडी निघायची. चौकाचौकात थांबायची. घंटा वाजवायची. घंटेचा आवाज ऐकून आजूबाजूची मुले यायची. लहान मुले गाडीत बसायची. मोठी मुले गाडीमागून चालायची.

या मिरवणुकीत ठिकठिकाणाहून मुलांचे घोळके येऊन मिळत असत. बालवाडीत भरपूर मुले येऊ लागली. इतक्या लांबून मुले बालवाडीत येतात तेव्हा इथे काहीतरी असलेच पाहिजे, आणि आपलीही मुले तेथे गेलीच पाहिजेत, असे गावातल्या पालकांना वाटू लागले. मुलांचे सांस्कृतिक कार्यक्रम पालकांना आवडू लागले. मुलांनाही बालवाडीची गोडी वाटू लागली.

परंतु हा बदल होण्यास ७/८ वर्षांचा काळ आणि जाणीवपूर्वक परिश्रम घ्यावे लागले. "संख्या कमी" हा तणाव जेव्हा कमी झाला आणि बालवाडीची पटसंख्या १०१ झाली तेव्हा आम्ही मोठा सत्यनारायण केला!

पण हा दिवस उजाडण्यापूर्वी मुलांच्या स्वच्छतेसाठी अहोरात्र केलेली चिंता आणि प्रत्यक्ष कृती यांची आज सतत आठवण येते.

हरिजन मुलांच्या आंघोळी, कपडे धुणे, घड्या घालणे हा एक सोहळा प्रारंभी मलाच करावा लागला. त्यात माझा तास—दीडतास सहज जायचा. पुन्हा दुपारी बादलीभर कपडे धुणे, मुलींच्या डोक्यात उवांचे औषध घालणे, रविवारी त्यांना न्हाऊ घालणे, त्याबरोबरच घरोघरी उवांचे औषध पोहोचविणे, हे आमच्या बालवाडीचेच काम ठरले!

एकदा बऱ्याच मुलांचे एकदम डोळे आले. त्या वेळी चहाच्या चोथ्याने डोळे शेकून आर्जेरॉलही घालावे लागले. हे काम आग्रहपूर्वक केल्यावर माझ्या घरी मुलांची रांगच्या रांग लागत असे. पुढे मुलांचे डोळे बरे झाले त्याचा मला आणि त्यांना खूप आनंद वाटला.

## "आम्हांला बालवाडी हवीच!"

सांगायला अतिशय आनंद वाटतो की, बालवाडी सुरू झाल्यावर वर्ष-सहा महिन्यांतच मुले स्वच्छ झाली. इतकी स्वच्छ झाली की हरिजनांची मुले इतर मुलांहून वेगळी शोधून काढणे शक्य नव्हते!

आज इतक्या वर्षांनंतरही या गोष्टीचा परिणाम तेथील वस्तीवर दिसून येतो. आता पालकच आपल्या मुलांना नीटनेटकी करून बालवाडीत अगत्याने पाठवतात. आपल्या मुलांना बालवाडी हवी, असा त्यांचा आग्रहच आहे!

## 'बालवाडी' हे नाव कसे पडले ?

श्री० गिजूभाईंनी बालकशाळांचे नाव 'बालमंदिर' असे मोठ्या कल्पकतेने, श्रद्धेने ठेवले होते. ते तसेच सर्वठिकाणी रूढ होत गेले. शिशुविहार, शिशुकुंज, शिशुसदन, बालविहार, अशी नावे कोणी कोणी घेतली. पण सर्वसाधारणपणे 'बालमंदिर' हेच सामान्यनाम म्हणून स्वीकारले गेले.

बोर्डीला 'ग्रामीण बालशाळे'चा नमुना तयार होत होता. यासाठी काही नवे नाव हवे होते. पू० श्री० जुगतरामभाई हे ताराताईंची अभिनव शाळा पाहण्यास आले होते.

ते म्हणाले, "वा! येथे चिकू-पपनसाच्या वाड्या आहेत, तशी तुमची बालांची वाडी म्हणजे बालवाडीही आहे!"

त्या दिवसापासून कमी खर्चात, सभोवतालच्या वस्तूंचा उपयोग करून चालणारी बालशाळा ती 'बालवाडी' हे नाव रूढच झाले!

## स्थानिक वस्तूंमधून बालवाडी-साधने

बालवाडीच्या कार्यक्रमांत गाणी, गोष्टी, खेळ वगैरे सामुदायिक भाग येतो. मिळते-जुळते कार्यक्रम घेणे महत्त्वाचे. हा भाग श्री० शेलतभाई घेत असत. कारण मला आवाज नाही.

साधनांवर खेळणे येथेही होत असे. पण साधने कोणती? ती मुंबईहून तर विकत आणावयाची नाहीत. परिसरातून निर्माण झाली पाहिजेत. मग आमचे मातीकाम, तकळीवर सुतकाम, रंगकाम वगैरे कामे सुरू झाली. पिसांच्या रंगजोड्या लावणे, बांगड्यांना दोरे गुंडाळून त्यांच्या रंगजोड्या लावणे असे अनेक प्रयोग होत होत कार्डबोर्डच्या रंगतक्त्या करणे पसंत केले. समुद्रावरून शंखशिंपले आणून ते निवडण्याचे काम होते. फुटके शंख व फुटके दगड ओवायला ठेवले होते. शंखांचे विविध आकार व रंग असतात. त्यांवरून वर्गीकरण करीत होतो. त्यांना निरनिराळी नावेही होती. काही आम्ही दिली, काही मुलांनी सांगितली. काड्या, पाने, बिया यांचा उपयोग होत होता. पण हा उपयोग पुढे कोसबाडला जास्त प्रमाणात होऊ लागला. बोर्डीला समुद्र जवळ होता. जंगल जरा लांबच होते. किसायला साबू, कुटायला विटकर, भरडायला गोवरी, बाटलीत भरायला बारीक रेती असे सगळे 'ऐवजी' आले! 'अ'पासून 'अं'पर्यंतच्या वस्तू-चित्रांसाठी स्थानिक वस्तू निवडल्या



गेल्या. ट्रे ऐवजी बांबूची शिफ्तरे व टोपल्या आल्या. रंगकामासाठी बांबूफळे व दांतणाचे ब्रश आले. केळीच्या सोपटाचे बारीक धागे काढून त्याच्या वाट्या-टोपल्या तर विणल्याच, पण कार्डावरचे शिवणकाम पण याच धाग्यांनी सुरू केले. खजुरीच्या पानांच्या चटया करणे, डब्या करणे, खुळखुळे करणे ही कामे सुरू झाली. पानांच्या पत्रावळी व द्रोण करण्याची कामे मुक्त व्यवसायासाठी ठेवली. त्या वेळच्या आमच्या सहली खजुरीची पाने आणणे, केळीचे खांब आणणे, काचा गोळा करणे अशा कामांसाठी होत असत.

## ताईंचे सूत्र : शहरातले काही आणायचे नाही

ताईंचे एक सूत्रवाक्य होते: "शहरातले काही आणावयाचे नाही"—स्थानिक वस्तूंमधून बालवाडीसाठी साधने निर्माण करावयाची. या सूत्रानुसार माझ्या कल्पनेचे घोडे धावत होते. आमच्या मोठ्या विहिरीजवळ पाण्याचे एक अर्धे कापलेले टीप ठेवले. त्याला कप्पी बसविली. लहानसे कडीचे डबडे पोहरा म्हणून ठेवले. टीप आम्ही पाण्याने भरून ठेवीत असू. या लहान विहिरीतून पाणी काढणे, ते डब्यात भरणे, डब्याची गाडी हाकलत-ढकलत बागेत नेणे आणि तेथे झारीने झाडांना पाणी घालणे या सर्वच क्रियांमध्ये मुले तासन्तास रंगून जात असत.

माझी ही विहीर सगळ्यांना आवडली. बऱ्याच ग्रामीण पूर्वप्राथमिक शाळांत ती जाऊन पोहोचली.

मातीकामामध्ये आम्ही लहान लहान विटा पाडल्या. त्यांची छोटी भट्टी मुलांच्या मदतीने घातली. भाजलेल्या विटा मोजल्या. त्यांच्या भिंती, पूल व घरे वगैरे मुक्त-व्यवसाय होऊ लागला.

रंग, आकार, वजन, स्पर्श, वास, चव वगैरे सारी संबोधने स्थानिक साधने निर्माण करूनच दिली.

आम्हांला साधने निर्माण करण्याचा छंद लागला. आमच्यामध्ये सर्व वेळ असणारी अशी मीच होते! माझ्या मदतीला तेथे असणारे कार्यकर्ते येत असत. ताईंचे भाचे श्री० भाऊ केळकर यांचा या कार्यकर्त्यांत मोठा वाटा आहे.

आवाज-डब्यांवर अनेक प्रयोग झाले. बांबूच्या आवाज-डब्या, पत्र्याच्या आवाज-डब्या, शिंपल्यांच्या आवाज-डब्या...शेवटी कागदाच्या आवाज-डब्या ताईंनी पसंत केल्या.

सर्वात संस्मरणीय प्रयत्न म्हणजे रेतीकागद तयार करणे व त्याची रेतीअक्षरे बनविणे. उंबरगावच्या किनाऱ्यास काळ्या बारीक रेतीचे थर आहेत असे कळले. लगेच बैलगाडी घेऊन आम्ही निघालो. अलीकडच्या किनाऱ्यावर तर रेती दिसली नाही. मग होडीतून पलीकडे गेलो. तेथेही रेती काही सापडेना. शेवटी कपारीत

खालच्या बाजूस एक काळी रेघ दिसली. लगेच वरचा रेतीचा थर दूर करण्याचा सपाटा लावला.. आणि काय सांगावे ? वाटेल तेवढी काळी रेती ! मग काय, पिशव्या भरभरून रेती घेतली ! जवळच्या पिशव्या संपल्या तेव्हा भाऊ वेळकरांनी आपल्या गांधीटोपीची पण पिशवी केली ! होडीपर्यंत या पिशव्या नेताना नाकीनऊ आले !

रेती मिळाली. आता तिचा रेतीकागद बनविणे हा एकच ध्यास लागला होता. रविवारी सकाळच्या न्हानंतर लगेच शिरस शिजवला. ड्रॉइंगपेपरवर तो लावला. त्यावर रेती व्यवस्थित पसरली. आणि त्यावर पुन्हा कागद पसरून पोळीसारखे वरून लाटणे फिरविले. कागद तर तयार झाला. पण सुरुवातीस रेतीचा थर असमान होता. पुढे पुढे मात्र या कामात चांगली सफाई आली.

खेडेगावातील बालवाडीच्या कार्यपद्धतीचा अशा प्रकारे नमुना तयार होत होता. ताईंची प्रेरणा, आमचे प्रयत्न, त्यावरून ताईंची व्याख्याने, या सगळ्याचे सार म्हणजे आजचे 'बालवाडी कशी चालवावी ?' हे पुस्तक होय. या पुस्तकाची सध्या मराठी पाचवी आवृत्ती निघत आहे. त्याचे गुजराती, हिंदी, इंग्रजीत भाषांतरही झाले आहे.

### अंगणवाडी

आता पुन्हा बालवाडीकडे वळू या. बालवाडीची पटसंख्या वाढविणे, स्पृश्या-स्पृश्यतेचा प्रश्न सोडविणे वगैरे हळूहळू चालू होते. १०१ पटसंख्या झाल्यावर सत्यनारायणाची पूजा केली हे वर सांगितलेच आहे. गावातील मुलांना बालवाडीत आणण्याचे प्रयत्न होत होते, त्याच वेळी गावाबाहेर अर्ध्या-पाऊण मैलाच्या परिघात राहणाऱ्या आदिवासींची मुले पण बालवाडीत आणण्याचे प्रयत्न चालू होते. आदिवासी बंधू-भगिनी गावात लाकडाचे भारे विकणे, पाने विकणे अगर कोणाकडे काही मजुरी करणे अशा कामांसाठी येत असत. पाणी पिण्यासाठी म्हणून ही मंडळी बालवाडीत येत, त्या वेळी लहान मुलांचे खेळ मोठ्या कौतुकाने पाहत.

"तुमची मुले पण बालवाडीत पाठवा ना—" असे म्हटले तर, "क्या-ना" (का नाही ?) असे म्हणत. पण मुले यायची मात्र नाहीत ! मग आम्हीच त्यांच्या अंगणात जायचे ठरविले. ही आमची 'अंगणवाडी'.

अंगणवाडी चालविण्याच्या कामात प्रशिक्षणार्थींचा मोठा भाग होता. प्रत्येकी साधारण ६ जण अशा त्यांच्या तुकड्या असायच्या. एकेका तुकडीने एकेका वस्तीवर जायचे. बरोबर कोणीतरी शिक्षक असायचेच.

वस्तीच्या मध्यभागी एखादे झाड शोधायचे. त्याच्या खालची जागा स्वच्छ करायची. तेथे मुलांना जमवून गाणी, गोष्टी, खेळ, रंगकाम, कार्डावरचे शिवणकाम वगैरे कार्यक्रम व्हायचे.



आमची पहिली अंगणवाडी 'हळपत निवास' ही होय. हे नाव आम्हीच पाडले होते. पहिल्या दिवशी मुले आम्हांला भिऊन पळून गेली. घरात मोठी माणसे कोणीच नव्हती. दुसऱ्या दिवशीही असाच शुकशुकाट होता. पण किलकिल्या दाराआडून काही डोळे चमकत होते. नंतर आम्ही ओवण्यासाठी म्हणून वाटीमध्ये मणी व दोरा आणला. त्या वाट्या दाराबाहेर ठेवून आम्ही बाजूला झालो. सगळ्या वाट्या आत गेल्या व थोड्या वेळाने ओवलेल्या माळांसह बाहेर आल्या! हळूहळू मुलांची-आमची मैत्री वाढली. मुले आमची वाट पाहू लागली.

येथेही मुलांना स्वच्छ करणे हे पहिले काम होते. शिवाय पाणी लांबून आणावे लागायचे. उन्हाळ्यात तर जेमतेम पिण्यापुरते पाणी मिळायचे. तेव्हा "रोज आंघोळी करा, कपडे धुवा," वगैरे सांगून उपयोग काय ?

रोज अंगणवाडीस जाताना बादलीत आरसा, फण्या, तेल, रुमाल, झांजा व इतर हस्तव्यवसायाचे सामान; खांद्यावर खराटे, पंखाझाडू अशा थाटात आम्ही निघत असू. ओल्या रुमालाने मुलांची अंगे पुसून घ्यायची. पहिल्या पहिल्याने तर एका मुलासाठी एक रुमाल वापरावा लागे. कारण त्याचे अंग पुसतानाच तो काळाकुट्ट होऊन जाई. मधूनमधून जवळपासच्या वाडीतील विहिरीवर नेऊन आंघोळी घालण्याचा कार्यक्रम होत असे. तेथेच खरजेवरच्या कडू लिंबाच्या पाल्याचे औषध आम्हाला सापडले !

### सांभाळायचे ते काय !

आईवडील कामानिमित्त बाहेर गेलेले. जराशी मोठी मुलेही कोठेतरी वाडीत विटांच्या भट्टीवर चारदोन आणे रोजावर गेलेली. मग ८/१० वर्षे वयाच्या मुलांनी घर आणि लहान भावंडे सांभाळायची. घर ते काय सांभाळायचे ! कुडाच्या भिंती, दोन गाडगी-मडकी, पितळेचे भांडे कोठे तरी आढळेल, एखादे जुने लुगडे—त्या झोळीत लहान मूल झोपायचे. मोठ्यांना निजायला असल्या तर चटया, नाही तर जमीन. पांघरायला पाहिजेच असे नाही. मुलगे लंगोटी लावलेले, तर मुलींच्या कमरेला नावापुरत्या चिंध्या गुंडाळलेल्या. बाकी सर्व उघडेच. कोठे कोठे मिळाले तर लक्तरे झालेले सदरे. पुरुषांच्याही लंगोट्या व लांब कुडती. बायकांची नऊ वारी लुगडी खरी पण ती फाटलेली. अशा घरात सांभाळायचे ते काय ! लहान भावंडे आणि कोंबड्या. एखाददुसरे बकऱ्याचे बाळ !

### विकासवाडीची पूर्वतयारी

तेव्हा ही सर्वच मंडळी आमच्या अंगणवाडीत येत असत. अडीच ते सहा ही मर्यादा आम्हांला सोडावी लागली. मोठी भावंडे, त्यांच्या कडेवर तान्ही बाळे

व बोटाशी-पाठीशी बाळे अशा थाटाने ही मंडळी आमच्या अंगणवाडीत यायची. तेव्हा तीनही गटांस योग्य काम देण्याच्या योजना कराव्या लागल्या. मोठ्या मुलांचे खेळ, कवायत, हस्तव्यवसाय घेत असू. तान्ह्यांना तरटावर ठेवून खेळवायचे व बालवाडी गटास गाणी, गोष्टी, खेळ, हस्तव्यवसाय असायचा. आमच्या विकासवाडीची ही पूर्वतयारीच होय.

### भितो पांढऱ्या कपड्याला !

आदिवासींची ही मुले नागरी संस्कृतीपासून दूर होती. पण निरागस होती. डोळ्यांत चमक, चपलता, समय-सूचकता, काटकपणा हे गुण लक्ष वेधून घेणारे होते. झाडावर सरसर चढणे, उतरणे त्यांच्या हातचा मळ! जनावरांच्या शेपट्या पिरगळून त्यांच्या मागे धावायची. म्हणून मी एक सूत्र केले होते—"भीत नाही वाघाला, भीत नाही सिंहाला, भितो एका पांढऱ्या कपड्याला!" आमच्यासारख्या शिकलेल्या माणसांची त्यांना भीती वाटायची!

### ताईची गंमत

मुले विनोदी पण फार! एकदा मुले बोरे खात होती. मी म्हटलं,

"कोठून रे आणलीत?"

"मोळामधून (जंगलातून). बक्कळ आहेत."

"मग मला घेऊन चला ना!"

पोरे खो खो हसायला लागली.

"का रे हसता?"

"तू कशी यायची?"

"का बरे?"

"लांब आहे. रस्ता चांगला नाही."

असे मला समजावण्याचा मुलांनी प्रयत्न केला. पण "मी येणारच" असे म्हटले तेव्हा दुसऱ्या दिवशी सकाळी आम्ही या सहलीला निघालो. बरोबर बोरे ठेवण्यासाठी छोट्या छोट्या टोपल्या पण घेतल्या होत्या.

मुले भराभर पळत, उड्या मारत चालली होती. जंगलातल्या वाटेतून मी त्यांच्या गतीने चालू शकत नव्हते. मध्येच मुले कोणीच दिसेनात. मी घाबरले. "अरे, कुठे गेलात? मंगळ्या, वनशा, शुक्री—" अशा हाका मारायला सुरुवात केली. तर "हा, हा, हा!" करीत एका झुडपामागून पुढे आली! ताईची कशी गंमत केली, याचा आनंद त्यांच्या चेहऱ्यावर तळपत होता.



### सुशोभन आणि अनौपचारिक शिक्षण

अंगवाडीतील चित्रकाम फार रंगले होते. अंगण, भोवतालच्या झोपड्यांच्या भिंती तर चित्रित झाल्याच होत्या, पण आसपासच्या वृक्षांचे बुंधेही चित्रांनी भरले होते. हे बुंधे प्रथम शेण व मातीने सारवून घेतले जायचे. सुशोभनाची अशीच मजा होती. परिसरातील पाने, फुले, बिया वगैरेंचा उपयोग करून सुशोभन करायचे हा दंडक होता. त्यासाठी आमच्या प्रशिक्षणार्थिनी खूप दूरवर भटकत असत. मिळेल त्या वस्तू आणत असत. एकदा एका भगिनीने शेणाचा पोह उचलून आणला. त्याला व्यवस्थित आकार दिला. पावडर-रंग शिंपडले. भोवती फुले लावली. एका भगिनीने माती व शिंपा यांची दीपमाळ केली. आमच्या ताईंना ही दोन सुशोभने फार आवडली होती.

दरवर्षी सभोवतालची निरनिराळी ठिकाणे अंगणवाडीसाठी घेत असू. अशा सुमारे १५ अंगणवाड्या १९४९ ते ५३ या सात वर्षांमध्ये चालल्या. १९४६ मध्ये बोर्डीला 'ग्रॅज्युएट्स बेसिक ट्रेनिंग सेंटर' सुरू झाले. त्याच्या प्राचार्या प्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ श्रीमती सुशीलाताई पाणंदीकर या होत्या. त्यांना या अंगणवाड्या फार आवडत असत. पुष्कळदा आम्ही दोघी बरोबर अंगणवाडीत जात असू. जातायेता आमच्या पुष्कळ गप्पा गोष्टी व्हायच्या. त्यामुळे मला शिक्षणशास्त्रातील पुष्कळ धडे मिळाले. हे माझे अनौपचारिक शिक्षण होते.

आम्ही अंगणवाडीत जात असू तेव्हा रस्त्यात काही मुले लहानलहानशा पहारीने खणून काहीतरी शोधताना दिसत. "काय शोधता रे?" विचारले म्हणजे "गुंदल्या" असे उत्तर येई. 'गुंदल्या' म्हणजे एक प्रकारच्या गवताची मुळे. ती खणून काढून ही मुले आपले पोट भरीत असत! साधारण फेब्रुवारी ते जूनपर्यंत या मुलांना असेच रानोमाळी भटकून खाणे शोधावे लागते हे आमच्या मग लक्षात आले. झाडावरची करवंदे, सीताफळे, बोरी, कैऱ्या, जांभळे, आवळे, चिंचा, खजुऱ्या आणखी रानटी फळे कच्चीच खायची. ती पिकून तयार होईपर्यंत धीर कुठला? गलोलीने नेम धरून उडते लहान लहान पक्षी मारायचे, ते तेथल्या तेथेच गवत गोळा करून भाजून खायचे, हा त्यांचा आवडता उद्योग. खाद्य शोधण्यासाठी वणवण भटकायचे, तरीही अपुरेच खायचे, अंगावर कपडा नाही, राहायला झोपडी जेमतेम, अशा अवस्थेतील या मुलांनी शाळेत यावे, पाच तास बांधल्या भिंतीच्या आत बसावे व पुस्तकी ज्ञान घोकावे अशी अपेक्षा तरी कोणत्या तोंडाने करायची? पोटात कावळे काव काव करीत असताना निरर्थक घोकंपट्टी कोणाला सुचेल?

पण अशा अवस्थेतही ही मुले सदैव आनंदी दिसत असत. यापेक्षा सुखी जीवन जगायचे असते याचे त्यांना भानच नव्हते, हेच कदाचित या आनंदाचे कारण असू शकेल.

अंगणवाडीचा आमचा कार्यक्रम फुलत होता. या परिसरास योग्य गाणी, गोष्टी, बडबडगीते, खेळ, जीवनव्यवहार व्यवसाय, मुक्त व्यवसाय आदी कसे असावे तो साचा घडत होता. पाने, फुले, बिया, पिसे यांच्या साहाय्याने ज्ञानेंद्रिय-विकास कसा साधावा याचे प्रयत्न चालू होते. आमच्या विकासवाडीची ही शिदोरीच बांधली जात होती.

## आनंदी आणि अंधश्रद्ध आदिवासी

साधारण संध्याकाळच्या वेळी आदिवासी पालक आपली कामे आटोपून घरी येत. आमचे कार्यक्रम अजून चालूच असायचे. त्यांना फार गंमत वाटायची. मग या अंगणवाडीच्या आसपास बसूनच ते विसावा घेत. काही उत्साही पालक तर मुलांची रस्सीखेच, मुलींचे गर्बे यांमध्येही भाग घेत असत. हळूहळू आमच्या ओळखी झाल्या आणि आदिवासी जीवन जवळून पाहायला मिळाले.

आदिवासींना संस्कृती आहे. एकमेकांशी वागण्याचे, लग्नकार्याचे, मर्तिकाचे वगैरे सर्व सांकेतिक नियम आहेत. वाघ्या, नारायणदेव हे त्यांचे देव आहेत. ते कष्टाळू व प्रामाणिक आहेत. पण सुधारित जगाशी संबंध नाही. दारिद्र्य भरपूर. सावकारांच्या शेतावर, भट्टीवर वा अन्य ठिकाणी मजुरी करायची. सांगतील ते काम करायचे. स्वतःचे डोके वापरायचे कामच नाही. पिढ्यान् पिढ्या कर्जामध्ये बुडालेले.

सतत कामात असल्यामुळे एकमेकाशी गप्पा मारण्यास वेळच नाही. जीवनाच्या गरजा कमी, त्यामुळे त्यांची सुखदुःखेही कमी. तेव्हा गप्पा तरी कसल्या मारायच्या! त्यामुळे अगदी कमी बोलणे हा त्यांचा स्वभावविशेष. आणखीही एक कारण असेल. नेहमीच शेटसावकारांकडे 'सेवक' या नात्याने काम करायचे. त्या मंडळींच्या उपस्थितीत बोलायचे कसे? त्यामुळे गप्प राहत असतील. एखाद्याने काही अपराध केला तर त्याची चहाडी तर मालकाकडे जाणारच नाही; पण रागावून, दरडावून, मारहाण करून कोणी माहिती काढण्याचा प्रयत्न केला तरी तोंडातून दुसऱ्याच्या गाऱ्हाण्याचा अगर त्याने केलेल्या गुन्ह्याच्या माहितीचा एक शब्दही बाहेर पडणार नाही! कारण आपल्यावरही ही पाळी केव्हा येईल याचा नेम नाही, अशी भीती मनात असते.

या सर्व परिस्थितीमुळे, अज्ञानामुळे अंधश्रद्धा खूप आहे. भूत, खेत यांवर विश्वास. अंगारे, धुपारे, भगत सतत चालू. डॉक्टर, वैद्य यांच्याकडे जाऊन औषधे घेणे माहीत नव्हते. पुढे माहीत करून दिले तरी विश्वास पटत नव्हता. भगत मंडळींना झाडपाल्याच्या औषधांची चांगली माहिती असते. पण ही मंडळी या औषधांचा उपयोग कमी करतात. अंगारेधुपारेच जास्त.

आर्थिक परिस्थिती बेताची. त्यामुळे ज्याचे त्याने मिळवावे व खावे असे



कौटुंबिक धोरण आहे. म्हणूनच लग्न झाले की मुलगा आपली चूल वेगळी मांडतो. मूळच्या घराजवळच आपली नवी झोपडी तो बांधतो. ते शक्य नसल्यास मूळ झोपडीच्या एखाद्या कोपऱ्यात निराळी चूल मांडतात. आई, वडील अगर इतर आश्रित मंडळी, वृद्ध यांना संभाळण्याची जबाबदारी आपली आहे, असे मानीत नाहीत. त्यामुळे म्हातारी माणसे हातून होतील तितके दिवस काही ना काही काम करीतच असतात. खजुरीच्या चटया विणण्याचे काम बहुधा अशी म्हातारी माणसे करतात. एकंदर वागणे तुटकच आहे. एका पाड्यावरच्या मंडळींना दुसऱ्या पाड्यावरच्या मंडळींची माहिती जवळजवळ नसतेच. एकमेकांना उपयोगी पडायचे, गावासाठी काही करायचे वगैरे सामाजिक जाणीव कमी. असे असले तरी ही मंडळी स्वाभिमानी आहेत. उपाशी राहतील पण भीक मागणार नाहीत. उपाशी राहतील तरीही आनंदी असतील.

## अडचणी समजल्या

एक गोष्ट येथे नमूद करायला हवी की, गावातील बालवाडीत आदिवासी मुलांनी यावे म्हणून अंगणवाडीचा उपक्रम सुरू झाला होता, परंतु ती मुले गावातल्या बालवाडीत येऊ शकली नाहीत. लांब वस्ती. आईबाप सकाळीच बाहेर निघून जायचे. तेव्हा ही मुले आम्हीच जाऊन पोहोचवायची व आणायची. त्यापेक्षा त्यांच्याच वस्तीत अंगणवाडी चालवणे आम्ही पसंत केले.

अंगणवाडीच्या कार्यक्रमामुळे आदिवासींचे जीवन जवळून पाहायला मिळाले. त्यांच्या मुलांच्या शिक्षणातील अडचणी कळल्या आणि मग या मुलांसाठी निराळ्याच प्रकारच्या शाळा हव्यात या गोष्टीवर ताईंचे चिंतन सुरू झाले. याच वेळी आजूबाजूच्या आदिवासी वस्तीत चालणाऱ्या प्राथमिक शाळांचीही आम्ही पाहणी केली.

या मुलांसाठी त्यांच्या गरजा पुरविणारी शाळा हवी; त्यांना लहान भावंडे सांभाळावी लागतात म्हणून त्यांनाही शाळेत आणावयास सांगावे, असे ठरले. हे पाळणाघर तान्ह्या मुलांसाठी, ३ ते ६ वर्षांच्या मुलांसाठी बालवाडी आणि शाळेचे नावही न ऐकलेल्या ८।१० वर्षे वयांच्या मुलांसाठी इ० पहिली, अशी पाळणाघर, बालवाडी व प्राथमिक शाळा एकत्र असणारी शाळा हवी असे वाटले. या कल्पनेतूनच पुढे 'विकासवाडी' साकार झाली.

## कोसबाडच्या कामाचा मूळ गाभा सापडला

अंगणवाडीने आम्हांला खूप शिकविले. कोसबाडच्या कामाचा मूळ गाभा येथे सापडला. आदिवासी लोक, त्यांची राहणी, स्वभाव, आर्थिक आणि सामाजिक परिस्थिती, मागासलेपणाची कार्ये, आदिवासी मुले, त्यांचे स्वभाव, त्यांच्या शिक्षणातील

अडचणी वगैरे सगळ्या गोष्टींचा जवळून अभ्यास करता आला.

आदिवासी माणूस स्वाभिमानी, कष्टाळू व प्रामाणिक आहे. त्यांना संस्कृती आहे. पुष्कळ दिवस डोंगराळ भागात राहिल्यामुळे शहरी सुधारणेस ते वंचित राहिले आहेत. त्यांच्या अज्ञानाचा फायदा घेऊन त्यांच्यावर जुलूम झाले आहेत. परिणामी ते व्यसनी पण बनले. शिक्षण व आर्थिक संधी हेच त्यावर उपाय आहेत.

आदिवासी मुले खेळकर, आनंदी, निरोगी मनाची, काटक आणि उद्योगी आहेत. मंदबुद्धी अगर अपंग त्यांच्यात क्वचितच मिळेल. अशक्तपणा, रातांधळेपणा, खरूज वगैरेंसारख्या गोष्टी अपुऱ्या अन्नामुळे आणि दूषित पाण्यामुळे दिसतात. ती मुले उघड्या मैदानात खेळतात, कच्ची फळे खातात, पक्ष्यांची-ससाची शिकार करतात. त्या दृष्टीने सकस अन्न त्यांनी खाल्ले तरी ते फार अपुरे असते. वर्षातून कित्येक महिने ही मुले अर्धपोटी असतात. म्हणून दुखणी, अशक्तपणा व अपमृत्यू आढळतो.

## विकासवाडीचा जन्म

पाळणाघरे, बालवाड्या व त्यांना जोडून प्राथमिक शाळा अशी शिक्षणाची सोय त्यांच्या त्यांच्या वस्तीतून व्हायला हवी, म्हणजे हळूहळू सर्व गोष्टी सुधारणेच्या मार्गावर येतील, हा ताईंचा विचार पक्का झाला. त्यातून ' विकासवाडी 'चा जन्म झाला.

वरील प्रकारची एक लहानशी विकासवाडी आम्ही दर्जीवाड्यामध्ये चालवून बघितली. तीनही विभाग मिळून अवघी वीस मुले होती. श्री० जयंत शुक्ल हे आघाडीचे सैनिक होते. सकाळपासून संध्याकाळपर्यंत विकासवाडीचे काम आणि चिंतन चालविले होते. नमुना तयार होत होता. पुढे श्री० शुक्ल भावनगरला कामाला गेले आणि विकासवाडीचा प्रयोग पुढे चालविण्याचे काम माझ्याकडे आले.

सकाळी तीनही विभागांची मुले येत. स्वच्छता व्हायची. आवार-स्वच्छता व्हायची. मोठ्या मुलांनी बागकाम करायचे. नंतर आंघोळी, कपडे धुणे, प्रार्थना व नाश्ता. त्यानंतर काही सामुदायिक कामे चालत. पाळीपाळीने काही मुले स्वयंपाक करीत. तीन दगडांच्या चुलीवरच भाजी अगर उसळ शिजायची. आपापल्या घरून मुले भात आणीत असत. कारण ही मुले भातच खात असत. शिक्षक व लहान मोठी मुले मिळून एकत्र बसून जेवण व्हायचे. थोडा वेळ विश्रांती, नंतर प्राथमिक शाळा विभागाचे अध्यापन. बालवाडीच्या व्यक्तिगत साधनांवर संचलन. असे चालायचे. पाच वाजता सुट्टी. अधूनमधून सहली !

एकूण या छोट्याशा विकासवाडीत खूप मजा येत असे. ती पाहायला पुष्कळ तज्ज्ञ मंडळी आली. ताईंनी या विकासवाडीच्या आधारे एक लेख बडोदा युनिव्हर्सिटीमध्ये वाचला. त्यावरून त्यांना सूचना येऊ लागल्या.



## ताईंवर दैवाघात

दरम्यान दुर्दैवाने ताईंची एकुलती एक, ३० वर्षे वयाची कन्या प्रभा वारली. त्या धक्क्याने त्या वर्षभर जवळजवळ खोलीत निजूनच होत्या. पण डोके मात्र काम करीत होते. विकासवाडीची योजना त्यांनी विस्तृतपणे लिहून काढली. टाईप करून घेतली. पुढे ती श्री० जे० पी० नाईक यांना दाखविली. त्याचप्रमाणे अगोदर शिक्षण-संचालक असलेले व नंतर दिल्लीस शिक्षणखात्यात मोठ्या हुद्द्यावर गेलेले डॉ० सय्यदीन यांनाही दाखविली. सगळ्यांच्या सल्ल्याने योजनेस व्यवस्थित आकार दिला. अडीच लाखाची योजना होती.

## "मी काम करीन, पैशाचे तुम्ही बघा"

नू० बा० शि० संघाच्या अनुभवी मंडळींनी "वृद्धापकाळी ताईंनी ही जबाबदारी घेऊ नये" असा आग्रह धरला. त्यावर पैशाची जबाबदारी स्वतः पत्करून ताईंनी त्यांचे मन वळविले. पुढे त्या वेळच्या मुंबई राज्याच्या शासनानेही खर्चाचा स्वतःचा एक-अष्टमांश हिस्सा स्वीकारण्यास नाखुशी दाखविली. तो भारही ताईंनी आपल्या शिरावर घेतला ! ६५ वर्षे वयाच्या या चिरतरुण खंबीर महिलेने एकूण पाऊण लाख रु० स्वतःच्या हिंमतीवर जमविण्याची तयारी दर्शवून नव्या कामासाठी पाऊल पुढे टाकले. प्रत्यक्ष कामाला दीड लाख रु० उभे करावे लागले.

ताईंच्या या धावपळीला मी खीळ घातली नाही. "आपल्याकडून होईल ते आपण करूच. काम करण्याचे माझ्याकडे. पैशाचे तुम्ही बघा." असे आश्वासन मी दिले.

सुदैवाने माझाही आधार ताईंना सुखदायक वाटला. १९५६ साली आघाडी सैनिक म्हणून माझी रवानगी कोसबाडला झाली.

# आम्ही कोसबाडला आलो

१० जून १९५६ ला मी आणि माझी मदतनीस कु० विमल सावे सामानासह बैलगाडीने कोसबाडला पोहोचलो. शाळेच्या सामानात पाळणा कशाला, म्हणून लोक आमच्याकडे आश्चर्याने पाहत होते; तर आपण येथे काय करणार आहोत ते नेमके न समजल्यामुळे आम्ही भांबावलेल्या दृष्टीने त्यांच्याकडे बघत होतो! कोसबाडला नक्की काय करायचे त्याची ताईंना अगर मला कल्पना नव्हती. आमची योजना मंजूर होते की बारगळते याचीच शंका होती. काही असले तरी आपण कोसबाडला जायचेच असे आम्ही ठरविले. म्हणून हे पाऊल टाकले होते. बोर्डीला मिळालेल्या अनुभवाच्या शिदोरीवर पुढील वाटचाल करायची होती.

राहुरी कृषि विद्यापीठाचे माजी कुलगुरू श्री० ह० गो० पाटील ऊर्फ अण्णा यांनी अत्यंत आग्रहाने आम्हाला बोलावून घेतले होते. तेव्हापासून आजतागायत श्री० अण्णा, श्री० जयंतराव पाटील व कृषिकेंद्र यांचे आमच्या संस्थेला सर्व बाबतींत मनापासून सहकार्य मिळत आहे.

कृषि संस्थेत श्री० जयंतराव यांच्या शेजारच्या घरामध्ये मला राहायला जागा दिली होती. त्याच्या शेजारच्या घरात आम्ही बालवाडी सुरू केली. त्या वेळी रस्ता, वीज, नळ वगैरे काहीच नव्हते. पाणी खालच्या विहिरीवरून डोक्यावरून आणावे लागे. आमचे गोपुरी संडास होतेच पण कृषिसंस्थेत म्हणजे अपेक्षेपेक्षा सोईस्कर जागेत आम्ही होतो. म्हणून सुखीच होतो.





## कोसबाडची बालवाडी

कोसबाडच्या आमच्या बालवाडीची सर्वांनाच नवलाई होती. मुले कोठेही खेळत असायची. आम्ही बोलवायला गेलो की आई म्हणायची, "बघा कुठे खेळत असेल. घेऊन जा." मग खजुरीच्या झाडाखालून, चिंचेच्या झाडाखालून, शेताच्या बांधावरून पळत जाऊन सापडतील तेथून मुले आणीत असू. त्यांना स्वच्छ करून घेणे हे तर ठरलेलेच. हस्तव्यवसाय, गाणी, गोष्टी, खेळ इ० कार्यक्रमांत मुले रंगू लागली. पण त्यांच्यात एकाग्रता कमी. सदा भटकायची सवय. एके ठिकाणी बसून ऐकणे, लक्षात ठेवणे माहीतच नाही. मग हिंडून-फिरून परिसर पाहणे, त्यावर गप्पा, गोष्टी, बडबडगीते, गाणी वगैरे रचून ती सांगणे, हा कार्यक्रम जोरात सुरू झाला.

याच अवधीत मी बरीच बडबडगीते लिहिली आहेत.

## चिंचांचा पाठ

एके दिवशी सगळी मुले कुठेतरी गुम झाली होती. मी शोधत गेले तर एका मोठ्या चिंचेच्या झाडावर काही मुले चढली होती. तेथून चिंचा फेकीत होती. खालची मुले गोळा करीत होती. एक मुलगी फांदीच्या अगदी टोकावर आली होती. "अग, पडशील ना!" असे मी म्हटल्यावर सारी मुले हसू लागली.

बऱ्याच वेळाने चिंचा पाडण्याचा व गोळा करण्याचा कार्यक्रम संपला.

"आपण बालवाडीत बसून चिंचा खाऊ या" असे मी म्हटले तसे मुलांना आश्चर्य वाटले. आनंद पण झाला. आम्ही सगळे आमच्या बालवाडीत आलो. मग मी सांगितले,

"चिंचा सगळ्यांना मिळाल्या पाहिजेत. म्हणून मध्ये ढीग घाला!" ढीग घातला. "हात धुऊन या!" धुतले. "चिंचा फोडायला दगड स्वच्छ करून आणा!" आणले. चिंचा फोडल्या, वाटल्या. चिंचोके गोळा केले. श्लोक म्हटला. मीठ लावून चिंचा खाण्याचा कार्यक्रम झाला. मी आणि विमल यात सहभागी होतो, हे सांगायला नकोच!

चिंचोके भाजून खाण्यासाठी घरी नेण्याचा मुलांचा विचार होता. येता-जाता असे चिंचोके ही मुले खात असायची. त्यात वाईट नाही. पण एकसारखे तेच खाऊन दात खराब झालेले होते. मग मी त्यांना चिंचोके मोजायला शिकविले. एकी-बेकी खेळ दाखवला. भरडायचे, कुटायचे, पीठ करायचे दाखविले. त्यामुळे चिंचोके खाण्याचे प्रमाण थोडे कमी झाले.

## बारशाचा सोहळा

आमच्या बालवाडीत मातीकाम, रंगकाम, शिवणकाम वगैरे कामे जोरात होती. ढेकळे फोडणे, माती चाळणे, विटा पाडणे ही कामे पण रंगत होती.

पुष्कळदा मुली कमी यायच्या. कारण दादूला (तान्हे बाळ) संभाळायचे असायचे! मग आमचे पाळणावर सुरू व्हायचे. पण मुलांची नावे ठेवलेलीच नव्हती. जन्मलेल्या वारावरून अगर मनाला येईल त्या नावाने मोठी मंडळी मुलांना हाक मारायची. तीच नावे रूढ व्हायची. उदाहरणार्थ, मंगळी, बुधी, शुक्री, वंशा, रडक्या वगैरे.

मग त्या वेळी एका मुलाचे बारसे केले. त्याचे नाव ठेवले 'विलास'. हा विलास नेहमी माझ्या अंगाखांद्यावर असायचा.

पुढे दरवर्षी त्या वर्षात जन्मलेल्या मुलांची आम्ही सामुदायिक बारशी करू लागलो. एकएका वेळी ३०।३५ मुलांची नावे ठेवीत असू. नाव ठेवण्याच्या समारंभास कोणातरी समाजसेविकेला आत्याबाई नावाने बोलावीत असू. आईची खण-खोबऱ्याने ओटी भरत असू, बाळाला अंगडेटोपडे आणि सगळ्यांना घुगऱ्या देत असू. फार आकर्षक असा हा सोहळा असायचा. बारा वर्षेपर्यंत हा उपक्रम चालू होता. आता आमची आदिवासी मंडळी स्वतःच सुरेख नावे ठेवतात. सामुदायिक बारशांची गरज राहिली नाही!

## कोसबाडची प्राथमिक शाळा

आमच्या विकासवाडी योजनेतील महत्त्वाचा भाग म्हणजे प्राथमिक शाळा. 'आदिवासी मुलांचे शिक्षण' आमच्या कामाचा मूळ गाभा. त्यासाठी कोसबाड, टेकडीवर चालत असलेली ठाणा जिल्हा लोकल बोर्डाची प्राथमिक शाळा शैक्षणिक देखरेखीसाठी आम्ही मागून घेतली होती.

## मुलींना शाळेत येत्या करणे हीच समस्या

या शाळेवर माझी देखरेख सुरू झाली. शाळेची वेळ ११ ते ५. एका मोठ्याशा कुडाच्या झोपडीत शाळा भरत असे. टेबल, खुर्ची, एक फळा, दोन पट्ट्या, घड्याळ, घंटा एवढे सामान शाळेजवळ होते. शाळा इ. ४ थी पर्यंत. पटसंख्या अडतीस. फक्त मुलगेच शाळेत येत असत. मुली नाहीत. पहिला आठवडा शाळेचे अवलोकन करण्यात घालवला. मुलांची उपस्थिती अत्यंत अनियमित होती. काल आलेला आज नाही, आज असलेला उद्या नाही. कुणी लवकर घरी निघून जायचे, तर कोणी उशिराच शाळेत यायचे. शाळेत आल्यावरही लहर येईल तेव्हा घरी एक फेरफटका करून यायचे. सक्तीच्या शिक्षणाचा कायदा अमलात आला होता. त्या दृष्टीने पहाणी होऊन अडतीस मुले पटावर नोंदली गेली होती. ही पटसंख्या जिल्हा बोर्डाकडून पहाणीच्या आधारे ठरवलेली. त्यात गुरुजी त्यांच्या परवानगीशिवाय कमीजास्त करू शकत नव्हते. पण वार्षिक सरासरी हजेरी फक्त नऊ होती. कित्येक मुले कधीच शाळेत आलेली नव्हती. मग गुरुजी आणि मी शाळेचे हजेरीपत्रक घेऊन घरोघर



हिंडलो. ३८ पैकी १४ मुलगे शाळेत येणारच नव्हते. कारण, काही कामधंद्या-निमित्त मुंबई, सुरत, बलसाड इकडे गेले होते. काहींची लग्ने होऊन ते एकदोन मुलांचे बाप झाले होते व घरीच मजुरीच्या कामाला लागले होते. आदिवासींना मुलांची जन्मतारीख सांगता येत नाही. त्यामुळे हा विनोद! काही मुले शाळेच्या वयाची असून शाळेत येत नव्हती. कारण मास्तर खूप मारतात. मग लहानशा ओट्यावर एका संध्याकाळी मी एक सभा घेतली. आता शाळेत कोणी मारणार नाही, म्हणून सांगितले. आता मी बाई शिक्षिका तेथे आहे. तरी मुलींना पण शाळेत पाठवा असा आग्रह धरला. "मुलींना शिकून काय करायचे?" हा त्यांचा प्रश्न होता. मला वाटते, इतर लहानसहान खेड्यांतून अजूनही हा प्रश्न विचारला जातो. आमच्या मागच्या पिढीतील भगिनींसाठी हा प्रश्न मुंबई-पुण्यासारख्या शहरांत सुद्धा होता. पालकांची समजूत घालून मुलींना शाळेत येत्या करणे हीच प्रथम समस्या ठरली.

## आदिवासींचा शब्दकोश फार लहान

माझे म्हणणे पालकांना पटले. शाळेत येऊ शकणार नाहीत अशी १४ नावे मी काढून टाकली व त्याऐवजी १४ मुलींची नावे घातली. पट कायम ठेवला. श्री. ठोंबरे गुरुजी भीत होते. बोर्डाची परवानगी हवी. मी त्यांना सांगितले, "ते तुम्ही आता माझ्यावर सोडा." आता शाळेची उपस्थिती बरीचशी सुधारली होती. मी मुलांच्या अभ्यासाकडे लक्ष दिले. इ. ४ थी पर्यंतचे वर्ग. पण कोणालाच र, ट, फ सुद्धा वाचता येत नाही! आता काय करायचे? "हा कोणत्या वर्गाचा विद्यार्थी आहे?" हा प्रश्नच मी डोक्यातून काढून टाकला! सगळ्यांना अगदी सुरुवातीपासून शिकवायचे आहे, ही खूणगाठ मनाशी बांधली. आणि आमच्या पूर्वप्राथमिक पद्धतीने शब्दशिडी, (जसे—मगन, छगन, जगन, मामा, नामा, दामा, काळी, माळी, बाळी याप्रमाणे) सर्व बाराखड्यांचे दोन अक्षरी, तीन अक्षरी, चार अक्षरी—नंतर आणखी मोठमोठे शब्द व लहान लहान वाक्यांचे धडे तयार केले. शक्यतो वस्तुपरिचय व त्यानंतर शब्द. आधी वाचन मग लेखन. पुष्कळसे वाचनपाठ मुलांच्या सहाय्याने त्यांच्या समोरच करून घेत असे. मग ते फळ्यावर लिहायचे, पाटीवर लिहून काढायचे. पुसलेले वाक्य काय असेल ते ओळखायचे. गोलावर पळत असताना टाळी वाजली की थांबून समोरच्या पाटीवरचा शब्द वाचून दाखवायचा. घर, दुकान, शाळा, वड, चिंच, नारळ, चिकू अशा शब्दांच्या मोठ्या अक्षरात चिठ्या तयार केल्या. त्या रोज सगळ्या ठिकाणी लटकावणे व संध्याकाळी काढून आणणे यासाठी मुलांच्या पाळ्या लागल्या. काव-काव, चिव-चिव, म्याव-म्याव, भू-भू हे परिचयातील पशुपक्ष्यांचे आवाज. त्यावरून खेळ घेतले. ते शब्द फळ्यावर लिहिले. ते वाचून घेतले. लिहून घेतले. अशा अनेक रीतींने प्रयत्न करून मुलांना वाचायची आणि लिहायची गोडी

लावली. आदिवासींचा शब्दकोश फार लहान आहे. त्यासाठी त्यांनी पुष्कळ पहायला हवे, करायला हवे, बोलायला हवे, ऐकायला हवे, हे लक्षात घेतले. जवळपासच्या लहानमोठ्या सहली आयोजित केल्या. मातीकाम सुरू केले. गप्पागोष्टी, गोष्टींची नाटके चालू झाली. येथे एक अनुभव नमूद करावासा वाटतो.

## हरवलेल्या बुवाची गोष्ट

आमच्या एकशिक्षिकी विशेष प्रशिक्षण योजनेतील ती गोष्ट आहे. कासा परिसरातील निव्वळ आदिवासी वस्तीत असणाऱ्या दहा शाळा आम्ही प्रयोगासाठी घेतल्या होत्या. प्रत्येक शाळेत मी एकच गोष्ट सांगितली. "एक हरवला बुवा." आदिवासी मुलांना एका जागी बसून गोष्ट ऐकायची सवय नसते. (२५ वर्षांपूर्वीचा हा अनुभव!) पण ही मुले लक्ष देऊन गोष्ट ऐकायची.

## मुलगा सापडला!

एका निवासी शाळेतील मुले गुरुजींना विचारून जंगलात चिंचा खायला गेली. जाताना गुरुजींनी मोजून सांगितले होते की सगळे परत या. ते होते बारा. संध्याकाळच्या सुमारास घरी परतताना मुले मोजणी करू लागली. मोजणी करणारा स्वतःला मोजत नव्हता. त्यामुळे एक कमी पडू लागला. दोघातिघांनी मोजून पाहिले. पण एक कमीच! तेव्हा ते रडत बसले. गुरुजी त्यांना शोधायला आले. रडण्याचे कारण विचारले. गुरुजींनी मनातल्या मनात मोजून पाहिले. मुले बरोबर होती. मुलांची मोजताना होत असलेली चूक त्यांना समजली आणि गोळा केलेल्या चिंचांच्या बदल्यात गुरुजींनी मुलगा सापडवून दिला! अर्थात त्या चिंचा मग सगळ्यांनी एकत्र बसून खाल्ल्या.

## अभिनय आहे. वाव हवा.

प्रत्येक ठिकाणी या गोष्टीचे नाटक करून घेतले. मुलांनी इतका उत्कृष्ट अभिनय केला की, मी थक्कच झाले. उड्या मारून चिंचा पाडणे, दगड मारणे, कुस्ती-मस्ती करणे, ओढ्यात एकमेकांना पाण्यात दाबणे, सगळे अभिनय अगदी तंतोतंत बरोबर. कित्येक गोष्टींची तर मला कल्पनाही नव्हती. दहाही शाळांतून हाच अनुभव आला. तेव्हा, आमच्या आदिवासी मुलांच्यामध्ये भरपूर अभिनय आहे. मात्र प्रगटीकरण करण्यास वाव पाहिजे.

आमच्या कोसबाडच्या शाळेत मी रोज गोष्ट सांगायची. रोज त्याचे नाटक व्हायचे. आता या ठिकाणी कोणता वर्ग ही मर्यादा नव्हती. सर्व एकत्र असायची. आमच्या गप्पागोष्टी व्हायच्या. त्यावरून वारली भाषेतील विशेष शब्दांची कल्पना यायची.



मुलांच्या भावना कळायच्या, त्यांच्या घरचे रीति-रिवाज व त्यांच्या विकासातील अडचणी लक्षात यायच्या. त्याप्रमाणे आपल्या शिकवण्याच्या पद्धतीमध्ये योजना करणे ठीक पडायचे.

## "अशा अनुताई सगळ्या आदिवासी शाळांतून हव्या आहेत!"

या मुलांचा शेतीशी संबंध जास्त. आई-वडील जास्त करून लोकांच्या शेतावर मजुरी करणारे. क्वचित स्वतःची शेती करणारे. तेव्हा त्यांचा संबंध शेतीशी आला पाहिजे. श्री. जयंतराव पाटील यांना विनंती करून मी एक भातखाचर मिळविले. बी पेरण्यापासून मुलांनी व मी काम केले. गादीवाफा, जपानी पद्धतीने लावणी, कापणी, झोडपणी, भात कांडणे व शिजवून खाणे येथपर्यंतची कामे आम्ही केली. सर्व कामांमध्ये मी मुलांच्या बरोबर असायची. आमचे ठोंबरे गुरुजीही असायचे. कृषिमधले कार्यकर्ते श्री. रामभाऊ राऊत यांचे संपूर्ण मार्गदर्शन होते. मुले आनंदाने काम करीत होती. या कामातून खणणे, मुठी देणे सारखे शब्द मला कळले. खणणे म्हणजे रोप उपटणे, मुठी देणे म्हणजे रोपांचा जुडगा लावण्यासाठी देणे. माझ्या कवितांतून व वाचन-धड्यांतून या शब्दांचा उपयोग करू लागलो. त्यामुळे असे धडे मुलांना अधिक जवळचे वाटतात.

भातशेतीचा हंगाम संपल्यावरही मिरच्या तोडणे आणि अशीच कामे श्री. जयंतरावांकडून मिळवली होती. मात्र नुसते काम करावयाचे नाही तर काय काम केले त्याचे वर्णन करून घ्यायचे. त्या अनुषंगाने गप्पागोष्टी घ्यायच्या व मुलांचे सामान्यज्ञान वाढवायचे! विशेषतः प्रगटीकरणाला संधी द्यायची. या वेळी मी एक अभिनयगीत तयार केले होते. **"गवत बेणु या"** (परिशिष्ट दोन). यामध्ये बी पेरण्यापासूनच्या सर्व भातशेतीच्या क्रिया आल्या आहेत. त्याआधारे एक कवायत बसवली. ही कवायत कै. आचार्य भिसे यांनी पाहिली व मला शाबासकी दिली. **"अशा अनुताई आम्हांला सगळ्या आदिवासी शाळांतून हव्या आहेत!"** हे त्यांचे उद्गार मी मनामध्ये अगदी कोरून ठेवले आहेत.

## मुलांची समयसूचकता

भाताची आवणी चालू असतानाची एक आठवण. आम्ही शेतात चिखलात उतरलो होतो. नऊ इंचांवर रोप लावण्याचे काम चालू होते. आणि खूप मोठा पाऊस आला. सगळे खाचरातून बाहेर निघालो. पण छत्र्या कुठे होत्या? आम्ही बावरलो. पण आमची मुले एकेका झाडाच्या बुंध्याला बिलगून बसली. पावसाच्या सपाट्याच्या माऱ्यापासून बचावलीही! थोडेसे भिजणे स्वाभाविक होते. आदिवासी मुलांची ही समयसूचकता त्यांच्या नेहमीच्या अनुभवातूनच अंगवळणी पडलेली पद्धत होती.

## माझे केव्हढे भाग्य !

निसर्गाच्या सान्निध्यात वावरणारी ही मुले भूगोलाच्या मांडीवर खेळतात. पण "भूगोल" या विषयाच्या नावाने बिचकतात ! येथेही "प्रात्यक्षिकांद्वारा शिक्षण" हे सूत्र अमलात आणले. अष्टदिशांवर आधारित कवायत व खेळ घेतले. कोसबाड-हून घोलवड व डहाणू, मुंबई वगैरे ठिकाणी घोड्यावर बसून, बैलगाडीतून, आग-गाडीतून व विमानाने जाण्याचे अभिनय झाले. बोर्डीच्या गुरुवारच्या साप्ताहिक बाजारास भेट झाली. स्टेशन दाखवले. पोस्ट ऑफिस, दवाखाना, कचेरी प्रत्यक्ष पाहिली. **उठावाचे मातीचे नकाशे अंगणात करून घेतले.** डहाणू तालुका, ठाणे जिल्हा, त्या वेळचा मुंबई इलाखा आणि भारत. पुढे आमच्या स्वतःच्या संस्थेतील शाळेच्या अंगणात असेच नकाशे करून घेण्यात आले होते. माननीय श्रीमती इंदिराजी (त्या वेळच्या काँग्रेस अध्यक्षा) या भारताचा नकाशा पहात असतानाचा फोटो आमच्याकडे आहे. त्या वेळी त्यांच्या बरोबर राहून नकाशा दाखविण्याचा मान मला मिळाला हे माझे केव्हढे भाग्य !

## मुलांनी गणितात गती घेतली

गणित विषयाचा असाच मोठा बाऊ होता. मुलांना अंक मोजता येत नव्हते. फार फार तर वीसपर्यंत जायचे. पुढे गाडे अडायचे. कारण पाचाचा पाचुंदा, विसाची कोडी हे त्यांच्या व्यवहारातील गणित होते ! भात पिकल्यावर टोपली टोपली भात देऊन आपल्याला लागणाऱ्या वस्तू बदलात घेणे, ही पद्धत पैशांशी फारसा संबंध ठेवणारी नव्हती. आला दिवस, गेला दिवस ! ते किती झाले ? वार, तिथी, महिना कशाशीच संबंध नाही ! सणांमध्ये अश्विन द्वादशी, संक्रांत, किंक्रांत व होळी एव्हढे सण माहिती. बाकी कुठलेच सण नाहीत. गावाला जाणे फारसे नाहीच. त्यामुळे फर्लांग, मैल वगैरेंची कल्पना नाही ! एकूण व्यवहारातच गणित कमी असल्यामुळे नुसत्या आकड्यांचा नाच डोक्यात बसत नाही. येथेही मी पूर्वप्राथमिक पद्धतीचा अवलंब केला. पाने, पिसे, बिया यांच्या सहाय्याने मोजणे, पानांचे, कडब्याचे दशक, शतक, हजार प्रत्यक्ष तयार करणे व त्यावरून उदाहरणे सोडवणे, स्वतः रचणे; कोंबड्या, बकऱ्या, भाताची पोती प्रत्यक्ष मोजणे व लिहिणे वगैरे कृतींतून उदाहरणे घेतली, ती मुलांना चटकन समजली. एकदोन झोपड्यांच्या भोवतालचे कुंपण दोरीने प्रत्यक्ष मोजले. मग ते किती फूट, किती इंच झाले ते काढले. झाडांच्या बुंध्यांची उंची फुटाने मोजली. आट्यापाट्यासाठी खेळाचे मैदान मुलांनी मोजून आखले. आजूबाजूची चिंचेची, वडाची, खजुरुची, नारळीची, आंब्याची, चिक्कूची, सागाची अशी झाडे मोजली. एकूण मोजण्याचे वातावरण तयार झाले. आदिवासी मुले कुशाग्र बुद्धीची असतात. त्यांनी गणित या विषयात सपाट्याने गती घेतली.



## सामुदायिक सहजीवनाची आवश्यकता

आदिवासी वस्ती लहान लहान पाड्यांतून असते. त्या पाड्यावर कोणीतरी एक मूळ पुरुष अगर मोठा पुढारी होऊन गेलेला असतो. त्याच नावाने पाडा ओळखला जातो—जसे, छाटाळ पाडा, करबट पाडा, मुसळ पाडा. एका पाड्यापासून दुसरा पाडा दोनतीन तरी फर्लांग दूर असतो. आर्थिक चणचण. त्यामुळे घरातील साधारण १० वर्षे वयाच्या मुलापासून म्हाताऱ्या आजोबा-आजीपर्यंत सर्वांनाच पोटासाठी काहीतरी कामधंदा करावा लागतो. त्यामुळे एकमेकांशी बोलणे, बसणे वगैरे कमी. एकमेकांच्या पाड्यावर जाणेयेणे तर फारच कमी. कधी लग्नप्रसंगी अगर एखाद्या मर्तिकाच्या वेळी एकत्र येतील तेवढेच ! त्यामुळे "सामुदायिक सहजीवन" हे जवळजवळ नाहीच. मुलांच्या बाबतीतही हाच अनुभव आला. दोन पाड्यांवरची मुले एकत्र बसायची नाहीत. तसेच मुले-मुलीही एकत्र बसायची नाहीत. "सामुदायिक सहजीवन" या गुणाचा विकास करण्याची आवश्यकता आहे, हे कळून आले.

शाळेत आल्यावरोबर हातपाय धुणे, केस विंचरणे या गोष्टी प्राथमिक शाळेतही ठेवल्या होत्या. कोणतीही वस्तू सगळ्यांनी वाटून घ्यायची व एकत्र बसून खायची याचा कटाक्ष होता. शाळेच्या खर्चात नाश्त्याची व्यवस्था नव्हती. तेव्हा हा खर्च म्हणजे पदरमोडच होता. पण आवश्यक म्हणून तो करायचाच. घरोघरी थोडाफार तांदूळ आला म्हणजे पाच पाच मुठी तांदूळ गोळा करून एकत्र भात शिजवायचा व एकत्र बसून खायचा. असेही उपक्रम झाले.

## संगे राहू संगे खाऊ !

या सगळ्या अट्टहासाचा एक गोड अनुभव मला पुढे कुरण शाळेत आला. आमच्या आदिवासी मुलांचा पक्षी मारून खाण्याचा आवडीचा उद्योग असतो. एकदा मी कुरण शाळेत पोचले तेव्हा मुलांची गोल पंगत बसली होती. पुढे वडाची पाने होती. आणि प्रत्येक पानावर चिंचोक्याएवढा पदार्थ होता. "संगे राहू संगे खाऊ" श्लोक चालू होता. मला गंमत वाटली. आनंद पण झाला. पदार्थ काय होता हे पाहिले तर लहानसा पक्षी मारून भाजला होता, त्याचे मांस होते. किती थोडे, पण ते सुद्धा सगळ्यांनी वाटून खाल्ले. मला समाधान वाटले.

पक्ष्यांना मारणे हा क्रूरपणा आहे. पण मूळचे हे लोक शिकारी, त्यामुळे नाइलाज आहे. आता पंचवीस वर्षांनंतर कोसबाड परिसरात ही प्रवृत्ती बरीच कमी झाली आहे.

एकूण, शाळेतील मुलांची बौद्धिक प्रगती निर्वेधपणे कशी होत राहील याचे सतत चिंतन व त्या अनुषंगाने माझे प्रयत्न चालू होते. मुलांना शाळेची गोडी लागली होती.

## प्रौढशिक्षण योजना

१९७९ साली निरक्षरतेचे निर्मूलन करण्याच्या दृष्टीने जोरदार मोहीम भारत सरकार-द्वारे सुरू झाली. आम्हीही ३० वर्ग चालवायला घेतले. पैकी १२ निव्वळ आदिवासी वस्तीत होते. आणि संवटक स्वतः आदिवासी बंधु-भगिनी होत्या. आमच्या प्रशिक्षणार्थी बालसेविकांनी या कामी सिंहाचा वाटा उचलला. प्रौढ-शिक्षण-साहित्य-निर्मिती हा माझा या वेळचा छंद होता. जोडाक्षरविरहित, जोडाक्षरसहित असे छोटेछोटे धडे लिहून ते वेगवेगळे छापून घेतले (परिशिष्ट सहा), कंदिलाच्या उजेडात वाचावयाचे प्रत्येकाच्या हातात वेगळा धडा मिळाल्याने सोपे होते. २३ चित्रांमध्ये सर्व मराठी मुळाक्षरे बसवली. आमच्या या प्रौढसाक्षर साहित्याला महाराष्ट्रात शासकीय व स्वयंस्फूर्त संस्थांकडून चांगला प्रतिसाद मिळाला. श्री० ज्ञा० अ० लोहार यांनी हे प्रौढशिक्षणवर्ग चालविण्याचे तंत्र व मंत्र चांगले आत्मसात केले. त्यांच्या अनुभवाविषयी ते रोज मजजवळ बोलत असत. अडचणी सांगत असत आणि मग विचारविनिमयातून नव्या युक्त्या निघत असत. कोसबाड परिसरातील पुष्कळ आदिवासी महिलांनी या योजनेचा फायदा घेतला.



## विकासवाडी अध्यापक विद्यालय

आमच्या विकासवाडी योजनेमध्ये, विकासवाडी चालविणारे शिक्षक तयार करणे, हा एक महत्त्वाचा भाग होता. त्या दृष्टीने १० जून १९५७ ला कोसबाडला विकासवाडी अध्यापन मंदिर सुरू झाले. (त्या वेळचे पी. टी. सी., आताचे डी. एड्.)

बालमंदिरे व बाल-अध्यापन-मंदिरे चालविण्याचा आम्हांला पुष्कळ अनुभव होता. पण प्राथमिक शिक्षकांसाठी अध्यापन मंदिर चालविणे हे अगदीच नवे काम होते. शासकीय अभ्यासक्रम राबवणे, वार्षिक परीक्षा, पाठ आदि गोष्टींमध्ये शासकीय तंत्र अमलात आणणे आवश्यक होते. शासनाकडून सर्टिफिकेट मिळाल्याशिवाय आमच्या प्रशिक्षणार्थींना पुढे काम मिळणे शक्य नव्हते. म्हणून वरील गोष्टी कटाक्षाने कराव्या लागल्या. त्याशिवाय आदिवासी क्षेत्रात प्राथमिक शाळा कशा चालवाव्या याचे विशेष शिक्षण आम्हांला द्यावयाचे होते.

ट्रेनिंग कॉलेज चालविण्याचे सर्व सरकारी नियम माहीत असणाऱ्या प्राचार्यांची आम्हांला जरूरी होती. बोर्डी येथील शासकीय ट्रेनिंग कॉलेजमध्ये काम करणारे श्री. रा. ह. कापडी यांचा आमचा परिचय झाला होता. त्यांची उसनी सेवा आम्ही मागून घेतली व त्यांच्या देखरेखीखाली कॉलेजचे काम सुरू झाले.

### मने जिंकायची होती

आदिवासी भागात टेकडीवर असणारे हे कॉलेज, येथे आपण शिकलो तर आपल्याला आदिवासी भागातच नोकरी करावी लागेल या भीतीने मंडळी आमच्या

कॉलेजमध्ये यायला तयार नसायची. आमचा मूलोद्योग शेती. तेथे कोण राबणार? ही एक भावना होतीच. फक्त पुरुषांचे ट्रेनिंग कॉलेज! नुसते बंधूच यावयाचे! तेही जिल्हा लोकल बोर्डामध्ये नोकरी केलेले! त्यांनी पाठविलेले! त्यामुळे जरा प्रौढ आणि एकदोन मुलांचे बाप झालेले असे असायचे! त्यांचे आर्थिक प्रश्न पुष्कळ जहाल होते. अशा अनेक कारणांनी आधीच नाराज असलेल्या मंडळींची मने आम्हांला जिंकून घ्यायची होती.

## अडचणी बिकट, उत्साह दांडगा!

त्यातून आमच्या इमारती अजून पूर्ण बांधून झाल्या नव्हत्या. पाणी टेकडीवर चढविण्याचे काम चालू होते. या अडचणींना सामोरे जायला आमची ही मंडळी नाखूष होती.

अडचणी जेवढ्या बिकट, तेवढा आमचा उत्साह दांडगा. हा आमच्या ताईंचा स्थायिभाव. त्यांचे आदेश पाळणे हा माझा स्थायिभाव! प्रशिक्षणार्थींना समजावणे, त्यांच्याबरोबर सतत रहाणे, "पायाचे दगड आहात, तुम्ही महत्त्वाचे शिल्प उभे करीत आहात," वगैरे सांगून त्यांना खुलविणे इत्यादि प्रयत्नाने मन वळविणे चालू होते. यातच एक अडचण, म्हणजे आमच्या प्राथमिक शाळेतील विद्यार्थ्यांची अनियमित उपस्थिती. प्रशिक्षणार्थींचे पाठ या शाळेमध्ये होत असत. वर्गात मुलांची संख्या अगदीच कमी असणाऱ्या मुलांना बोलके करणे कठीण! त्यामुळे प्रशिक्षणार्थी त्रस्त होत असत. मग मनोरंजक पाठ कसे घ्यावयाचे ते दाखविले. त्यासाठी परिसरास योग्य व प्रशिक्षणार्थींच्या अभ्यासक्रमात बसतील अशा पाठांची यादी तयार करण्याचा नवा उद्योग मला मिळाला. कृतिपाठाशी समन्वय साधून ज्ञानपाठ घ्यावयाचे असतात.

## काही कृतिपाठ

(१) **मातीची खेळणी करणे** : यामध्ये फळे, भांडी, जनावरे सर्व व्हायचे. पुढे पुढे झोपड्या पण झाल्या. त्यातून मग घरांचा देखावा, भातखाचराचा देखावा, खळ्याचा देखावा असे अनेक देखावे तयार झाले.

(२) **पानांचे प्रदर्शन मांडणे** : मुले रानावनात हिंडतात. त्यांच्याबरोबरच प्रशिक्षणार्थी विद्यार्थ्यांनीही हिंडावे हा एक कृतिपाठच. त्यामधून पुढे गोळा केलेल्या वस्तूंचे प्रदर्शन मांडणे हा दुसरा पाठ. अनेक आकारांची व प्रकारची लहानमोठी पाने गोळा करणे, त्यांची नीट मांडणी करणे, पानांच्या चिठ्ठ्या लावणे, पानामागे मुलांनी लपून बसून त्या त्या पानाची माहिती सांगणे. जसे, "मी आहे केळीचे पान, लग्नाच्या वेळी माझा मोठा मान" वगैरे. नंतर पानांची तोरणे करणे, भित्तिशोभा करणे वगैरे अनेक गोष्टी त्यातून निघतात.



असे अनेक कृतिपाठ परिसरातूनच काढले. मुले या पाठांत रंगून जायची. चांगला प्रतिसाद मिळायचा. मग आमचे प्रशिक्षणार्थीही रंगून जायचे!

## कुरणशाळा

गुरे चारणे म्हणजे वाईट काम नाही. ती घरची एक गरज आहे. तर ते काम करायलाच हवे. पण हे काम करता करतानाच काही शिकता आले तर तशी सोय का करू नये? हा विचार एके रात्री माझ्या मनात चमकला. आणि त्याचे रूपांतर कुरणशाळेत झाले! कुरणशाळा म्हणजे कुरणात गुरे चारावयाला जाणाऱ्या मुलांची कुरणातच शाळा चालविणे. या कामी त्या वेळचे प्राचार्य श्री० रा० ह० कापडी यांचे मला चांगले सहकार्य मिळाले.

रिमझिम पाऊस पडत असतो. गुरे इकडेतिकडे चरत असतात. जवळजवळ २५ ते ३० मुलेमुली या गुरांच्या राखणीसाठी तेथे असतात. काम थोडे. मंडळी जास्त. मग नुसतेच इकडेतिकडे हिंडणे, झाडावर चढणे, खेळणे वगैरे चालत असे. या मुलांना एकत्र करून गाणी, गोष्टी, कवायत, मैदानी खेळ, गोष्टींची नाटके, नकला वगैरे कार्यक्रम सुरू केले. मुलांची मने आकर्षित झाली. गप्पागोष्टींद्वारा स्वच्छता, नागरिकशास्त्र, भूगोल, गणित, भाषा, सृष्टीविज्ञान इत्यादी अनेक विषय शिकविता आले. अधूनमधून ओढ्यावर जाऊन सार्वजनिक आंघोळी होत असत. नखे काढणे, कपडे धुणे वगैरे कार्यक्रम तर होत असतच. एकदा ताईंनी सांगितले, "मुलांनी एकमेकांच्या हजामती करायला शिकावे." त्याप्रमाणे आम्ही साधने आणली. हजामतीचा उपक्रम सुरू केला!

कुरणशाळेत काम करताना मला फार फार आनंद होत असे. शैक्षणिक साधने जिकडेतिकडे विखुरलेली मला दिसायची. खेळकर, मनमोकळ्या मुलांच्या शिक्षणातील अडचणी सहज कळायच्या. त्यांवर उपाय सुचायचे.

झाडाची सावली खुंट्या ठोकून मोजली. बकऱ्यांचे संमेलन झाले. बकऱ्यांच्या बाळांची बारशी झाली. त्याद्वारे दिवस, महिना, वर्ष वगैरे कालगणनेची कल्पना देता आली.

दगडाच्या वजनावरून माणसाचे वजन व त्यावरून एकूण आरोग्याकडे मुलांचे लक्ष वळवता आले. पाने, फुले, बिया, काटक्या, पिसे, बरटी ही सगळी गणित, भाषा, भूगोल, सृष्टिनिरीक्षणाची विनामूल्य पण बहुमोलाची साधने जिकडून तिकडून मला हाका मारीत होती. आम्ही पानांचे दशक, शतक, हजार केले. त्यावरून संख्यारचनेची कल्पना दिली. तोंडी हिशेब, बडबडगीते, अभिनय गीते तेथल्या तेथेच तयार व्हायची.

कुरणशाळेतील मुलांनी साप मारून झाडाला टांगला होता. तो निर्भयपणा आणि

अर्धमेल्या टांगलेल्या सापाच्या त्या लहरी अजूनही माझ्या डोळ्यासमोर आहेत!

पळत्या जनावरांच्या शेपट्या पकडून त्यांच्या मागे पळणाऱ्या या मुलांना आट्या-पाट्या, खो खो, हुतूतू हे खेळ आवडायचे, यात काहीच नवल नव्हते.

कुरणशाळेत अशा प्रकारे मी रंगून गेले होते. ट्रेनिंगच्या मुलांचे कृतिपाठ व ज्ञानपाठही येथे लावले. साधारण चार महिन्यांचा अभ्यासक्रम लिहून काढला. हे सर्व चालू असताना नेहमीच ताईंशी गप्पा व्हायच्या. त्यांच्याकडून काही सूचना मिळायच्या. त्या आता जाऊन-येऊनच कोसबाडला होत्या. कारण त्यांना फंडाच्या मागे लागावे लागत होते.

कुरणशाळेच्या कामाबाबत मी रोजनिशी लिहीत असे. एक दिवशी काय मनात आले आणि सर्व अनुभव एकटाकी मी लिहून टाकले. ताईंना ते फार आवडले. त्यांनी माझ्या प्रत्येक उपक्रमाखाली स्वतःची तात्त्विक भूमिका लिहिली. असे हे आमचे 'कुरणशाळा' हे हस्तलिखित मराठीतून तयार झाले. ताईंनी त्याचे इंग्रजी-करण केले. श्री० जे० पी० नाईक यांना दाखविले. त्यांनी ते भारत सरकारद्वारा प्रकाशित करण्यास मदत केली. ताईंचे हे 'मेडोस्कूल' हे पुस्तक फारच प्रसिद्ध आहे.

असे सांगतात की, ताईंना 'पद्मभूषण' हा गौरव या उपक्रमामुळेच मिळाला.

अशी ही कुरणशाळा! हळूहळू इतर कार्यकर्त्यांनीही यात भाग घेतला. कारण एका वेळी चार-पाच ठिकाणी त्या चालत असत. माझे संस्थेचे काम वाढले तेव्हा देखरेख आणि मार्गदर्शन एवढेच काम माझ्याकडे आले. आमच्या सर्व बालवाडी-शिक्षिका, प्राथमिक शाळेचे शिक्षक, आणि श्री० राम कदम, श्री० लोहार वगैरे कार्यकर्ते यांनी कुरणशाळा चालविण्याचे अनुभव घेतले आहेत.

आता कुरणशाळेची गरज संपल्यामुळे फक्त नमुन्यादाखल एकदोन महिने एक कुरणशाळा चालवली जाते.

### बोर्डीहून कोसबाडला

आमच्या शाळेत इ० चौथीपर्यंतची मुले होती. पण सगळ्यांनीच मुळाक्षरा-पासून सुरवात करायला हवी, हे माझ्या लक्षात आले. मग आमच्या पूर्वप्राथमिक शिक्षणपद्धतीचा उपयोग करून अक्षर, गणित शिक्षण सुरू केले. भूगोल, सृष्टि-निरीक्षण या विषयांना तर येथे भरपूर वाव होता. अंगणात उठावाचे नकाशे केले. भातशेतीवर कवायत बसविली. तांदळाच्या भाकरी केल्या. शेतावर जाऊन प्रत्यक्ष पेरणी, लावणी, कापणी, झोडपणी, भाताची रास घालणे ही कामे केली. आम्ही दोघी या सर्व कामांमध्ये मुलांच्या नेहमी बरोबर असायच्या. श्रीमती सुलभाताई पाणंदीकर, श्रीमती गंगूताई पटवर्धन यांनी या वेळच्या आमच्या कामाबद्दल आम्हांला खूप शाबासकी दिली आहे. अशी एकूण पूर्वतयारी होत होती. तोपर्यंत



विकासवाडी योजना मंजूर झाली व १० जून १९५७ रोजी सगळी संस्था बोर्डीहून कोसबाडला आली.

### विकासवाडी प्रकल्प—पहिला टप्पा

आदिवासी मुलांच्या शिक्षणाचा प्रश्न सोडविण्यासाठी कै० ताईंनी विकासवाडी प्रकल्प तयार केला. अनेक अडीअडचणींतून शेवटी तो मंजूर झाला व बोर्डीची सर्व संस्था कोसबाडला हलविण्यात आली. बोर्डीला एक बालवाडी चालू ठेवायचा विचार होता. पण त्या वेळी वाहनांच्या सोयी नव्हत्या. देखरेख करणे कठीण जाईल असा एकूण अंदाज घेतला व तो विचार सोडून दिला.

विकासवाडी प्रकल्पात पाळणाघर, बालवाडी, प्राथमिक शाळा, एकत्र चालणारी विकासवाडी, व ही विकासवाडी कशी चालवावी याचे प्रशिक्षण देणारे ट्रेनिंग कॉलेज यांचा समावेश होता. विकासवाडी अजून स्थिरस्थावर व्हायची होती. त्यामुळे नुसत्या याच प्रशिक्षणासाठी विद्यार्थी मिळणे व खर्चाची व्यवस्था होणे अवघड होते. म्हणून ट्रेनिंग कॉलेजच मान्य करून घेतले होते. सरकारमान्य अभ्यासक्रम, परीक्षा, पाठ वगैरे सर्व होणारच; शिवाय 'आदिवासी मुलांचे शिक्षण' या विषयाचा विशेष अभ्यास होईल, अशी या एकूण प्रकल्पाची विचारधारा होती.

### रात्रीची स्वयंभू शाळा

मुलांना स्वच्छता आणि जीवनव्यवहार शिकविण्यासाठी परिसरातीलच शैक्षणिक साधने कशा प्रकारे आम्ही निर्माण केली, हे मी यापूर्वीच सांगितले आहे. शैक्षणिक साधनांप्रमाणेच परिसरास जुळतील अशाच तऱ्हेची बडबडगीते, गाणी आणि गोष्टी आम्ही लिहीत होतो. सांगत होतो. गात होतो. त्यांपैकी दोन बडबडगीते तुमच्यापुढे ठेवते.

१. हाट पवळ्या हाट
बाजाराची वाट
बाजाराला कोण गेले ?
बाबा अन् आई !
घरी कोण राहिले ?
दादू अन् बाई !

२. बाबा काय करतात ?
शेत नांगरतात.
आई काय करते ?
झोपडी शिवते.
रामा काय करतो ?
गाय चारतो.
वनशी काय करते ?
पाणी भरते.
दादू काय करतो ?
गोधडीवर खेळतो.

मुलांना शाळेत येती करण्याकरता आणि शिकती करण्याकरता त्यांच्या घरोघर जाऊन त्यांना मी गोळा करीत होते. एके दिवशी एका मुलाने म्हटले, "आम्हांला दिवसा वेळ नाही. रात्री शिकवशील का ? तू रात्री बोलावलेस तर आम्ही येऊ." मी "हो" म्हटले. त्या रात्री तो मुलगा इतर २०–२५ मुलांना घेऊन आमच्या घरी आला. आणि अशा प्रकारे आमची स्वयंभू रात्रशाळा सुरू झाली !

## "एकूचा धडा दे ना !"

आमच्या रात्रीच्या शाळेस वेळेचे काही बंधन नव्हते. अंधार पडू लागला की मुले यायला लागायची. त्या वेळी त्यांच्याजवळ बॅटरी नव्हती. सरमाड्यांच्या काड्यांच्या जळत्या पलित्यांचा उजेड ! हसत-खेळत मंडळी जमायची. मी व विमल मुले आली की सेवेला तयार ! हातची दुसरी कामे सोडून द्यायची. आमच्या लहानशा ओटीवर या शाळेचा धुडगूस चालायचा. कारण शाळेत नीटपणे बसून अभ्यास करायचे या मंडळींना माहीतच नाही ! खूप हसायचे आणि खूप लाजायचेसुद्धा ! तेव्हा यांना स्थिर करण्यासाठी गोष्टी सांगणे व त्यांची नाटके करून घेणे हा पहिला कार्यक्रम ठरला. वयाने खूप मोठ्या असणाऱ्या या मुलांसाठी अगदी बालवाडीतील "पळ रे भोपळ्या टुणूक टुणूक" सारख्या गोष्टीही उपयोगात आल्या. 'लांडगा आला रे आला,' 'एक हरवला बुवा,' 'पैशाची पेटी' ही नाटके अगदी प्रिय झाली होती. 'ऐलोमा पैलोमा', 'मामाची रात्र', 'किती वाजले ?' हे आवडते खेळ होते. त्यानंतर तारफा नाच रात्री बारा-बारा वाजेपर्यंत चालायचा. आमची विमल पण त्यांच्या बरोबरीने नाचायची. असा हा धांगडधिंगा चालायचा.



अशा रीतीने रात्रीची शाळा चालू होती. एक दिवस मुलांनीच सांगितले, "एकूचा धडा दे ना !" त्यांच्याकडूनच मागणी आल्यामुळे मग लेखन, वाचन, गणित आदी शालेय विषयांस सुरुवात झाली. पण हे विषय अतिशय सोप्या, मनोरंजक रीतीने व कृतीद्वारा घेतले जात होते.

## मुलींचा तांडा आला !

रात्रीची शाळा धूमधोकार चालू होती. आणि एक दिवस बारा मुलींचा तांडा आला. खूप आनंद झाला. सुमारे ५० मुलामुलींची ती रात्रीची शाळा आणखीच दुमदुमू लागली. हास्याचे फवारे उडू लागले. नृत्य, बालनाटके यांमध्ये अधिक रंग भरला. मुलींच्या लोकगीताला भरती आली होती. आणि आम्ही दोघी या उत्साहाच्या लाटेवर तरंगत होतो. मधूनमधून ताईंचा मुक्काम असायचा. रात्रीच्या शाळेने त्यांची खूप करमणूक व्हायची. त्यावरून आणखी काही महत्त्वाच्या सूचनाही त्या करीत असत.

## भाकऱ्या तुटेचनात !

एकदा आम्ही उंबरगावची सहल आयोजित केली. बरोबर नेण्यासाठी तांदळाच्या पिठाच्या भाकऱ्या केल्या. मुलींना चुलीवर तवा ठेवणे आणि भाकरी थापणे, या दोन्ही गोष्टी माहीतच नव्हत्या ! तेव्हा भाकरी-पोळी करायला व खायला शिकविणे हाही एक उद्देश होताच. रात्री बारा-एक वाजेपर्यंत जागून गाणी म्हणत, हसत, खेळत भाकऱ्या भाजल्या. उंबरगावला आम्ही बैलगाडीनेच गेलो. खाडीवर जाऊन आलो. आणि ताजा फराळ करायला बसलो. तेथे ताजी रस्साभाजी केली होती. काय गंमत, भाकऱ्या दाताने तुटेचनात ! तांदळाच्या भाकऱ्या गरम गरमच खाव्या लागतात, हा एक नवीन धडा त्या वेळी मला मिळाला !

## आनंदी पाव्हणेरे

रोज कोणी ना कोणी रजा असायचे. चौकशी केली म्हणजे मुले म्हणायची, "आज त्यांना उपास आहे." या मंडळींना राम, कृष्ण माहीत नाही. एकादशी, चतुर्थी, शनिवार—कशाचीच कल्पना नाही. तेव्हा मग उपास कसले ? आश्चर्य वाटले. तेव्हा कळले की घरात काही खायला नाही म्हणून उपास ! त्या दिवशी थंडगार पाणी पिऊनच मंडळी झोपतात ! फेब्रुवारीपासून नवा तांदूळ निघेपर्यंत अशी ही उपासमार अगर अर्धपोटी जेवण चालू असते. आईबापांचे उपास आधी चालू होतात. असेल तेवढी आंबील, कांजी वगैरे मुलांना खायला द्यायची. आणि पुढे त्यांचेही उपास सुरू ! असे असले तरी मंडळी आनंदीच. लांबट, दुःखी चेहरा

कोणाचाच नाही. कधीकधी कळायचे की, "अमका तमका पाव्हणेरा गेलाय." पाव्हणेरा म्हणजे काय? तर नातेवाइकांपैकी ज्यांच्याजवळ अजून थोडेफार खायचे असेल तेथे पाव्हणे जाणे. अर्थात अगदी जवळच्या नातेवाइकांकडेच पाव्हणे जायचे. त्यांच्याकडेच संपले म्हणजे पुन्हा उपाशी!

### दारिद्र्याचे दर्शन

एकदाच भाताचे पीक निघायचे. शेती तुटपुंजीच. बहुधा कोणाकडे तरी मजुरीनेच काम करायचे. ते पण बारा महिन्यांचे नाहीच. भात पिकेल तेव्हा खूप खूप खाऊन घ्यायचे. टोपल्या, मडकी, सूप अशा वस्तूसुद्धा तांदळावरच घ्यायच्या. वस्तूंच्या किंमतींचा काही अंदाज नाही. भातशेतीचा हंगाम संपला की, डोंगरातून लाकडे व पळसाची पाने आणून विकणे! अशा तुटपुंज्या मिळकतीवर पुढचे दिवस काढायचे. त्यात दारूला पैसे जायचेच. अशा परिस्थितीत पोटभर खायला मिळणे नाही; मग अंगभर कपडा आणि सामानसुमान कुठले? सावकाराकडून आगाऊ खावटीसाठी भात घ्यायचा, तो पिकला म्हणजे सवाईने परत करायचा. आधी थोडा पिकणार. त्यातून सावकाराला खावटीचा भात परत केल्यावर यांच्याजवळ किती राहणार? गवतकापणीपोटी आगाऊ पैसे सावकाराकडून घ्यायचे; मग प्रत्यक्ष गवतकापणीच्या वेळी सावकार सांगेल त्या दराने गवत कापून द्यावे लागे. अशा या भयानक आर्थिक स्थितीचे खरेखुरे दर्शन रात्रीच्या शाळेमुळेच झाले.

### प्रामाणिकपणा

आम्ही आमच्या लहानशा शेतात भात पिकवले होते. किती एकर कल्पना नाही, पण ५० पोती भात झाला होता. तो सर्व मी खावटीपोटी येथील पालकांनाच दिला. चिठ्ठीचपाटी काही नाही. पण आनंदाची आणि नमूद करण्याची गोष्ट म्हणजे सर्वांनी स्वतःचा भात पिकल्याबरोबर आमचा नेलेला भात परत आणून दिला! ते सवाईने देत होते, पण मी जेवढा दिला होता तेवढाच घेतला.

### जेवणाचा कार्यक्रम

येथील लोकांशी अधिक संपर्क येण्यासाठी म्हणून १९५७ साली आमची सर्व संस्था येथे आल्यावर एक उपक्रम मी केला होता. सगळ्यांच्या घरी भात तयार होऊन आला होता. त्या वेळी रात्रीच्या शाळेतील विद्यार्थ्यांपैकी रोज एका विद्यार्थ्यांच्या घरी जेवायला जायचे. "तुम्ही खाता तेच मला वाढा. नवीन काही करायचे नाही." असे बजावून सांगितले होते. तरी पण माझ्यासाठी एक आण्याची तुरीची डाळ आणून वरण व्हायचेच. तेलाची फोडणी घालायचे यांना माहितच नव्हते. पण भोपळ्याच्या वेलाची पाने, आंबाडीची पाने वरणात असायची. भाताचे व वरणाचे पातेले वगैरे जे असेल ते माझ्यापुढे ठेवायची. एखादी थाळी, लोटी असायची. ती स्वच्छ धासून माझ्याकडे ठेवायची. बसायला पोते नाहीतर लहानशी पाटली. ही मंडळी स्वतःच सुतारी काम करून जात्याच्या पाळ्या, पायातल्या खडावा, बसायला लहानशा पाटल्या तयार करतात. घराला वासे ठोकण्याची कामेही स्वतःच करतात.



मी एकटीच जेवणार. घरातली सगळी मंडळी माझ्या आजूबाजूला उभी राहून कौतुकाने बघणार. मग मी खूप आग्रह करायची—"माझ्याबरोबर तुम्ही पण बसा." नाही-हो करता करता शेवटी घरवाला तयार व्हायचा. आपण अगदीच फुकट कसे जेवायचे म्हणून मी एक लहानशी साखरेची पुडी बरोबर घेऊन जात असे. माझा संध्याकाळचा घरोघरी जाऊन जेवण्याचा हा कार्यक्रम सव्वा महिना चालू होता. काही ठिकाणांहून बोलावणी यायची, तर काही ठिकाणी मी आपणहून सांगून जात असे.

### ताईंच्या माहेरवाशिणी

या कार्यक्रमाचा समारोप मोठा मजेदार झाला. ताई म्हणाल्या, "ही मंडळी पाव्हणेरी जातात तशी आपल्याकडे या बायकांना पाव्हणे म्हणून बोलावू या माहेरी!" माझ्या घरी! झाले. तीन दिवसांचे शिबिर ठरले. दोन रात्री व तीन दिवस. घरोघर आमंत्रणे गेली. रात्रीचा स्वयंपाक—भात, आमटी, भजी. ५० माणसांचा स्वयंपाक तयार झाला. कंदिलाच्या उजेडात बायका-मुले जेवायला बसली. आमच्या रात्रीच्या शाळेतील मोठ्या मुलींनीच हा स्वयंपाक केला होता. आता रात्री येथेच झोपायचे. चटया अंथरून दिल्या. मुलांना झोळया बांधून दिल्या. सगळ्या माहेरवाशिणींना झोपवून रात्री ११ वाजता मी परत आमच्या खोलीवर आले.

दुसऱ्या दिवशी सकाळी चहा होणार होता. शिकेकाई व गरम पाणी घेऊन रास-न्हाणी होणार होती. मग गप्पागोष्टी होणार होत्या. कैनाडहून श्रीमती कुसुमताई नारगोळकर मुद्दाम या कार्यक्रमासाठी येणार होत्या. पण सकाळी बघितले तर सगळे सामसूम! बायका घरी निघून गेलेल्या. आता काय करायचे? मी म्हटले,

"आता स्वयंपाक तरी कसा करायचा?"

मोठया मुली म्हणाल्या,

"ताई, जेवायला सगळ्या येतील! घरातल्या कामासाठी निघून गेल्या आहेत."

तसेच झाले! जेवायला पुन्हा ५० पान झाले. मग जेवण झाल्यावर आम्ही त्यांना बळजबरीने ठेवूनच घेतले. कुसुमताईंनी काही गोष्टी सांगितल्या. मग आदिवासी

भगिनींना गाणी म्हणायला सांगितले. लाजत लाजत त्या गाणी म्हणू लागल्या. त्यांना आज खूप खूप आनंद झाला होता. ताईंनी आपल्याला माहेरवाशिणी म्हणून जेवायला बोलाविले, या आनंदात त्यांनी गाणी म्हटली. त्यांतले एक गाणे असे होते—

"ताराताई माजली (ताराताई फार दारू प्याली),
ताराताईला शिपायाने पकडून नेले
अनुताई रडू लागली.
ताराताईला सोडवून आणले,
अनुताई हसू लागली!"

आम्हांला या गाण्याची मजा वाटली. त्यांच्या जीवनातले गाणे. आपल्या आवडत्या माणसाचे नाव घालून नेहमी हे गाणे म्हणतात म्हणे!

## किसानशाळा

ही रात्रीची शाळा विकसतच गेली. अजूनही चालू आहे. रात्रीच्या शाळेसाठी ठराविक उपस्थिती वगैरे ठेवली नव्हती. कधी कधी ५० संख्या असायची तर कधी कधी ५।६ पण असायची. खंड मात्र पडू दिला नाही. पुढे पुढे दिवसाच्या शाळे-प्रमाणेच वार्षिक परीक्षा ठेवल्या. त्यातून बारा जण सातवी पास झाले. पैकी चौघी मुलींनी बालसेविका प्रशिक्षण घेतले व त्यांपैकी तिघी चांगल्यापैकी बालवाडी शिक्षिका आहेत. एक मुद्रणालयात काम करते. मुलगेही कुठे कुठे शिपाई व अन्य कामास लागले आहेत. रात्रीच्या शाळेची कामे ग्रा० बा० शि० केंद्राच्या जवळजवळ सर्वच कार्यकर्त्यांनी विनावेतन केली आहेत. श्री० वसंतराव पाटील, सौ० आशा पाटील, श्रीमती सिंधुताई अंबिके यांनी या शाळेला विशेष स्वरूप दिले आहे. सध्या या शाळेचे 'किसानशाळे'त रूपांतर झाले आहे. शिवाय डोंगरीपाडा येथे दुसरी किसान-शाळा चालू आहे. या दोन्ही शाळांना ७८ सालापासून थोडेसे अनुदान मिळू लागले आहे.

अशी ही आमची रात्रीची स्वयंभू शाळा. घंटा, वेळापत्रक, परीक्षा या कशाचेच बंधन नसलेली ही शाळा! मुक्त अनौपचारिक शिक्षण देणारी, धूमधोकार चालणारी! रात्री अकरा-बारा वाजेपर्यंत आमच्या ओटीवर नाच, गाणी, गोष्टी यांनी धुमाकूळ माजवणारी! शिक्षक-विद्यार्थ्यांना मुक्त आनंदाने नाचवणारी! पुष्कळ चढउतार पाहिलेली, पाहत असलेली, आमची रात्रीची शाळा आमची फार आवडती आहे.

आमच्या शेजारीच श्री० जयंतराव पाटील राहत होते. मला नेहमी संकोच वाटायचा. रात्रीच्या शाळेच्या धांगडधिंग्याने त्यांना त्रास होतच असणार! म्हणून एकदा मी त्यांना म्हटले होते,

"तुम्हांला आमचा खूप त्रास होत असेल—"

"मुळीच नाही! उलट आमची करमणूक होते!" जयंतराव म्हणाले होते.



## आदिवासींची देवते

कृषि संस्थेच्या शेजारच्या टेकडीसह १७ एकर जमीन विकत घेतली. ५६ सालच्या दसऱ्याला माननीय सुलभाताई पाणंदीकर व श्रीमती गंगूताई पटवर्धन यांच्या हस्ते स्वतःच्या जागेत विकासवाडीची पाटी उभी झाली. या दोघींच्या हातां-बरोबर माझाही हात पाटीला लागला होता हा माझा एक बहुमानच होता. टेकडीवर इमारतींचे बांधकाम आणि खाली विहिरीचे बांधकाम व जमिनीच्या मशागतीचे काम चालू होते. पुष्कळ मजूर कामावर असायचे. संध्याकाळची सामु-दायिक प्रार्थना घेऊन काही गोष्टी सांगाव्या असा मी बेत केला. पण कामावरून सुटल्यावर कोणी थांबायला तयार नसायचे. इमारती बांधकामाचे कॉन्ट्रॅक्ट होते. विहीर आम्हीच खोदीत होतो. जवळजवळ ५० स्त्री–पुरुष कामावर होते. अर्धा तास आधी काम थांबवून मी या मंडळींना तेथेच गोळा करायची. प्रार्थना घ्यायची व गोष्टी सांगायची. रामाच्या गोष्टी, कृष्णाच्या गोष्टी, शिवाजीच्या गोष्टी अशा कितीतरी गोष्टी सांगितल्या. प्रार्थनेसाठी अगर गोष्टी ऐकण्यासाठी एकत्र जमून बसायला मंडळी तयार नसायची. दोन-दोन चार-चार अशा समुदायाने विखरून बसायची. इतकेच काय पण सगळ्यांची तोंडे माझ्याकडे असतीलच असे नाही! तसाच जिद्दीने मी माझा उपक्रम चालू ठेवला. हळूहळू मंडळी एकत्र बसू लागली. लक्ष देऊन ऐकू लागली.

आदिवासींना राम, कृष्ण माहीत नाही. त्यांचे देव वाघ्या, नारायण, हिमायदेवी. वाघ्या गावचे संरक्षण करीत गावाच्या बाहेर उभा राहतो. लाकडावर कोरलेली ही मूर्ती असते. नारायण अगर हिरव्या देवाची पूजा भाताचा हंगाम संपल्यावर होते. त्याचा काही ठराविक विधी आहे. जागरण असते. सोंगे काढली जातात. नकला होतात. हिमाई म्हणजे पार्वती. तिचीही पूजा नारायण देवाबरोबरच होते. यांच्या या सर्व कार्यक्रमांत मी सहभागी होत असे.

## ताईंचा पाठिंबा

विहिरीचे काम संपले. इमारती थोड्याफार तयार झाल्या. आणि सर्व संस्था कोसबाडला आली. हे पहिले दिवस कार्यकर्ते व विद्यार्थी यांना फारच गैरसोयीचे गेले. पाणी शेजारूनच आणावे लागे. रस्ते नाही, वीज नाही, वाहनाची सोय

नाही, पिठाच्या गिरण्या, घोलवड–डहाणू भागातला सगळा बाजारही असाच चार-पाच मैलांच्या अंतरावर. पैशांची चणचण नेहमीचीच. पण आमच्या सुदैवाने सर्व कार्यकर्ते प्रयोगाचे महत्त्व समजून सर्व अडचणींना तोंड देणारे मिळाले होते. जिल्हा लोकल बोर्डाकडून आलेल्या प्रशिक्षणार्थींनी समस्या उभ्या केल्या होत्या. मुख्य रोख माझ्यावरच असावयाचा. पण कै० ताईंच्या भक्कम पाठिंब्यावर मला तो सहन करता आला.

आमची बालवाडी, प्राथमिक शाळा यांचा हळूहळू विकास होत होता. आता हे दोन्ही विभाग आमच्या इमारतीत आले होते. प्री-पी० टी० सी० व पी० टी० सी० दोन्ही विभागांचीही प्रॅक्टिसिंग स्कूल्सच होती. त्यामुळे आता या दोनही विभागांचा विकास अधिक झपाट्याने होणे जरूर होते.

# विशेष प्रशिक्षण योजना

आदिवासी भागात प्राथमिक शिक्षणाची हेळसांड होत आहे, त्याचा सर्व दोष शिक्षकांच्या माथी मारणे बरोबर नाही. तेथे काम करीत असताना येणाऱ्या अडचणी व त्या कशा सोडवाव्या, याची कल्पना शिक्षकांना कोणी तरी दिली पाहिजे. त्यांच्या व्यक्तिगत अडचणींकडे लक्ष दिले पाहिजे. ताई म्हणत, "शंभरांतले दहा शिक्षक जरी कार्यतत्पर निघाले, तरी आमचा प्रयोग यशस्वी झाला, असे मी मानीन."

आमच्या विकासवाडी प्राथमिक शाळेमध्ये या दृष्टीने प्रयत्न चालू होते. रात्रीची शाळा, कुरण शाळा, उद्यानवर्ग, शाळेस जोडून उद्योग देणे वगैरे गोष्टींमुळे मुलांना शाळेची गोडी लागत होती.

ही मुले रानावनांत भटकणारी! एकाजागी बसून काही ऐकायचे, पहायचे, लक्षात ठेवायचे आणि पुनः योग्य वेळी प्रगट करायचे, ही त्यांना सवयच नाही! अक्षर फार चांगले. फळ्यावरचे पाहून लिहिण्याची हौस! त्या वेळी धडाधडा वाचून सुद्धा दाखवायचे. पण थोड्या वेळाने काही नाही! "विसरलो!" म्हणजे "विसरलो"! मुले बुद्धिवान आहेत. चाणाक्ष आहेत. पण एकाग्र नाहीत. त्यांना स्थिरबुद्धी करणे, एकाग्रतेने ऐकणे, पहाणे, वाचणे, करणे याची सवय लावणे हा आमच्या विकासवाडी प्रा. शाळेचा सतत प्रयत्न होता.

आमचे प्रशिक्षणार्थी हे सर्व पहात होते. आमच्या प्रयत्नात सहभागी होत होते. तरी त्यांचे विशेष लक्ष त्यांच्यासाठी असणाऱ्या सर्वसामान्य अभ्यासक्रमाकडेच जास्त होते. या मंडळींनी आदिवासी व ग्रामीण भागात उत्कृष्ट काम करावे अशी आमची

महत्त्वाकांक्षा! म्हणून त्यांच्यासाठी एक विशेष प्रशिक्षण योजना चालू केली.

**वांद्रेकर** योजनेप्रमाणे आदिवासींच्या लहान लहान खेड्यांमध्ये शाळा निघाल्या होत्या. त्यांना उद्बोधन देण्यासाठी काशा-सर्वोदय-केंद्रामध्ये कै. श्री. आचार्य भिसे यांच्या मार्गदर्शनाखाली दीड-दीड महिन्याचे उद्बोधनवर्ग होत होते. पण ही मुदत फारच अल्प आहे. त्यापेक्षा या विषयाचा प्रशिक्षणकाळातच दोन वर्षे थोडा थोडा पण सतत अभ्यास करीत गेल्यास जास्त फायदा होईल, ही गोष्ट ताईंनी शासनाला पटवून दिली. आचार्य भिसे आमच्या संस्थेचे अध्यक्ष होते. त्यांनी ताईंची कल्पना उचलून धरली, आणि १९६४ साली महाराष्ट्र शासनाच्या मंजुरीने आणि एन्. सी. ई. आर्. टी. च्या मदतीने विशेष प्रशिक्षण योजना ट्रेनिंग कॉलेजमध्ये ("ओरिएंटेशन ट्रेनिंग प्रोग्रॅम") सुरू झाली.

योजना कार्यान्वित करण्याची मुख्य जबाबदारी ओघाने माझ्याकडे आली. अभ्यास-क्रमामध्ये तात्त्विक व प्रात्यक्षिक असे दोन भाग होते. महाराष्ट्रातील आदिवासी जीवनाचा अभ्यास, त्यांच्या बोलीभाषेचा अभ्यास, त्यांच्या विकासात येणाऱ्या आर्थिक सामाजिक, पारंपरिक अडचणी, त्यांवर उपाय आदि विषयांचा यात समावेश होता.

### "आमच्या गावाला हेच गुरुजी द्या!"

तर प्रात्यक्षिकामध्ये कुरणशाळा, रात्रीची शाळा वगैरे ठिकाणी पाठ घ्यावे लागत असत. पण हे अपुरे होते. प्रशिक्षणार्थीने आदिवासी खेड्यातील शाळेत प्रत्यक्ष पंधरा दिवस काम करून दाखवणे हा महत्त्वाचा भाग होता. त्यासाठी दरवर्षी जि. प. च्या एकशिक्षकी दहा शाळा आम्ही घेत असू. प्रत्येक शाळेमध्ये ४ विद्यार्थी, त्यांनी शाळेत रहावयाचे. प्रत्येकाने एकेक दिवस संपूर्ण एकशिक्षकी शाळा चालवा-यची. एकाने शैक्षणिक साहित्य तयार करायचे; एकाने गाव पहाणी करणे, पालक-संपर्क साधणे, लोकगीते व लोककथा गोळा करणे हे काम करावयाचे आणि एकाने चौघांचेही स्वयंपाकपाणी करावयाचे. हे सर्व आळीपाळीने करावयाचे. सर्वांना सर्व पाळ्या यावयाच्या. एक-शिक्षकी शाळा चालविणाऱ्या प्रशिक्षणार्थीचे टाचण कसे असावे, लोकपहाणी करावयाचे मुद्दे कोणते, शैक्षणिक साधने कोणती तयार करायची हा सगळा साचा माझ्या कल्पनेतून साकार होत होता. चार तास एकाच शिक्षकाने एकशिक्षकी शाळा कशी चालवायची, याचे नमुना पाठ घेऊन दाखविले. यापैकी एक श्री महालक्ष्मीच्या देवळात झाला. प्रशिक्षणार्थ्यांच्या बरोबर मी व एक प्राध्यापक मिळून पंधरा दिवस रहात असू. आमचा मुक्काम एका ठिकाणी असायचा. तेथून हिंडून रोज दोन गावांना भेटी देत असू. बहुतेक फेब्रुवारी संपता संपताचे दिवस असायचे. काटे-शेवरी, पांगारा, पळस आदि लाल फुले फुललेली असायची. त्यांचे सुशोभन, पळसाच्या फुलांचे रंग तयार करण्याचे प्रयोग, निरनिराळ्या रंगाच्या



दगडांच्या गोळा करून संग्रह करणे आदि नवे छंद येथे लागले होते. रस्त्याच्या कडेने बोरीची झाडे होती. पिवळीधमक बोरे. आमचा गाडीवान खाली उतरायचा. पसा पसा बोरे घेऊन यायचा आणि मग बोरे खात खात आमचा प्रवास चालायचा.

प्रशिक्षणार्थी हे पंधरा दिवस फार मजेत रहात असत. हौसेने सर्व काम करायचे. मुलांना लळा लागायचा. पालकांना हे गुरुजी फार आवडायचे. प्रत्येक ठिकाणी समारोप समारंभ व्हायचे, त्या वेळी पालक आवर्जून सांगायचे, "आमच्या गावाला हेच गुरुजी द्या!"

एक विशेष आठवण—

एन. सी. ई. आर. टी.चे एक प्रतिनिधी श्री. दवे कोसबाडला आले होते. त्या वेळी आम्ही पंधरा दिवसांच्या प्रात्यक्षिकासाठी बाहेरच होतो. एका जीपने हिंडून त्यांनी दहाही शाळा पाहिल्या. खूप आवडल्या. सगळीकडे नावीन्य दिसले. अगदी भारवलेल्या अंतःकरणाने ते परत गेले.

### ताईंचा विश्वास किती खरा होता!

शैक्षणिक साहित्य तयार करताना व वर्गाचे संचलन करताना प्रशिक्षणार्थी आपापल्या कल्पना प्रत्यक्षात आणीत होते. सहल घेणे, त्यातून वस्तुसंग्रह करणे, त्याची शाळेत व्यवस्थित मांडणी करणे, वगैरे कामे चालत असत. वस्तुसंग्रहाची मांडणी करण्यासाठी कुडाच्या शाळेत मांडण्या कुठल्या? मी पाहिले, वर्तमानपत्रांचे कागद एका कोपऱ्यात अंथरून वस्तूंची व्यवस्थित मांडणी व्हायची. फळे, कुडाच्या झोपड्या, अंगण, झाडांचे बुंधे सगळ्यांचा उपयोग लेखनासाठी व्हायचा. प्रोत्साहन मिळत गेले, मार्गदर्शन झाले, तर हीच शिक्षकमंडळी उत्तम काम करून दाखवतील, हा ताईंचा विश्वास किती खरा होता, हेच यावरून दिसते.

आमचा हा ओ. टी. पी. कोर्स करणाऱ्यांना आदिवासी क्षेत्रात काम करीत असल्यास इतरांपेक्षा द. म. १२·५० रु. जास्त वेतन मिळते.

# एक-शिक्षकी शाळा

पंधरा दिवस शाळा चालविण्याच्या उपक्रमामुळे एक गोष्ट माझ्या प्रकर्षाने लक्षात आली : एक-शिक्षकी शाळा कशी चालवावी? याचे उद्बोधन व्हायला हवे! त्या दृष्टीने चिंतन सुरु झाले. आता आमची प्राथमिक शाळा एक-शिक्षकी राहिली नव्हती. इ. ४ थी पर्यंत भरपूर मुले होती. प्रत्येक वर्गाला एक शिक्षक होता. मग एक-शिक्षकी शाळा प्रशिक्षणार्थींच्या डोळ्यासमोर कशी ठेवायची? आम्ही कृत्रिम एक-शिक्षकी शाळा तयार केली. प्रत्येक वर्गातील १० मुले अशा चाळीस मुलांचा एक गट तयार केला. एका मोठ्या दालनामध्ये चार ठिकाणी वर्ग बसवणे, चार फळे तर हवेतच. जितके शिक्षक तितके फळे, हा लोकल बोर्डाचा नियम होता. त्यामुळे सर्व एकशिक्षकी शाळांतून एकच फळा असायचा. वर्ग तितके फळे हवेतच, असा माझा आग्रह होता. जेव्हा जेव्हा संधी मिळाली, तेव्हा तेव्हा शिक्षण खात्याकडे ही स्पष्टता मी केली आहे.

काही वर्ग सामुदायिक घेणे, काही वर्गाप्रमाणे घेणे, तर काही १ ली-२ री, व ३ री-४ थी असे दोन दोन वर्ग मिळून घेणे, असे वेळापत्रक तयार केले. एका वर्गाला शिकवत असताना बाकीच्या वर्गांना काम अगर बौद्धिक व्यवसाय देणे, त्या वेळी वर्गातील एक प्रमुख विद्यार्थ्याकडे देखरेखीचे काम देणे वगैरे चालू केले. "एक-शिक्षकी शाळेत विद्यार्थी हे शिक्षकांचे खरे सहकारी असतात", "एक-शिक्षकी शाळा हा शाप नसून वरदान आहे" वगैरे सुभाषिते निर्माण झाली!

डॉ. चिकरमाने हे एक शिक्षकी संचलनामध्ये महर्षी आहेत. त्यांचे पुस्तक मला





वाचायला मिळाले खरे, पण ते पुष्कळ पुढे! आमचा चांगला जम बसल्यावर. माझी दिशा बरोबर होती, ही खात्री त्यांच्या पुस्तकाच्या वाचनाने झाली.

एक-शिक्षकी शाळेत वापरण्यासाठी म्हणून पुष्कळ शैक्षणिक साधनेही तयार झाली.

आमच्या शिक्षिका सौ. आशाताई पाटील, या एक-शिक्षिकी शाळा चालविण्यात प्रवीण झाल्या आहेत. आता शासनाने दोन-शिक्षकी शाळा सर्वत्र केल्या आहेत. आमच्या प्रयोगाची गरज संपली, म्हणून ही कृत्रिम एक-शिक्षकी शाळा बंद केली आहे.

परिसरास धरून वाचनपाठ व कविता लिहिणे, उदाहरणे रचणे, रंजनकार्यक्रम बसवून घेणे व लोकगीते, लोककथा गोळा करणे या कामांत आमच्या शिक्षिका श्रीमती सिंधुताई अंबिके अग्रेसर आहेत.

कुरणशाळा व रात्रीच्या शाळेत आळीपाळीने सर्व शिक्षकांनी काम केले आहे. पण रात्रीच्या शाळेला विशेष वळण लावण्याचे काम प्राथमिक शाळेचे मुख्याध्यापक श्री. व. ह. पाटील यांनी केले होते. आता याच कामी प्राध्यापिका सौ. लीलाताई कोसके यांनी विशेष लक्ष घालून रात्रीची शाळा ८ वीपर्यंत नेली आहे.

एकूण आदिवासी मुलांचे प्राथमिक शालेय शिक्षण व्यवस्थितपणे व्हावे व ते त्यांच्या जीवनोपयोगी व्हावे म्हणून विकासवाडीने सतत २५ वर्षे प्रयत्न चालविले आहेत. कोसबाड परिसर व विकासवाडी अध्यापन मंदिरात प्रशिक्षण घेऊन काम करीत असलेल्या शिक्षकांच्या द्वारे ठाणे जिल्हा एवढ्या क्षेत्रात प्रयोग थोड्याबहुत अंशाने यशस्वी होत असल्याचे आढळून येते.

# कोसबाडची विकासवाडी म्हणजे एकात्मिक बाल-विकास-केंद्र

विकासवाडीचे कार्य उठून दिसते, कारण येथे अगदी ० ते १२ क्वचित १५ वर्षे वयापर्यंतच्या मुलांच्या सर्वांगीण विकासाच्या दृष्टीने प्रयोग चालू आहेत.

बोर्डीला पूर्व प्राथमिक शिक्षण म्हणजे अडीच ते सहा वर्षे वयाच्या मुलांना केंद्रस्थानी धरून काम सुरू झाले. पण पुढे विकासवाडीमध्ये हा बालकांचा वयोगट दोन्ही बाजूंनी वाढला. तान्ह्या बाळांसाठी पाळणाघर आले. मोठ्या मुलांसाठी अनौपचारिक शिक्षणवर्ग आले. तान्ह्या बाळांबरोबर त्यांच्या आया व गर्भवती महिला पण आल्या. त्या अनुषंगाने महिलामंडळे आली.

मुलांच्या शिक्षणाच्या दृष्टीनेच विचार करून भागणारे नव्हते. त्यांचा शारीरिक विकास, त्यांचे आरोग्य या दृष्टीने सकस आहार, योग्य सवयी आदि गोष्टी आल्या. शिशुसंगोपनाचे पाठ महिलांना देताना मुलांच्या सवयी, भाषाविकास वगैरेंचे उद्बोधन स्वाभाविकपणे आले.

विकासवाडीत वरील सर्व गोष्टींना पोषक अशा योजना हळूहळू अंतर्भूत झाल्या आहेत. बोर्डीला बालवाडी, अंगणवाड्या, एक छोटी विकासवाडी, प्री पी. टी. सी. वर्ग व कस्तुरबा ट्रस्ट तर्फे ग्राम सेविका वर्ग इतके काम चालत होते. १९४६ ते ४९ पर्यंत कस्तुरबा ट्रस्टतर्फे अखिल भारतातून विद्यार्थिनी येत होत्या. पुढे १९५७ पर्यंत महाराष्ट्र व गुजराथ येथून भगिनी येऊन प्रशिक्षण घेऊन गेल्या.

कोसबाडला **विकासवाडी अध्यापन मंदिर** व त्याबरोबरच सोशल वेल्फेअर बोर्डातर्फे एक **ग्रामसेविका प्रशिक्षण वर्ग** चालू झाला. पण तो दोनच वर्षे होता.





त्यानंतर त्याची जागा **ग्राम बाल सेविका विद्यालयाने** घेतली. त्याचा सध्या २० वा वर्ग चालू आहे. संपूर्ण महाराष्ट्रातून एक हजार साठ विद्यार्थिनी "खेडेगावातील बालवाडी संचलनाचे तंत्र व मंत्र" शिकून गेल्या आहेत. **अंगणवाडी वर्कर्स ट्रेनिंगचा** १७ वा वर्ग चालू आहे. नुकतीच आय. सी. डी. एस. मध्ये काम करणाऱ्या सुपरवायझर्स तथा मुख्य सेविकांचा आणि अंगणवाडी वर्कर्स ट्रेनिंग वर्गाच्या इन्स्ट्रक्टर्सचा उद्बोधन वर्ग, अशी दोन नवी प्रशिक्षण दालने उघडली आहेत.

सध्या संस्थेच्या ११ बालवाड्या व पाळणाघरे आहेत. त्या प्रत्येक ठिकाणी एक आरोग्य-प्रकल्प आहे. प्रौढशिक्षण योजनेमार्फत महिला मंडळाचे उद्बोधन सुरू झाले, ते चालूच आहे. अशा अनेक प्रकारच्या उपक्रमामुळे बालकांच्या सर्वांगीण विकासाचे कार्य आपोआपच होत आहे. ती प्रात्यक्षिके प्रशिक्षणार्थींना मिळतात. तसेच पुष्कळशा पीएच. डी. करणाऱ्यांना येथे भरपूर खाद्य मिळते.

एकूण अनेक प्रकारचे प्रशिक्षणार्थी बंधु-भगिनी येथे प्रशिक्षण घेऊन गेल्या. घेत आहेत. दालने वाढत आहेत.

## माघार कशी घेणार ?

प्रत्येक उपक्रम सुरू होताना, तो कार्यान्वित करण्यासाठी चांगले चिंतन करावे लागते. उपक्रमाचे मर्म लक्षात घेऊन ते साध्य होण्याच्या दृष्टीने आपली कार्यपद्धती असली पाहिजे. ती कशी असावी हे ठरवावे लागते. घालून दिलेला साचा पाळायचा, पण त्यात योग्य ते फेरफार करून ध्येय साधायचे ही आमची रीत. जसे, आमचा सकस आहार प्रशिक्षण वर्ग. या योजनेत भगिनींना सकस आहाराचे प्रशिक्षण देणे एव्हढे सांगितले. ते कसे द्यायचे. दहा गावांत हिंडून शिबिरे घ्यायची. पण सुरुवात कोठून करावी, ते ठरवावे लागले. जीप होती. मी दहाही गावे हिंडले. तेथील महिलामंडळ अध्यक्षांना भेटले. कोणी सभेला येत नाहीत. अशी निराशा दिसून यायची. पण माघार कशी घेणार ? प्रात्यक्षिकांची वेगळी रीत काढली. उन्हाळ्याचे दिवस. आंब्याचे पन्हे, कैऱ्यांचे लोणचे, मुरांबा, आंब्याची डाळ, खमंग काकडी वगैरेंची प्रात्यक्षिके ठेवली. आश्चर्याची गोष्ट की, पुष्कळांना लिंबू पिळण्याचे यंत्र, किसणी यांसारख्या वस्तू माहीत नव्हत्या !

## आहार पदार्थांची बातमी झाली !

आमचे हे प्रयोग भगिनींना आवडले. मग बाल आहार, मुलांचे मधल्या वेळचे खाणे, इडलीडोसा, बटाटेवडा यांच्यासारखे सगळे पदार्थ आले. उसळी आणि भजी हॉटेलात जाऊन पुरुषांनी अगर मुलांनी खावी, त्यापेक्षा आपण त्यांना घरीच करून का खाऊ घालू नये ? हा माझा सवाल भगिनींना पटला. त्या दृष्टीने पदार्थ बनविण्यात

चढाओढ लागली. पुढे प्रत्येक गावी सकस आहार पदार्थांची प्रदर्शने झाली. अगदी मोठी सभा व्हायची. बंधुभगिनी उपस्थित असायच्या. भाषणे व्हायची. फोटो व्हायचे. वर्तमानपत्रांत बातमी यायची !

### कुमारिकांसाठी वाचनालय आणि शिवणवर्ग

"छे हो, बायका जमत नाहीत", हे वाक्य आता भूतकाळात जमा झाले. नंतर आम्ही बालसंगोपन, बालशिक्षण, योग्य औषधोपचार, अंधश्रद्धानिवारण यांसारखे विषय घेऊ लागलो. परस-बागा फुलाव्या. भाजीपाला, फळे यांचा उपयोग आधी घरीच झाला पाहिजे. कोंबड्या पाळणे व अंडी मुलांना देणे वगैरे गोष्टी महिलांच्या पचनी पडल्या. प्रत्येक ठिकाणी अर्धवट शाळा सोडलेल्या १५/१६ वर्षे वयाच्या कुमारिका मुलींचा घोळका भेटायचा. घरकामाशिवाय त्यांना काही उद्योग नव्हता. शेतकरी मंडळींकडे सगळ्यांना काम असते. पण इतर मुली रिकाम्या असायच्या. त्यांच्यासाठी गावात वाचनालय, शिवणवर्ग यांसारखे वर्ग हवे.

### मुली बोलल्या !

मी शासनाकडे या बाबतीत एक योजना पाठविली. "शाळेच्या प्राथमिक शिक्षकांच्याकडेच या मुलींना निरनिराळ्या रीतीने उद्बोधन देण्याचे काम सोपवावे. शनि-रवीला त्यांनी हे वर्ग घ्यावेत. त्याबद्दल शिक्षिकेला (प्रमाणात) मानधनाच्या रूपाने मोबदला मिळावा. पत्रव्यवहार चालूच होता. शासनाच्या तंत्रात सगळ्याच गोष्टी बसतात असे नाही ! पण मी स्वतःच दोन ठिकाणी असे वर्ग १९७०-७१ मध्ये चालू केले. मुलींचे वाचन, घरास उपयुक्त इतके शिवण, वक्तृत्व, कला, रांगोळ्या आदि सुशोभन हे विषय होते. याच मुली जवळपासच्या आदिवासी पाड्यांवर जाऊन सकस आहाराची प्रात्यक्षिके दाखवीत. नरपड येथील महिला-मेळाव्यात दोन मुली १०/१० मिनिटे सकस आहार या विषयावर बोलल्या ! मला धन्य वाटले !

### चैत्रगौरीपुढे सकस आहार

माझी ही सर्व कल्पना उचलून धरण्याचे काम व अमलात आणण्याचे काम सौ. सरोजा परुळकर (श्री. विजय परुळकर यांच्या पत्नी) यांनी केले. आम्ही एकमेकींशी विचारविनिमय करत असू. माझ्या सूचनेचा गाभा पकडून सौ. सरोजाताई काम करत.

डहाणूजवळच्या श्री महालक्ष्मी यात्रेमध्येही आम्ही चैत्रगौर मांडत असू व चैत्रगौरीपुढे सकस आहार योजनेतील सर्व प्रकारचे पदार्थ ठेवत असू. सगळ्यात वरच्या पायरीवर पूर्णान्नाचे ताट असायचे. सकस आहार कार्यक्रमाच्या निमित्ताने लिहिलेल्या सकस आहार गीतांचा संग्रह एका लहानशा पुस्तिकेत छापून प्रसिद्ध झाला आहे.

## पाळणाघरे

विकासवाडी योजनेमध्ये "पाळणाघर" हा एक विभाग आहेच. मोठ्या भावांना शाळेत येता यावे, म्हणून ही योजना ! त्यांनी शाळेत येताना आपल्या लहान भावंडांस घेऊन यावे, पाळणाघरात ठेवावे व घरी जाताना घेऊन जावे. अर्थात मुंबईपुण्यासारख्या शहरांतून, गिरण्यांतून अगर कारखान्यांतून चालणाऱ्या "क्रेश"पेक्षा याचे स्वरूप फारच वेगळे आहे !

### "का रे रडतोस ?"

भावंडांना खेळवण्याचे काम मुलांना करायचे असते. यात वावगे काहीच नाही. कसे खेळवावे, हे त्यांना माहीत नसते. कोसबाडला सुरवातीला मी मुलांना गोळा करायला जायची, तेव्हा मुले आपल्या भावंडांना कुठल्या तरी झाडाखाली घेऊन बसलेली असायची. रांगते बाळ अगर जरा मोठे बाळ धुळीत खेळत असायचे. भाऊ अगर बहीण काही न सुचून उगीचच इकडेतिकडे पहात बसायची अगर जवळपास भटकत रहायची. एकदा एक भाऊ लहान बाळाला कडेवर घेऊन रडत असताना पाहिला. "का रे रडतोस ?" "आई आली नाही. बाळ रडायचे थांबत नाही, म्हणून !" मला वाईट वाटले. दोघांनाही घेऊन मी विकासवाडीत आले.

शाळेस जोडून असणाऱ्या आमच्या पाळणाघरात भावंडे कशी खेळतात, त्यांना आंघोळ कशी घालावी, पेज कशी पाजावी वगैरे गोष्टी मोठ्या भावंडांना व अधूनमधून मुलांना भेटायला येणाऱ्या मातांना आपोआप कळायच्या.

### सामुदायिक बारसे समारंभ

सुरवातीचे विकासवाडीचे आमचे पाळणाघर फार लहान होते. एकदोन झोळ्या बांधल्या होत्या. चटई अंथरली होती. थोडी खेळणी ठेवली होती. बाळांची नावे हजेरीपटावर लिहायची होती. पण लिहिणार काय? कोणाचेच नाव ठेवलेले नाही. रडक्या, मंगळ्या, नवशा, सोमी, बुधी, शुक्री अशी नावे आपोआपच पडली होती. मी प्रथम एकाच मुलाचे बारसे केले. त्याला नवे झबले-टोपडे घातले. आईला पाटावर बसवून तिची खणानारळाने ओटी भरली. बाळाला सजवलेल्या झोळात घालून नाव ठेवले "विलास". आणि नंतर सामुदायिक बारसे करण्याचा उपक्रम सुरू केला. तो पुढे १० वर्षे तरी चालू होता. वर्षभरात जन्मलेल्या मुलांची नावे दुसऱ्या वर्षी एकदमच ठेवायची. प्रथम १५ मुलांची नावे ठेवली, नंतर ३५, पुढे हा आकडा ५० पर्यंत जाऊ लागला. समारंभासाठी एखाद्या प्रसिद्ध समाजसेविकेस "आत्याचा" मान मिळायचा. सौ. मनोरमाबाई आपटे, सौ. नलिनीबाई डहाणुकर, सौ. सिंधुताई हळबे, श्रीमती ताराबाई वर्तक यांच्यासारख्या आत्या आम्हांला मिळत गेल्या!

आजच्या आमच्या परिसरातील मुलामुलींची नावे—माधुरी, नीलिमा, नीलेश, सचिन, सरोज अशी आहेत. अतिथींना वाटते इतकी गोड नावे कशी? त्याचे श्रेय आमच्या सामुदायिक बारसे समारंभाला आहे. आता हा समारंभ करण्याचे प्रयोजन उरले नाही. ठिकठिकाणी बालवाड्या झाल्या आहेत. बालवाडी शिक्षिकेच्या मदतीने लगेचच मुलांचे नामकरण होऊ लागले आहे.

विकासवाडीच्या पाळणाघराची अशी छोटी सुरुवात झाली. पुढे बालसेविका ठिकठिकाणी बालवाडीची प्रत्यक्षिके घेऊ लागल्या. त्या वेळी त्यांना लहान मुलांसाठी झाडांना झोळ्या बांधाव्याच लागत. मुलांना खेळण्यासाठी एखादी चटई अंथरावी लागे. प्रशिक्षणार्थी बालसेविकांपैकी एकदोघी आळीपाळीने या मुलांच्याकडे लक्ष द्यायच्या. असे अनौपचारिक पाळणाघर चालवावेच लागे.

आता भारत शासनाने पाळणाघर योजनेवर अधिक भर दिला आहे. त्यामुळे व्यवस्थित स्वरूप त्याला आले आहे. रीतसर दाई नेमली जाते. आठवड्याला वैद्यकीय तपासणी होते. औषधे, पेजपाणी सर्व मिळते. मुलांच्या विकासाची नोंद ठेवली जाते.

मुलांना खेळवावे कसे? त्यांच्यासाठी योग्य लालनगीते, अंगाईगीते कोणती? वगैरे गोष्टी आम्ही आमच्या बालसेविकांना त्यांच्या प्रशिक्षणकाळात शिकवतो. पाळणाघर संचलन हा त्यांच्या अभ्यासक्रमात नसलेला विषय त्यांना आपोआपच शिकायला मिळतो.

## आरोग्य प्रकल्प केंद्रे

### लहान दवाखान्याची आवश्यकता

ठिकठिकाणी पाळणाघरे सुरू झाली. या पाळणाघरांना डॉक्टरांची साप्ताहिक भेट असते. मुलांना तपासणे, योग्य औषध देणे आणि त्यांच्या शारीरिक विकासाकडे लक्ष देणे हे डॉक्टरांचे काम. सुरवातीला डॉ. सौ. कमलाबाई करंदीकर, नंतर डॉ. देशपांडे अशा दोन डॉक्टरांनी हे काम उचलले. काही अपरिहार्य कारणामुळे यांच्या सेवेचा लाभ पाळणाघरांना थोडाच मिळाला. नंतर डॉ. जैन हे आमच्या विकासवाडीत काम करू लागले. पाळणाघरांची वैद्यकीय तपासणी करताना त्यांच्या नोंदी ठेवणे, पालकांना आरोग्यरक्षणाविषयी माहिती देणे वेळच्या वेळी औषधोपचार करण्यास सांगणे अशी कामे सुरू झाली. आमच्या बालवाडी-पाळणाघर शिक्षिकाच हे काम करतात. प्रशिक्षणार्थी बालसेविका व अंगणवाडी-सेविका यांना ही प्रात्यक्षिके घ्यावी लागतात. त्यामुळे त्यांचेही आपोआपच उद्बोधन होत असते. मुलांची वैद्यकीय तपासणी करीत असतानाच लहानमोठे स्त्री-पुरुषही डॉक्टरांच्याकडे येऊ लागले. औषधपाणी मागू लागले. आमच्या पाळणाघर योजनेत ही सोय नव्हती. पण डॉक्टरांनी प्रसंगी पदरमोड करूनही उपचार चालू केले. रोगी बंधु-भगिनींची संख्या वाढू लागली. यावरूनच ठिकठिकाणी लहान लहान दवाखाने असण्याची जरुरी स्पष्ट झाली.

वास्तविक डहाणू घोलवड येथे सरकारी दवाखाने; डहाणू, बोर्डी येथे खाजगी दवाखाने व डहाणू येथे प्रसिद्ध मिशनरी हॉस्पिटल आहे. इतके असूनही आमची आदिवासी मंडळी औषधपाण्यावाचून वंचित आहेत. कारण वेळेवर बस मिळणे,

चाऊत दवाखान्यात पोचणे, तेथे नंबर लावून बसणे, नंबर न लागल्यास पुन्हा दुसऱ्या दिवशी परत येणे, दुखण्याची विशेष दखल न घेतली जाणे वगैरे प्रकार त्यांच्या बाबतीत होतात. त्यांची रोजची मजुरी बुडते. तेव्हा ही सगळी दगदग टाळण्यासाठी दवाखान्यात जायचेच नाही, झाडपाल्याचे औषध करायचे अथवा भगत करायचा.

## जर्मन संस्थेतर्फे आर्थिक मदत

म्हणून आदिवासी वस्तीत ठिकठिकाणी लहान लहान दवाखाने घालून किरकोळ दुखण्यांवर औषधोपचार करून घेण्याची सोय असणे आवश्यक आहे. डॉ. जैन यांनी या दृष्टीने प्रयत्न चालविले. "टेरे डस होम" या जर्मन संस्थेचे भारतातील प्रतिनिधी श्री. आदि पटेल यांना ही योजना पटली. या संस्थेकडून आर्थिक मदत येऊ लागली. जेथे आमची बालवाडी व पाळणाघर आहे अशा दहा ठिकाणी ही आरोग्य केंद्रे सुरू झाली.

## दरमहा एक हजार रोगी

या केंद्रामध्ये बालवाडी पाळणाघर शिक्षिकाच अधिक वेळ थांबून काम करतात. डॉ. जैन यांनी प्रथम या बालशिक्षिकांचे आठ दिवसांचे उद्बोधन घेतले. नंतर प्रत्येक आठवड्यास सभा होऊन झालेल्या कामाची विचारपूस व नवीन काही उद्बोधन चालते. सर्व नोंदी अत्यंत व्यवस्थित ठेवलेल्या आहेत. सर्व मिळून द. म. १००० रोगी दवाखान्याचा लाभ घेतात, असे ठेवलेल्या नोंदीवरून स्पष्ट दिसून आले आहे.

## योजनेचा दुसरा टप्पा

या योजनेचा दुसरा टप्पा सुरू आहे. ठिकठिकाणी महिलामेळावे घेऊन, दुखणी होऊच नयेत याची काळजी कशी घ्यावी, बालकांचे संगोपन कसे करावे, कुटुंब-नियोजनाची जरुरी व ते कसे करावे आदि माहिती दिली जाते. नुकत्याच हरिजन-गिरिजन उन्नती मंडळामार्फत झालेल्या ठाणे जिल्हा महिला मंडळाच्या वज्रेश्वरी मेळाव्यासाठी आमच्या सात आदिवासी भगिनी प्रतिनिधी म्हणून गेल्या होत्या. आपण होऊन दवाखान्यात जाऊन कुटुंबनियोजनाचे ऑपरेशन करून घेणाऱ्या भगिनी पुढे येऊ लागल्या आहेत. माझ्या भगिनी श्रीमती इंदिरा राजगुरू या काही काळ सर्व केंद्राच्या सुपरवायझर म्हणून काम करीत होत्या. महिला मेळावे घेणे, आरोग्यशिक्षण देणे व कुटुंबनियोजन कामास प्रत्यक्ष मदत करणे या सर्वांची जबाबदारी त्यांनी घेतली होती. त्यांचा हेल्थ व्हिजिटरचा कोर्स झालेला असून कर्नाटकात संपूर्ण नोकरी झाली आहे. त्या सध्या सेवानिवृत्त असल्याने आपल्या सेवेचा



लाभ देत होत्या. त्यांना येथील हवा न सोसल्याने त्या परत गेल्या. सध्या सौ. सुमनताई महाजन काम पहात आहेत.

आमच्या येथे प्रशिक्षण घेणाऱ्या बालसेविका, अंगणवाडी सेविका, डी. एड. विद्यार्थिनी या सर्वांना या आरोग्य केंद्रामधून पाळीपाळीने प्रत्यक्ष काम करावे लागते. त्यांना आपोआपच अनुभव मिळतो. पुढे त्या प्रत्यक्ष कामास लागतात, तेव्हा या अनुभवाचा त्यांना जरूर फायदा मिळतो.

## ग्राम-बाल-सेविका विद्यालय

लहान बालकांच्या सर्वांगीण विकासाच्या दृष्टीने संस्थेचे सर्वांगीण प्रयत्न चालू आहेत. कोसबाडच्या आजूबाजूच्या सुमारे पाच मैल परिसरातील माता व बालके यांना या प्रयत्नाचा लाभ मिळत आहे. हे दृश्य आज दिसते, याचे बरेचसे श्रेय आमच्या ग्राम-बाल-सेविका विद्यालयास आहे. आतापर्यंत ठिकठिकाणी या विभागाचा उल्लेख करण्यात आला आहे. कारण शून्यापासून सहा वर्षांपर्यंतच्या बालकांच्या सर्वांगीण विकास कार्यक्रमात यांचा सिंहाचा वाटा आहे.

इंडियन कौन्सिल्स फॉर चाइल्ड वेल्फेअर ही अखिल भारतीय स्वरूपाची एक संस्था आहे. 'युनिसेफ' या संस्थेला ती जोडलेली आहे. भारत सरकारच्या समाज-कल्याण विभागाकडून संस्थेला अनुदानाच्या स्वरूपात आर्थिक सहाय्य मिळते.

या संस्थेने पूर्वप्राथमिक क्षेत्रामध्ये खेडेगावात जाऊन काम करतील अशा बालवाडी शिक्षिकांचे प्रशिक्षण-कार्य हाती घेतले.

सन १९६१ साली केंद्रीय समाज कल्याण सल्लागार बोर्डातर्फे 'चाइल्ड केअर कमिटी' नियुक्त झाली. या कमिटीवर कै. पू. ताराबाई मोडक सदस्या होत्या. कमिटीचा सर्व भारतभर दौरा झाला. त्यांचा एक मुक्काम कोसबाडला पडला. श्रीमती पुष्पाबेन मेहता, श्रीमती मंजु भाषिणी या दोन मोठ्या समाजसेविका यामध्ये होत्या. त्या वेळी कोसबाडलाच विशेष काम चालत होते. खेडपाडा व चिंचावे येथे बालवाड्या नुकत्याच चालू झाल्या होत्या. पण कोसबाडची विकासवाडी पाहूनच पाहुणे मंडळी खूप झाली. तेथे बालसेविका प्रशिक्षण वर्ग असलाच पाहिजे, असा त्यांनी आग्रह धरला.





### आम्ही कंबर बांधली !

बालसेविका विद्यालयात प्रवेश घेण्यासाठी कमीत कमी एस. एस. सी. परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक होते. त्यामुळे बहुतेक राज्यांतील राजधान्यांच्या ठिकाणी हे वर्ग चालत. ग्रामीण विभागातील हा पहिला वर्ग होणार होता. या मुलींनी खेडेगावांत जाऊन बालवाड्या चालविल्या पाहिजेत. पण त्या वेळी एस. एस. सी. झालेल्या भगिनी फार थोड्या होत्या. शिवाय ही परीक्षा झालेल्या भगिनी अधिक पगाराची नोकरी मिळाली की, काम सोडून जातात असा अनुभव होता. ते स्वाभाविक पण आहे. बालवाडी-संचालक त्यांच्या आर्थिक कुवतीप्रमाणे पगार देतात. काही नाही त्यापेक्षा बरे म्हणून मंडळी काम स्वीकारतात, पण दुसरे काम शोधण्याच्या प्रयत्नात असतातच. खेडेगावांत अर्धवट शिक्षण झालेल्या पुष्कळ गरजू महिला आहेत. त्यांनाच प्रशिक्षण दिले तर त्यांचे जीवन सुखी होईल, बालवाड्यांचे काम नीट चालेल, म्हणून कै. ताईंनी शैक्षणिक पात्रतेची अट शिथिल करण्याचा आग्रह धरला. हो-ना करता त्यांच्या आग्रहाला मान्यता मिळाली. कारण ताईंच्या देखरेखीखाली एखादे केंद्र असलेच पाहिजे असा दिल्लीकरांचा आग्रह होता. दुसरा एक प्रश्न होता, म्हणजे या कार्यक्रमासाठी संस्थेने दरवर्षी पाच हजार रुपये घालावयाचे होते. आमच्याजवळ पैसे नाहीत. तीही अडचण दिल्लीकरांनीच सोडवली. हा वर्ग आय. सी. सी. डब्ल्यू.च्या दिल्लीच्या मध्यवर्ती कार्यालयाने सरळ चालवावा व हे संस्थेने भरावयाचे पैसे दिल्ली ऑफिसने भरावे, असे ठरले. कोसबाडचा हा वर्ग ग्रामीण बालसेविका प्रशिक्षणाचा प्रायोगिक वर्ग आहे, असे स्वरूप आले. या नव्या कामासाठी आम्ही कंबर बांधली. श्रीमती पुष्पाबेन मेहता यांचे मार्गदर्शन होते. इंप्लिमेंटेशन कमिटीच्या पहिल्या अध्यक्षा श्रीमती कृष्णाबाई मोटे यांनीही अगदी बारकाईने या कामी लक्ष घातले.

प्रवेश देण्याची ठराविक रीत आहे. (वर्तमानपत्रांत जाहिरात देऊन अर्ज मागविणे, त्यांतून योग्य उमेदवारांस मुलाखतीस बोलावणे, त्यांतून फक्त ५० विद्यार्थिनींची निवड करणे.) इंप्लिमेंटेशन कमिटीमध्ये राज्य शासनाचे मंत्रालयातील ग्रामविकास खात्याचे अवर सचिव, समाजकल्याण व शिक्षणसंचालक आदि मोठी मंडळी होती. दिल्लीहून जनरल सेक्रेटरी व टेक्निकल ऑफिसर यायच्या.

### मला घेराव घातला !

संस्थेला हे सर्व नवीन होते. पहिली दोनतीन वर्षे हा निवडीचा दिवस म्हणजे एक यात्रेचा दिवस ठरायचा. पन्नास विद्यार्थिनींची निवड, पण अर्ज पाचशेच्या वर यायचे! त्यांतून निवड करून अडीचशे तरी बोलावणी जायची. प्रत्यक्ष दीडशेपर्यंत मुली उपस्थित रहायच्या. एकेका उमेदवाराबरोबर दोन-तीन पालक असायचे. काही

पुरुष तर काही स्त्रिया. पैकी कोणी विशेष वजनदार, आपल्या भागातील कार्यकर्ते असायचे. या सगळ्यांची उतरण्याची, जेवण्याखाण्याची व्यवस्था करणे, सगळ्यांची विचारपूस करणे वगैरे प्रचंड काम व्हायचे. सबंध महाराष्ट्रात मिळून हा एकच वर्ग. त्यामुळे ही गर्दी! प्रवेश न मिळालेल्या मुली आणि पालक हिरमुसल्या तोंडाने परत जावयाची. 'आम्हांला बोलावलेच कशाला?', 'आमचा जाण्यायेण्याचा खर्च तुम्ही दिला पाहिजे!' वगैरे ऐकायला लागायचे. दुसऱ्या वर्षी मला माझ्या ओट्यावर पालकांनी घेराव घातला. श्रीमती कृष्णाबाईंनी अगदी मला हाताची साखळी करून बचावले. तिसऱ्या वर्षी मी मुलाखतीनंतर डहाणूस जाणार म्हणून डहाणू स्टेशनवर बसले होते. काही पालक त्याच गाडीने परत जाणार होते. त्यांनी स्टेशनवर मला घेराव घातला.

अनुभवाने अर्जाच्या फॉर्मवर अधिकाधिक स्पष्ट सूचना देत गेलो. तसतशी ही परिस्थिती निवळली. निवडीच्या वेळी पालक मंडळी बहुसंख्येने असतात हे लक्षात घेऊन त्यांच्या निवास व भोजनाची आधीच व्यवस्था करू लागलो. १९७९-८० मध्ये अमरावती व औरादशाजनी या दोन गावी नवीन बालसेविका विद्यालये आय. सी. सी. डब्ल्यू. मार्फत उघडण्यात आली. पण येथे एस. एस. सी. पास ही प्रवेशाची अट कायम ठेवण्यात आली आहे.

## नव्या कल्पनांना वाव

एक प्रायोगिक स्वरूपाचे काम म्हणून आम्ही अधिक हौसेने व दक्षतेने कामाला लागलो. प्राचार्या व शिक्षक म्हणून माझीच नेमणूक होती. त्यामुळे माझ्या नव्या नव्या कल्पना प्रत्यक्षात आणण्यास पूर्ण अवकाश मिळाला.

आय. सी. सी. डब्ल्यू. ने घालून दिलेला अभ्यासक्रम आम्हांला थोडा शिथिल करण्यास परवानगी होती. आम्ही प्रात्यक्षिकावर अधिक भर दिला. मुळामध्ये ८० टक्के तात्त्विक व २० टक्के प्रात्यक्षिक व तोंडील मार्क आहेत. आम्ही ४० टक्के तात्त्विक, ६० टक्के तोंडी आणि प्रात्यक्षिक यासाठी ठेवले आहेत. सकाळच्या वेळी बालसेविकांनी प्रत्यक्ष बालवाडीत जाऊन निरीक्षण करणे, पाठ पहाणे, देणे, बालवाडीच्या सर्व कामांत मदत करणे हे काम आहे. त्या त्या भागात गृहभेटी देऊन सर्वेक्षण करणे आवश्यक आहे.

बालसेविका अभ्यासक्रमात असलेला बालरंजनाचा कार्यक्रम बालवाड्यांमधून होतो. कारण बालवाडीच्या मुलांच्याबरोबर त्यांची मोठी भावंडे येतात; तसेच तान्ही भावंडे पण येतात. यांची व्यवस्थाही करणे भाग आहे. हे बालसेविका अभ्यासक्रमात नाही! तरीही पाळणाघर चालविण्याचे अनुभव बालसेविकांना मिळतात. मुंबई येथे मोबाईल क्रेश कार्यक्रमात आमच्या या बालसेविका फार चांगले काम करणाऱ्या ठरल्या.



बालसेविकांनी स्वतः रंजन कार्यक्रम करून दाखविणे, हस्तलिखिते करणे, रांगोळ्या, पाने, फुले, धान्ये यांची प्रदर्शने मांडणे, बालवाडीतील शैक्षणिक साधने तयार करणे, दसरी कामाची वही तयार करून घेणे वगैरे गोष्टी होतात. यांमध्ये बाल-सेविका-अभ्यासक्रमात असलेल्या आणि नसलेल्या अनेक गोष्टींचा समावेश आहे. एकूण सकाळी ६ वाजल्यापासून रात्री १० पर्यंत बालसेविका भगिनी काही ना काही कामात असायच्या. अजूनही तसेच काम चालू आहे.

प्रथम ५–६ वर्षे बालसेविकाच 'रसोडा' (स्वयंपाकघर) चालवायच्या. स्वयंपाक करणे, वाढणे, कोठी व्यवस्था पहाणे, हिशेब ठेवणे वगैरे सर्व कामे आळीपाळीने त्याच करायच्या. पुढे स्वतः कष्ट करूनही खर्चात फारशी बचत होत नाही, तो वेळ वाचवून जास्त अभ्यास केला तर बरे होईल असे अनुभवास आल्यामुळे आता कॅंटिन सुरू केले आहे.

कोणताही नवा वर्ग सुरू होईल, तेव्हा त्यासाठी असणारा अभ्यासक्रम प्रथम राबवायचा, मग आस्ते आस्ते अनुभवानुसार तो लवचिक करून घ्यायचा, काही नवीन गोष्टी दाखल करायच्या, काही काढून टाकायच्या ही माझी सवय होऊन बसली आहे.

बालसेविकांचा अभ्यासक्रम प्रायोगिक म्हणून आमच्या स्वाधीन केला होता, त्यामुळे संपूर्ण मोकळीक होती. त्याचा फायदा मी घेतला.

## भावी कार्याचे बीजारोपण

ब्लॉक प्लेसमेंट हा एक महत्त्वाचा मुद्दा या अभ्याक्रमात आहे. वार्षिक परीक्षेपूर्वी एक महिना अगोदर मुलींना निरनिराळ्या ठिकाणी प्रत्यक्ष कामाला पाठवायचे; तेथील मंडळींकडून त्यांच्या कामाबद्दल अभिप्राय मागायचे. आरोग्य, शिक्षण, समाजकार्य यांपैकी कोणतेही काम जेथे चालू असेल तेथे मुलींना त्यांच्या आवडीप्रमाणे एकवीस दिवस पाठवायचे. पहिल्या वर्षी मी तंतोतंत हा मुद्दा अमलात आणला. घोलवड, कैनाड, बापूगाव अशा तीन ठिकाणी मुली व त्यांच्याबरोबर एक एक शिक्षक गेले. पुढच्या वर्षी स्वरूप जरा बदलले. ५० च्या ५० मुली व आम्ही सर्व कार्यकर्ते तलवाडा येथे एकदमच गेलो. तेथील अनुभवामुळे पुढच्या कामाचे बीज रोवले गेले.

## तलवाडा ब्लॉक प्लेसमेंट

जव्हार तालुक्यात तलवाडा हे एक छोटे गाव आहे. आदिवासींचे पाडे अवती-भवती आहेत. डहाणू–जव्हार रस्त्यावर गाव असल्यामुळे थोडे महत्त्व आहे. त्याहीपेक्षा आदिवासी सेवा मंडळाने चालवलेली आश्रमशाळा हे तेथील मोठे आकर्षण आहे. कै. आचार्य भिसे यांच्या देखरेखीखाली सुरू झालेली ही पहिलीवहिली

आश्रमशाळा. या शाळेचे संचालक कै. ल. दु. महाजन गुरुजीही असेच प्रेरणामूर्ती, अथक काम करणारे व आदिवासी बालकांवर नितांत प्रेम करणारे होते. त्यामुळे ही आश्रमशाळा म्हणजे त्या वेळचे ठाणे जिल्ह्याचे भूषण होते.

महाजन गुरुजींनी आमचे स्वागत केले. ५० मुलींसह आमची जेवण्याची, रहाण्याची सर्व व्यवस्था केली. कामातही खूप सहकार्य केले.

## आळीपाळीने सर्व कामे केली

आता येथील कामाचे स्वरूप ठरवायचे होते. आय. सी. सी. डब्ल्यू. च्या नियमाप्रमाणे तीन मुख्य गोष्टींवर भर होता. शिक्षण, आरोग्य, समाजकार्य या तीन ठिकाणी पाठवायच्या ऐवजी तीनही कामे एकाच ठिकाणी चालवीत असे ठरविले. तलवाडा आश्रमात एक बालवाडी व एक आरोग्य केंद्र होते. याशिवाय कोठेही ही सोय नव्हती. तेव्हा मी मुलींच्या १२।१२ च्या एक, अशा चार तुकड्या केल्या. त्या बारामध्ये पुनः शिक्षण, आरोग्य, समाजकार्य अशा तीन तुकड्या पाडल्या. दोन मुलींनी सर्व केंद्रावर फिरते रहावे असे ठरले. बाराजणींच्या एका तुकडीने स्वतः हिंडून आपल्या कामास योग्य असा पाडा निवडावा. तेथील मुलांचा सर्वे घ्यावा. आपल्या कामाला योग्य अशी जागा निवडावी. एखादे अंगण, जवळच झोपडी, मोठ्या झाडाची सावली, पाणी जवळ असणे वगैरे गोष्टींकडे कटाक्षाने लक्ष द्यावे. मुलांची नोंदणी, त्यांना घेऊन येणे, त्यांची स्वच्छता, बालवाडीचे कार्यक्रम वगैरे सर्व गोष्टी त्यांनीच ठरवायच्या. त्यांच्यातील आरोग्य-पथकाने बालके व माता यांची आरोग्य-पहाणी करायची, समाजकार्य-पथकाने सर्व सर्वे करायचा, शाळेत न जाणाऱ्या मोठ्या भावंडांना खेळ, गाणी, गोष्टी, नाटके, हस्तव्यवसाय, सहल आदि बालगोपाळ मंडळा(चिल्ड्रेन क्लब)च्या प्रवृत्ती घ्यायच्या. १२ जणांच्या या तुकडीने आळीपाळीने सर्व कामे करायची. त्यांच्यातील एक मुख्य संचालिका व एक मदतनीस असायची.

## दगडांचे पेपरवेट

चार पाड्यांवर आमचे हे काम सुरू झाले. दिवसेदिवस रंगत गेले. मुली खूप होत्या. त्यांना चांगला सहकार मिळायचा. नवे अनुभव यायचे. रोज रात्री प्रार्थनेनंतर एकत्र बसून दिवसभराच्या कामाचा आढावा घेतला जाई. अनुभवांची देवाण-घेवाण होई. नव्या कल्पना सुचत. दुसरा दिवस पुनः नव्या उत्साहात उगवायचा. येथे मुलींनी नदीतून निरनिराळ्या आकाराचे दगड गोळा करून आणले. त्यांच्या बालवाडीत ते ऑईलपेंटने रंगवले. त्यांवर वेगवेगळ्या रंगाचे ठिपके दिले. छानपैकी पेपरवेट तयार झाले. अजूनही ते आमच्याकडे कोणाकोणाच्या टेबलावर दिसतात!



## कार्यक्रमाची सांगता

तीनही मुख्य विषयांना धरून समारंभ व्हायला हवे होते. आरोग्य विषयासाठी सुदृढ माता–बालक स्पर्धा, शिक्षण विभागासाठी पालक सभा, समाजकार्य विभागासाठी बालकांचा रंजनकार्यक्रम असे तीन समारंभ आयोजित केले. समारंभ आश्रमशाळेत व्हायचे. पाड्यावरची मंडळी येथे यायची. गुरुजींनी लहानसा मांडव घालून दिला होता. प्रत्येक समारंभास निरनिराळे अध्यक्ष होते. सगळेच सभारंभ छान झाले. फोटो निघाले. वर्तमानपत्रांत बातमी आली. रंजनकार्यक्रमाचे अध्यक्ष माजी आमदार श्री. बाबुराव जाधव व मुख्य पाहुण्या श्रीमती कलावती करवंदे या होत्या. दोघेही सुशिक्षित, समंजस आणि कर्तबगार आदिवासी पुढारी. त्यांनी बालसेविकेंचे व मुलांचे खूप कौतुक केले. श्रीमती सई परांजपे यांची "जादूचा शंख" ही नाटिका आश्रमशाळेतील ८ ते १० वर्षे वयोगटाच्या मुलामुलींनी करून दाखविली. आदिवासी महिला मेळावा, सामुदायिक सहल वगैरे कार्यक्रम झाले. एकदम उत्तम मेहनत संबंधित बालसेविकांची होती.

## "तुम्ही जाऊ नका!"

आमच्या या उपक्रमामुळे तलवाडा परिसरामध्ये मुलांचे शिक्षण, संगोपन व शीलसंवर्धन यांविषयी चांगलीच जागृती झाली. आमच्या मुलींना पालक मंडळी म्हणू लागली, "तुम्ही इथेच रहा! जाऊ नका!" मुलांनाही सेविकांचा फार लळा लागला होता.

## नवे गाव, नवा अनुभव

एकूण ब्लॉक प्लेसमेंटचा नमुना प्रस्थापित झाला. त्यानंतर आशागड, साबटा, वापूगाव, तलासरी आदि गावे ब्लॉक प्लेसमेंटसाठी घेतली. प्रत्येक वर्षी नवे गाव! प्रत्येक ठिकाणी लोकांचा उत्स्फूर्त सहकार होता. स्थानिक मंडळी उत्तम व्यवस्था ठेवीत असत. बालसेविका आनंदात असायच्या. नवे अनुभव त्यांच्या व आमच्या गाठी पडायचे.

ब्लॉक प्लेसमेंटच्या वेळी मी तर मुलींच्या बरोबर असायची. श्रीमती हेमलता तोफखाने, श्रीमती लीला गोडबोले (सौ. कोसके), डॉ. चिन्मुळगुंद, श्रीमती रमाताई पंडित आदि इतर इन्स्ट्रक्टर मंडळीही असायची.

## ब्लॉक प्लेसमेंटने निराळे वळण घेतले

६ वर्षांच्या अनुभवानंतर ब्लॉक प्लेसमेंटच्या वरील पद्धतीतही थोडा बदल झाला. प्रत्येक वेळी आम्ही निराळे गाव निवडीत असू. तेथे बालवाडीचा चांगला जम

बसायचा. हे चांगले काम आपल्या गावात झाले पाहिजे, हे लोकांना पटायचे. "तुम्ही येथून जाऊ नका!" असा आग्रह असायचा. पण आम्ही तेथून हलल्यानंतर पुढे या दिशेने स्थानिक मंडळी काहीच करायची नाहीत. आम्हांलाही या गोष्टीचा पाठपुरावा करण्याइतका वेळ व आमच्यापाशी तशी व्यवस्था नव्हती. म्हणजे केलेले काम पुसून जायचे. ते मनाला खटकले. आपल्या कोसबाडच्या भोवती १२ पाडे आहेत, त्यांपैकी काही पाडे आपण का घेऊ नयेत? असा विचार आला आणि लगेच तो अमलात पण आणला. कोसबाडपासून अर्धापाऊण मैलाच्या अंतरावर असणारे नारळीपाडा, दळवीपाडा, मानकरपाडा व लिलकपाडा हे पाडे निवडले. नेहमीप्रमाणे ४ ग्रूपने जाऊन मुली तेथे काम करू लागल्या. सर्व कार्यपद्धती आधी ठरल्याप्रमाणेच होती. मुलींच्या बरोबर शिक्षक जात असत. मी पण जात असे.

या गोष्टीचा अपेक्षित परिणाम दिसून आला. कोसबाड परिसरातील मंडळींना बालवाडीचा कार्यक्रम जवळून पहायला मिळू लागला. त्यांचा सर्व प्रकारचा सहकार मिळत होता. दोन वर्षे याप्रमाणे कार्यक्रम चालला. मग आणखी थोडा फरक केला. परीक्षेपूर्वी एखादा महिना, हा वेळ फार कमी पडतो. म्हणून सहामाही परीक्षेनंतर-नंतर या पाड्यांवर नियमितपणे आळीपाळीने बालवाडी चालविण्याचे काम सुरू झाले. कार्यक्रमाला अधिक स्थिरता आली. मुलींना आपली बुद्धी चालवून अधिक काम करायला अवकाश मिळाला.

## बालवाडीविषयी आस्था निर्माण झाली

दिल्लीहून एन. सी. ई. आर. टी. च्या लेक्चरर श्रीमती इंदिरा मलानी आल्या होत्या. त्या नारळीपाडा बालवाडी पाहून आल्यावर मला सांगू लागल्या, "फारच छान." "इतके चांगले काय पाहिले?" मी विचारले. तेव्हा म्हणाल्या, "मुलींनी पानांच्या सहाय्याने रंगांची ओळख करून दिली. बदामाचे लालचुटुक पान, वडाचे हिरवेगार पान, अशी पाने रंगतक्त्याऐवजी वापरली होती." ऐकून मला आनंद झाला. बालसेविकांनी ही स्वतःची कल्पना लढवली होती. कारण त्यांचा अजून सर्व साधनांचा अभ्यास व्हावयाचा होता. पुढे पुढे मुलींची सहामाही व वार्षिक पाठांची आणि संचलनांची परीक्षा पाड्यावरील त्यांनी चालविलेल्या बालवाडीमध्येच होऊ लागली. पालक संपर्क-साधणे, जागा शोधणे, स्वच्छ ठेवणे, मुले गोळा करणे, बालवाडी चालविणे, नोंदी ठेवणे, हजेरीपत्रक करणे, नाव घालणे वगैरे सर्व गोष्टी मुलींना कराव्या लागत. मुलांकडून करून घेतलेल्या व मुलींनी परिसरातील वस्तूंचा उपयोग केलेल्या शैक्षणिक साधनांचे प्रदर्शन मांडले जाई. या सर्व गोष्टींवर त्यांना सामुदायिक व व्यक्तिगत मार्क मिळायचे. ते वार्षिक मार्कांत धरले जायचे. यामुळे बालसेविकांना या स्वतःच्या बालवाडीबद्दल चांगलीच आत्मीयता वाटत असे. हा क्रम सहा वर्षे



चालला. दर वर्षी मुली नव्या असल्या तरी पाडे तेच असत, त्यामुळे तेथील मंडळींची बालवाडीविषयी आस्था निर्माण झाली होती. आपल्या पाड्यावर कायमचीच बालवाडी हवी, अशी मागणी येऊ लागली. आणि तोही योग जुळून आला. आय. सी. सी. डब्ल्यू.च्या जनरल सेक्रेटरी श्रीमती प्रमिला पंडित बारुआ यांनी दळवीपाड्यावरील बालवाडीस भेट दिली. वेळ सकाळची होती. कडाक्याची थंडी पडली होती. पानांच्या झुबक्यांतून कोवळी किरणे डोकावत होती, तेवढीच ऊब! अशा परिस्थितीत झाडाच्या खाली स्वच्छ अंगणात बालवाडी चालू होती. मुले साधनांच्यावर खेळत होती. तीनचार छोटी बाळे चटईवर झोपली होती, दोनतीन रांगती बाळे गडबड करीत होती आणि दोनतीन बाळे झाडांना बांधलेल्या झोळीत झोपली होती. पाहुणेमंडळी स्वेटर्स, ओव्हरकोट वगैरे घालून आली होती. त्यामुळे कपड्यांतील विषमता अधिकच जाणवत होती.

## "बालवाडीची येथेच खरी आवश्यकता आहे"

थोड्याच वेळाने साधनांची आवराआवर झाली. अभिनयगीते सुरू झाली. बालवाडीतील आपल्या बहीणभावांबरोबर त्यांची दीडदोन वर्षांची भावंडेही नाचू लागली. हातवारे करू लागली. दृश्य मोठे मनोवेधक होते. पाहुणेमंडळी अगदी खूष झाली. पण त्या वेळी श्रीमती प्रमिलाताई म्हणाल्या, "येथेच खरी पाळणाघराची आवश्यकता आहे." आणि दिल्लीला गेल्याबरोबर त्यांनी दोन पाळणाघरे मंजूर करून पाठवली. समाजकल्याण बोर्डातर्फे चार बालवाड्या याआधी सुरू झाल्या होत्या. तेथेही हळू हळू निरनिराळ्या एजन्सी मार्फत पाळणाघरे मिळाली. आता फक्त सहा महिने बालसेविकांच्या सहाय्याने चालणारी आमची बालकेंद्रे संपूर्णपणे चालू लागली. कायमच्या शिक्षिका आल्या. ही केंद्रे आता बालसेविकांची प्रॅक्टिसिंग स्कूल झाली. ब्लॉक प्लेसमेंटसाठी आता बालसेविकांना संपूर्ण एक महिना बालवाडी शिक्षिकांच्या शिवाय बालवाडी चालवून दाखवावी लागते.

श्री महालक्ष्मी यात्रेतील बालवाडी, एखाद्या ठिकाणची झटपट बालवाडी, एकदोन दिवसांची बालशिक्षण नगरे वगैरे गोष्टी बालसेविकांच्याकडून वेळोवेळी होतात. त्यामुळे त्यांच्या अनुभवात जशी भर पडते, तशीच बालसंगोपनाची कार्यक्षमता वाढत जाते.

## पदयात्रा आणि रंजन कार्यक्रम

पदयात्रा हा बालसेविकांचा ठळक कार्यक्रम आहे. १९७५ सालापासून कै. पूज्य विनोबा भावे यांच्या आदेशानुसार स्त्री-शक्ति-जागरणासाठी पदयात्रा कार्यक्रम सुरू झाला आहे. आमच्या डहाणू तालुक्यातही हा उपक्रम चालू आहे. स्थानिक पुढारी महिला यात चांगला भाग घेत असल्या तरी त्या अपुऱ्या पडतात. बालसेविकांचा या

कामी सिंहाचा वाटा असतो. पदयात्रेसाठी मुद्दाम रंजन कार्यक्रम तयार केला जातो. त्यात स्त्रियांचे व देशाचे उज्ज्वल प्रश्न हाताळलेले असतात. नशाबंदी, हुंडा, कुटुंब-नियोजन, मतदान, अंधश्रद्धा आदि अनेक प्रश्नांवर मनोरंजक नाटिका असतात. आमच्या शिक्षिका श्रीमती सिंधुताई अंबिके या असे नाट्यप्रवेश, मूक दृश्ये लिहिण्यात व बसविण्यात वाकबगार आहेत. रोज एक गाव याप्रमाणे सुमारे आठवडाभर हा कार्यक्रम चालतो. मुलींच्या या रंजन कार्यक्रमासाठी ग्रामस्थ सर्व प्रकारचे सहकार्य देतात. रंजन कार्यक्रम पहाण्यासाठी प्रचंड गर्दी जमते. मुलींच्या त्या दिवशीच्या रहाण्याची व जेवण्याची वगैरे व्यवस्था ग्रामस्थ महिला करतात. बालसेविकांच्या एकूण चार तुकड्या याप्रमाणे चार भागांतून हिंडत असतात.

### बालवाड्या स्थापन झाल्या

परिणामी निरनिराळ्या लहानमोठ्या संस्थांमार्फत आमच्या परिसरात सुमारे ३० बालवाड्या चालू झाल्या आहेत. त्यांचे आर्थिक अगर प्रत्यक्ष संचलन आमच्या संस्थेकडे नाही. पण आमचे मार्गदर्शन जरूर असते.

### बालसेविका ही ठसठशीत पाकळी

बालसेविका विद्यालयास अनेक देशी, परदेशी पाहुण्यांनी भेट दिली आहे. श्रीमती पुष्पाबेन मेहता, श्रीमती इंदिरा डे यांचे मार्गदर्शन आहे. आतापर्यंत महाराष्ट्रातील निरनिराळ्या जिल्ह्यांतून १००० बालसेविका प्रशिक्षित होऊन गेल्या आहेत. सर्व चांगल्या प्रकारे काम करतात, असे अभिप्राय हस्ते-परहस्ते कळले. काही बाल-सेविका ग्रामसेविका व त्यातून पुढे मुख्यसेविका झाल्या आहेत. काही डी. एड्. चा अभ्यास करून प्रा. शाळा शिक्षिकेचे काम करीत आहेत. अगदीच अनिवार्य कारणा-स्तव काम करीत नसणाऱ्यांची आतापर्यंतची संख्या ५० पेक्षा जास्त नाही.

एकूण विकासवाडीच्या विकसत्या कमळामधील बालसेविका ही एक ठसठशीत पाकळी आहे. आता आय. सी. डी. एस. (इंटिग्रेटेड चाईल्ड डेव्हलपमेंट स्कीम) या भारत शासनाच्या महाराष्ट्र शासनातर्फे चालणाऱ्या योजनेमध्ये संस्थेने १९७६ सालापासून बराच भाग घेतला आहे. अंगणवाडी वर्कर्स प्रशिक्षण चालू असून आता पंधरावा वर्ग चालू आहे. ५०० मुली प्रशिक्षण घेऊन गेल्या. आता या वर्षी या स्कीममधील सुपरवायझर्स ट्रेनिंग व इन्स्ट्रक्टर ट्रेनिंग वर्ग सुरू होत आहेत.

## बालसाहित्य प्रकाशन

बालसेविकांचे प्रशिक्षण चालू असताना बालवाडीस योग्य अशी गाणी, गोष्टी, कृति-गीते, खेळ वगैरेंचा संग्रह त्यांच्याजवळ असणे आवश्यक आहे, हे लक्षात आले. दरवेळी मुलींनी लिहून घेणे हे कठीण पडू लागले. पुनः दरवर्षी नवी तुकडी! नव्याने काम! तेव्हा असे संग्रह छापूनच काढले तर? आमचा छापखाना आहे. संग्रह आमच्याजवळ तयार होता. पण कागदाची टंचाई. ही अडचण त्या वेळेच्या शिक्षण-संचालिका श्रीमती चित्रा नाईक यांनी सरकारी कोट्यातून कागद पुरवून सोडवली! आमच्या शिक्षण-मित्र-मालेतर्फे बालवाडी कशी चालवावी? बालगीते, बडबडगीते, कृतिगीते, सकस-आहार-गीते, गोष्टी भाग १ व २ या पुस्तिका प्रकाशित झाल्या. शिक्षणपत्रिकेतून वेळोवेळी प्रकाशित झालेले बालसाहित्य या कामी उपयोगी पडले. या सर्व पुस्तिकांचे संपादन करण्याचे काम करणे हे मला क्रमप्राप्तच होते. या पुस्तिकां-तून कै. ताराबाई मोडक, सौ. सरलाताई देवधर, श्रीमती सुमती पायगांवकर आदि सुप्रसिद्ध बालसाहित्य लेखिकांच्या कृती आहेत. माझाही वाटा त्यात आहेच. सकस-आहार-गीते सर्वच माझी आहेत. (परिशिष्ट दोन पहा.)

## वस्तुसंग्रहालय

मुलांची एकाग्रता होत नाही हे पाहून "मिळेल ती वस्तू घेऊन या" असे मी मुलांना सांगितले. आणलेल्या वस्तूंवर गप्पागोष्टी, उदाहरणे आदी विषयांचा समन्वय केला जात असे. त्या नीटनेटक्या मांडून ठेवल्या गेल्या. मुलांनी आणलेल्या वस्तूंमध्ये वारुळे, कवड्या, माशांची हाडे, गुंजा, बिया, शेंगा, घरटी वगैरे अनेक प्रकार आहेत. सापाचे मणके, फुलपाखरांच्या पेट्या वगैरे गोष्टी मुलांच्या मदतीने तयार केल्या आहेत. दर वर्षी बेडूकमासे पाळून बेडकांची स्थित्यंतरे पाहणे, झाडावरचे सुरवंट पाळून फुलपाखरांच्या अवस्था पाहणे ही कामे मी प्राथमिक शाळेत सुरू केली. अजूनही ती चालू आहेत.

वस्तुसंग्रहालयाला अधिक व्यवस्थितपणा देण्याचे काम ताईंचे एक मित्र मुंबईच्या म्युझियमचे क्यूरेटर श्री० माधवराव राऊत यांनी केले.

## बाल-उद्योगालय

प्राथमिक शाळेस पूरक अंग म्हणून बाल-उद्योगालयाची निर्मिती आम्ही केली. मुलांना थोडा वेळ प्राथमिक शाळेत काम देणे आवश्यक वाटले. त्यासाठी कॉटेज इंडस्ट्रीजतर्फे दोन वर्षांचा सुतारी कामाचा प्रशिक्षण वर्ग येथे चालविण्यात आला. त्यात एकूण सतरा आदिवासी विद्यार्थी पास झाले आणि तेरा जणांची सहकारी सोसायटी आम्ही काढली. हा सगळा खटाटोप ताईंनी केला. मुले जमविणे, त्यांच्यावर देखरेख ठेवणे आणि पुढे सहकारी सोसायटीसाठी धडपड करणे एवढेच माझे काम होते.

आजही आमचे हे बाल-उद्योगालय जोरात चालू आहे. मात्र आता कारागीर 'बाल' राहिले नाहीत—त्यांची मुलेच आमच्या बालवाडीत व शाळेत येत आहेत!

## बालवाडीत येणाऱ्यांनाच काम द्या!

या बाल-उद्योगालयाच्या निर्मितीपूर्वी आम्ही अनुभवलेले अनेक प्रसंग, आमच्या-समोर उभ्या राहिलेल्या अनेक अनपेक्षित समस्या आणि आमच्या कुवतीप्रमाणे आम्ही शोधून काढलेली उत्तरे हे सारे सारे आज मनापुढे जागे झाले आहे. ते सारे रंजक आणि उद्बोधकही वाटते आहे.

कोसबाडला आल्यानंतर एक गोष्ट प्रकर्षाने जाणवू लागली की लहान लहान मुलांनाही थोडेफार काम करून दोनचार आणे रोज मजुरी मिळवावी लागत आहे. आमच्या बालवाडीत वयाने जरा मोठी म्हणजे ५-६ वर्षे वयाची मुले अनियमित येत होती. ती अनियमित का येतात याचा विचार करीत एक दिवस मी कृषि विद्यालयाच्या पटांगणातून जात होते. बरीच लहान मुले आपल्यासमोर फडकी अंथरून बसलेली मी पाहिली.



"हे काय?" म्हणून चौकशी केली तेव्हा कळले, ही मुले सकाळी मिरच्या तोडतात, त्याची सात दिवसांची मजुरी यांना मिळणार आहे.

मोठ्या मुलांच्या अनुपस्थितीचे कारण मला कळले होते!

मी जयंतराव पाटलांना भेटले. त्यांना सांगितले,

"बालवाडीत येणाऱ्या मुलांनाच काम द्या. पैसे वाटप करण्याचे काम माझ्याकडे द्या."

माझी मागणी जयंतरावांनी तत्काळ मान्य केली.

मी मुलांसाठी बिल्ले तयार केले. बालवाडीत उपस्थित असणाराला बिल्ला मिळू लागला. "बिल्ला असेल त्यालाच काम" असा जयंतरावांनी नियम केला. अशा रीतीने उद्योग आणि शिक्षण यांची सांगड घालून हा नवीन उपक्रम सुरू केला.

आमच्या इमारतींचे बांधकाम चालू झाले त्या वेळची घटना. प्राथमिक शाळेचेही काम मी पाहत होतेच. मोठ्या मुलांनाही काही काम किंवा उद्योग देण्याचे दृष्टीने इमारतीचे बांधकाम करणाऱ्या कॉन्ट्रॅक्टरला मी भेटले. मुलांना मजुरीवर काम देता येईल का याची चर्चा केली.

खडे वेचणे, मातीची भर टाकणे अशा तऱ्हेची लहान लहान कामे मजुरीवर मुलांना देण्यात आली. छोटी छोटी घमेली डोक्यावर घेऊन मुले इतस्ततः वावरू लागली. दुपारी ११ ते २ अशी शाळा असायची. शाळेत येणारालाच काम मिळायचे. मग काय आश्चर्य! मुलांचे लोंढेच्या लोंढे शाळेकडे येऊ लागले. वेळेला १५०/१५० मुले! त्यांना ताब्यात ठेवणे कठीण होते. मग सर्व सामुदायिक व तोंडी शिक्षण!

## हे कसे जमणार?

विद्यार्थ्यांचा लोंढा ही एक नुसती लाट आहे याचे भान आम्हाला होते. पण क्षण वाया जाऊ दिले नाहीत. संध्याकाळी घरी जाण्यापूर्वी सगळ्यांना अंगणात बसवून परवचा व काही सोपी गाणी व्हायची. मुले अत्यंत नियमितपणे येत असत. पण ती भुकेलेलीच असत. रोजची मजुरी त्यांना देत होतो. पण घरी खाणारी मंडळी पुष्कळ. तेव्हा या पैशातून यांच्या पोटात किती जात असेल याची शंकाच होती.

आम्ही ठरवले की मधल्या वेळचे जेवण आपण द्यायचे. मुलांना रोज ३ आणे मजुरी मिळत होती. त्यात आम्ही मुलामागे ३ आणे घालीत होतो. त्या वेळी ६ आण्यांत एका लहान मुलाचे जेवण सहज होत असे. प्रथम प्रथम जेवायला खूप मुले असायची. हळूहळू संख्या रोडावत गेली. आणि १५ दिवसांच्या आतच ३-४ वर आली. असे का व्हावे? संशोधन सुरू झाले. पालकांनी सांगितले,

"आमच्या घरात ३/४ लहानमोठी पोरे आहेत. त्यांपैकी एका मुलाला तुम्ही

पोटभर खायला देणार आणि बाकीची मुले अगदीच उपाशी राहणार; हे कसे जमणार ? हे होणार नाही."

आम्हांला पालकांचे म्हणणे पटले. शाळेतले संपूर्ण जेवण आम्ही बंद केले. मुलांची मजुरी घरी देऊ लागलो. अजूनही मधल्या वेळचा मुलांचा खाऊ देण्याचे काम चालू आहे.

### भस्मासुर उलटला !

मुलांना करता येईल असे कॉंट्रॅक्टरकडचे काम संपले. आता शेतातही कसला हंगाम नव्हता. तेव्हा आम्ही नवीन नवीन कामे शोधू लागलो. पळसाच्या पानाच्या पत्रावळी करणे, रद्दी कागदाच्या वाणीसामानासाठी पिशव्या करणे, ढलप्या-लाकडे वेचणे वगैरे कामे काढली. परंतु ती तुटपुंजी होती. त्यामुळे मुलांना २–३ आणेही सुटत नव्हते. तेव्हा यापेक्षा जास्त भरीव काम मिळविण्याच्या मागे लागलो.

घोलवड स्टेशनजवळ एक स्ट्रॉ-कव्हर कारखाना होता. तेथे काचेच्या बाटल्यांना पॅकिंग करण्यासाठी भाताच्या गवताची टोपणे केली जात असत. मी तो पाहिला. किती तरी लहान लहान मुले तेथे काम करीत होती. अगदी मैल मैल अंतरावरून येणारी मुलेही त्यांत होती. काम सोपे होते—भाताचे गवत विणून पिशव्या तयार करणे. शंभर पिशव्यांमागे सहा आणे मिळत. सबंध दिवसभर मुलांना हे काम पुरत असे.

आम्ही ठरवले की हा उद्योग आपण आपल्या शाळेला जोडून घ्यावा. त्यासाठी माहिती मिळवली. काम येणारा एक मुकादम नेमला. बडोद्याच्या साराभाई केमिकल्स फॅक्टरीमधून व ॲलेंबिक केमिकल्स फॅक्टरीमधून ऑर्डरी मिळविल्या. चार तास नियमित शाळेत येणाऱ्यालाच काम मिळायचे. आता पुन्हा शाळेची उपस्थिती नियमित झाली. उद्योगही नीट चालत होता. पण...तेथेही 'पण' आलाच !

लहान मुलांकडून कोसबाड परिसरातच हे काम करून घेण्याचे मोठमोठ्या भात व गवत व्यापाऱ्यांच्याही हे लक्षात आले. त्यांनी ठिकठिकाणी छोटे मांडव टाकले. त्या त्या ठिकाणचे आदिवासी मुकादम नेमले आणि मुलांना तेथेच काम दिले ! सकाळी उजाडल्यापासून दिवस मावळेपर्यंत मुले काम करीत असत. त्यामुळे टोपणे पुष्कळ व्हायची. म्हणून पैसे पुष्कळ मिळायचे. आमच्याकडे आम्ही फार तर चार तासच मुलांना काम देत होतो. पण व्यापारी आठदहा तास काम देत. मुले भात-कांजी खाण्यासाठी उठत असत तेवढीच ! सतत खाली मान घालून, उकिडवे बसून ही कोवळी मुले काम करायची. त्यापूर्वी शाळेत नव्हती जात, पण दिवसभर मोकळ्या हवेत हिंडत होती, स्वच्छंदपणे बागडत होती. हे बंद झाले. शिकले पाहिजे वगैरे गोष्टींची जाणीव कुणालाच नव्हती. पालक या कामापोटी मालकांकडून आगाऊ पैसे घ्यायचे. त्यामुळे मारून हाणूनही ते मुलांना कामाला बसवायचे.



मुलांच्या कामाची मजुरी पालकांच्या हातात पडे. मुलांच्या हातावर आठवड्याकाठी आठ-बारा आणे ठेवले जात. मुले सिनेमा पाहणे, भजी खाणे, जुगार खेळणे यामध्ये पैसे उडवीत.

म्हणजेच, मुलांची शारीरिक आणि मानसिक अशी दोन्ही प्रकारची हानी होत होती !

आम्ही व्यापाऱ्यांना भेटण्याचा प्रयत्न केला. पण मुंबईच्या व्यापाऱ्यांचा पत्ता कुणी लागू देईना. मुकादम आदिवासीच. त्यांना चांगला पगार. त्यामुळे ते पत्ता सांगण्यास तयार नव्हते. मुले आम्हांला पाहून गंजीमागे लपायची. त्यांना शाळेपेक्षा पैशाची चटक अधिक होती.

मग मी विकास-गट-कार्यालय, जिल्हा शिक्षण खाते आणि अखेर सचिवालयापर्यंत धाव घेतली.

"हा उद्योग जिल्हा बोर्डाने ताब्यात घ्यावा. त्यांच्या एक-शिक्षकी शाळेस तो जोडावा. त्यामुळे तेथील उपस्थिती वाढेल व नियमित होईल. इतर सर्वांना हा उद्योग मुलांकडून करवून घेण्यास बंदी आणावी." अशी आम्ही सूचना केली होती. शासकीय अधिकाऱ्यांना ती पटलीही होती. वरून चौकशीसाठी मंडळी आली होती. पण उपाय काही झाला नाही. कारण काम मुलांच्या अंगावर दिलेले होते. हजेरी वगैरे काही नव्हती. त्यामुळे फॅक्टरी ॲक्ट लागू करता येत नव्हता !

शेवटी आम्ही आमचे हे काम बंद केले. आम्ही निर्माण केलेला हा भस्मासुर अशा रीतीने आमच्यावरच उलटला होता ! अजूनही कोसबाडच्या आसपास हे काम चालू आहे. पण तेथे जाणाऱ्या मुलांचे प्रमाण आता थोडे कमी आहे इतकेच !

### स्थिर व्यवसाय सापडला !

मुलांसाठी दुसरा उद्योग शोधणे भाग होते. ही आदिवासी मुले, जंगलात हिंडणारी, तेव्हा यांना सुतारी काम चांगले आवडेल व येईल हे आम्ही ओळखले होते. म्हणून सुतारी कामाचे प्रशिक्षण शाळेस जोडून घ्यावे असे ठरले. त्यासाठी कॉटेज इंडस्ट्रीजशी पत्रव्यवहार केला. त्यांच्या नियमात "१४ वर्षे वयाच्या पुढचा मुलगा, १ वर्षाचे प्रशिक्षण व २० रुपये महिना शिष्यवृत्ती" असे होते. आम्हांला तर लहान मुलांना घ्यायचे होते. तेव्हा ताईंनी खटपट करून "१० वर्षे वयापुढचा मुलगा, २ वर्षांचे प्रशिक्षण व १० रुपये महिना शिष्यवृत्ती" असे करून घेतले. अशा प्रकारे आमच्या येथे १९६१ मध्ये कॉटेज इंडस्ट्रीजमार्फत दोन वर्षांचे सुतारी काम व लेथकाम याचे प्रशिक्षण सुरू झाले. मला वाटले होते की नेहमीप्रमाणे येथेही मुलांचा लोंढाच येईल. पण तसे झाले नाही. शोधून शोधून मुले आणावी लागली. १७ मुलांचा हा वर्ग सुरू झाला.

श्री० आगाशे आणि श्री० मोरे असे दोन शिक्षक शासनामार्फत आलेले होते. त्यांचे म्हणणे होते की "या आदिवासी मुलांना लाकूडकाम चांगले जमते. सफाई आहे. रंगसंगती आहे."

आमच्या येथे पुष्कळ पाहुणे येत असल्यामुळे मुलांनी केलेल्या वस्तू चटकन विकल्या जात होत्या. शिक्षकमंडळी म्हणत होती, "इतर ठिकाणी हा फायदा होत नव्हता. मुलांच्या तयार मालाने पेट्याच्या पेट्या भरतात. शेवटी त्यांचा लिलाव करावा लागतो."

अशा प्रकारे मुलांसाठी आम्हांला शेवटी एकदाचा योग्य आणि स्थिर व्यवसाय सापडला! हा वर्ग चालू असतानाही मुलांचे शालेय शिक्षण चालूच होते.

दोन वर्षांनंतर या मुलांची परीक्षा घेण्यात आली. त्यात १७ पैकी १३ मुले पास झाली. त्यातून तिघे जण बाहेरगावी कामानिमित्त निघून गेले. राहिलेल्या १० जणांना आता उद्योग द्यायला हवा होता. त्यासाठी त्यांची सहकारी सोसायटी स्थापन केली. १० रुपयांचा १ शेअर आहे. १० कारागीर आणि आम्ही बाकी सहानुभूति-सदस्य. इतरांकडून ठेवी गोळा केल्या.

अशा प्रकारे १९६४ मध्ये या सोसायटीमार्फत बाल-उद्योगालय चालू झाले.

## विकास मुद्रणालय

आमच्या रात्रीच्या शाळेतून लिहिण्यावाचण्यापर्यंत शिकून जाणारी बरीच मंडळी होती. अनिवार्य कारणास्तव दुसरी-तिसरीतून शाळा सोडणारी ही मंडळी होती. पुढे यांचा लेखन-वाचनाशी अजिबात संबंध राहत नाही. थोडेच दिवसांत ही मंडळी निरक्षर होतात. त्यांची साक्षरता टिकावी, त्यांना वाचायला येतील आणि आवडतील अशी पुस्तके काढावी, असे ताईंच्या मनात होते. त्यासाठी संस्थेचे स्वतःचे मुद्रणालय असावे म्हणून बरीच वर्षे आमची खटपट चालू होती. पण योग येत नव्हता. शेवटी ताई मृत्युशय्येवर होत्या त्या वेळी, १ ऑगस्ट १९७३ रोजी सकाळी, संस्थेचे परम-मित्र श्री० रामराव मंकीकर यांनी ३० हजारांचा बिनव्याजी ठेवीचा चेक ताईंच्या हाती दिला. मग आणखीही मंडळी पुढे झाली. आपले हे स्वप्न साकार होत आहे याचा ताईंना आनंद झाला. शेवटच्या भ्रमिष्ट अवस्थेत त्या मुद्रणालय, त्याचे उद्घाटन वगैरेविषयीच बोलायच्या. त्यांना प्रत्यक्ष समारंभ पाहायला मिळाला नाही. पण त्यांनी ठरवलेल्या तारखेला म्हणजे ६ ऑक्टोबर १९७३ रोजी आम्ही मुद्रणालय सुरू केले. त्यांच्या इच्छेप्रमाणे बालवाडीसाठी, प्रायमरी शाळेसाठी व शिक्षक पालकांसाठी सोप्या भाषेतली अशी २५ लहान पुस्तके आतापर्यंत येथून छापून निघाली आहेत.

छापखान्याचे व्यवस्थापक श्री० य० रा० रानडे हे एका पायाने अधू आहेत—म्हणजे तो पाय कापलेलाच आहे. तरीही कुबड्यांच्या साहाय्याने दिवसच्या दिवस



उभे राहून मुद्रणालयाचे काम ते करीत असतात. त्या कामाची त्यांना संपूर्ण माहिती आहे. अगदी तिसरी-चौथी जेमतेम शिकलेली अशी आदिवासी मुलेमुलीच येथे कामाला आहेत. ती मंडळी या विभागास 'छापकारखाना' म्हणतात! बरीचशी मुले शिकून आता मुंबईस कामाला लागली आहेत. सध्या ५ मुली व १ मुलगा असे ६ कारागीर कामाला आहेत. पैकी एक मुलगी पायाने अपंग आहे. डोंगरावर खेडेगावी चालत असणाऱ्या या मुद्रणालयाचे काम चालू ठेवणे सोपे नाही. सतत निराशेचे धक्के खावे लागतात. कागदटंचाई, बिले लवकर न येणे, कारागिरांची अकुशलता... अशा अनेक अडचणी आहेत. त्या वेळी जिद्द ठेवणे, खचून न जाणे ही गोष्टच महत्त्वाची असते.

ईश्वराच्या आणि ताईंच्या आशीर्वादाने या मुद्रणालयास वारंवार संजीवनी इंजेक्शने देणारे भेटतात. पण त्यांच्या शोधार्थ मला खटपट करावी लागते. ताईंची ही अंतिम इच्छा आहे. हे महत्त्व लक्षात ठेवून, येथील मुद्रणालय अमरच झाले पाहिजे या माझ्या जिद्दीस तेथील कार्यकर्ते व ताईंचे चाहते आणि कामाचे महत्त्व जाणणारे दाते यांचा भक्कम आधार आहे. आमच्या मुद्रणालयात मराठी, इंग्रजी, गुजराती तीनही लिपींतले टाईप आहेत. 'शिक्षणपत्रिका' मासिक येथूनच छापले जाते.

## शबरी उद्योगालय

परिसरातील वस्तूंचा उपयोग करून शैक्षणिक साधने तयार करण्याचा आमचा उद्योग अगदी सुरवातीपासूनचा आहे. पुष्कळ मंडळी संस्था पाहायला यायची. "आम्हांला तुम्ही शैक्षणिक साधने तयार करून द्याल का?" असा त्यांचा प्रश्न असायचा. थोडी थोडी साधने कार्यकर्ते व बालसेविका प्रशिक्षणार्थींच्या मदतीने तयार करून देऊ लागले. हळूहळू मागणी वाढली, आणि हे काम आता व्यवस्थित स्वरूपात संस्थेचा एक विभाग म्हणूनच सुरू झाले.

वामन सुरती हा बोर्डीपासूनच अगदी लहान वयापासून संस्थेत शिपायाचे काम करीत आहे. साधने तयार करण्याच्या माझ्या छंदात तो पहिल्यापासून सहभागी आहे. शंख गोळा करून आणले तर, "धुऊन दे! निवडून दे!" बांबू दिसले, "अमुक मापाचे कापून दे!", "मण्यांना तारा ओवून दे!", "आवाज-डब्या तयार करून दे!"—अशी अनेक कामे त्याला मी सांगते आणि तो करतो. कल्पना माझी, तयार करवून घेण्याचे काम माझे, पण तयार करण्याचे काम त्याचे. माझे कोणतेही नवे साधन वामनच्या मदतीशिवाय होत नाही. साधने तयार करण्याच्या आमच्या विभागात वामन ही एक मुख्य व्यक्ती आहे.

आमच्या प्राथमिक शाळेचे उत्साही शिक्षक श्री० शेख यांचाही या उपक्रमामध्ये

सिंहाचा वाटा आहे. ते उत्तम चित्रकार असून कल्पक आहेत. त्यांचे अक्षर सुंदर आहे. कोणत्याही कल्पनेचा गाभा त्यांना फार लवकर समजतो. त्यामुळे, परिसरातील वस्तूंचा उपयोग करून होणारी साधनेही सुबक आणि आकर्षक होत आहेत. स्वतःच्या प्रयत्नाने स्क्रीन प्रिंटिंगची कलाही त्यांनी हस्तगत करून घेतली आहे.

साधनालयातील महत्त्वाचे तिसरे आधारस्तंभ श्री० ना० अ० लोहार हे आहेत. यांना सुतारी काम अवगत आहे. ते जिद्दीने प्रयत्न करीत असतात. याशिवाय बालसेविका विद्यार्थिनींची मोठी मदत होते.

अशा सगळ्या कार्यकर्त्यांच्या आधाराने आमचे शैक्षणिक साधने तयार करण्याचे काम आकार घेत होते. इतक्यात महाराष्ट्र शासनाच्या ग्राम विकास खात्याने काही बालवाड्यांसाठी ५०० रु० पर्यंत शैक्षणिक साधनांची मागणी केली. मी ५०० रु०त बसतील अशा प्रथम आवश्यक असणाऱ्या साधनांची यादी तयार केली. ती युनिसेफने पास केली. नमुना-संच पाठविण्यात आला. आणि एकदम महाराष्ट्रातील निरनिराळ्या ११३ ठिकाणी हे साहित्य पुरविण्याची ऑर्डर आली! मुदत फक्त एक महिन्याची दिली होती. चांगलीच कंबर बांधावी लागली. त्या वेळी संस्थेतील अध्यापक विद्यालय, बालसेविका, प्राथमिक शाळा या सर्व विभागांतील विद्यार्थी, विद्यार्थिनी व कार्यकर्ते या कामाला लागले होते. माझ्या अंगणात कच्च्या मालाचा ढीग पडला होता. हे काम मुदतीत कसे पूर्ण होणार या काळजीने छाती दडपली होती. पण हजारो हातांनी सहकार्य दिले. काम मुदतीत पूर्ण झाले. आणि शासनामध्ये संस्थेच्या कामाबद्दल एक चांगली प्रतिमा तयार झाली.

पण नेहमीच असे सर्वांना कामाला लावून कसे भागणार? त्यासाठी स्वतंत्र कार्यकर्ते हवेत, यंत्रणा हवी; या विचारातून शबरी उद्योगालयाचा जन्म झाला.

एका बाजूला शैक्षणिक साधनांची मागणी वाढत होती. दुसऱ्या बाजूने आजूबाजूच्या एस० एस० सी० पर्यंत शिकलेल्या अथवा मध्येच शाळा सोडलेल्या मुलींना काम हवे होते. म्हणून केंद्रीय समाज कल्याण बोर्डाकडे मदत मागितली. तीन वर्षांच्या खटपटीने ती मिळाली. आज येथे २० महिला काम करीत आहेत. कार्यशाळा पण बांधून तयार झाली आहे. कामाचा सर्व जम बसला आहे. महाराष्ट्र सरकारकडून व इतर ठिकाणाहून मागणी येत आहे.

## शबरी उद्योगालय—नामकरण

वर सांगितलेल्या स्वरूपात प्रत्यक्ष उद्योग सुरू होण्यापूर्वीही आदिवासी भगिनींच्या मदतीने तिखट, मसाले, पापड करून वेऊन ते मुंबईला पोचविण्याचे काम चालू होते. लिज्जत पापडासारखे आपल्या पापडालाही काही नाव असावे म्हणून विचार करू लागले. आमच्या या आदिवासी कन्या म्हणजे शबरीच्या वारसच, म्हणून



पापडांना नाव दिले 'शबरी पापड'. त्यावरूनच पुढे उद्योगालयालाही नाव मिळाले 'शबरी उद्योगालय'.

## पूर्वप्राथमिक प्रशिक्षण

कोसबाडला आदिवासी मुलांच्या शिक्षणाबाबत प्रयोग चालले होते. त्याबरोबरच खेडेगावात काम करणाऱ्या शिक्षकांचे प्रशिक्षणही चालू होते. प्री-पी० टी० सी० वर्ग बोर्डीला चालू होता तो १९५९ साली बंद झाला. कारण संख्या फारच रोडावली. पण लगेच समाज कल्याण बोर्डातर्फे ग्रामसेविकांचा वर्ग सुरू झाला. त्याबरोबरच त्यांच्यातर्फे एक्स्टेंशन कार्यही सुरू झाले. त्याला आता 'बाल कुटुंबकल्याण योजना' असे नाव आहे.

ग्रामसेविका वर्गासाठी बोर्डातर्फे एक अभ्यासक्रम होता. त्यात बालवाडी शिक्षकांचे प्रशिक्षणास फार थोडेच स्थान होते. प्रत्यक्षात ग्रामसेविकांस बालवाडी चालविण्याचेच काम करावे लागे. आम्ही बोर्डाने दिलेला अभ्यासक्रम घेतलाच पण त्याबरोबरच बालवाडी प्रशिक्षणासाठी जोर दिला.

एक्स्टेंशन प्रोजेक्टमध्ये आम्हांला मुख्य ५ गावे व त्यांची ५ उपगावे दिली होती. ५ ग्रामसेविका, १ उद्योगशिक्षिका, १ मुख्य सेविका, १ क्लार्क, ३ दाया, असा सगळा कर्मचारीवर्ग दिमतीला होता. जीप पण होती. या कामासाठी मी दहा गावे सतत हिंडत होते. ग्रामसंपर्क साधणे, पुढारी बंधुभगिनींच्या मदतीने गावात बालवाडी, महिलाकेंद्र, साक्षरतावर्ग वगैरे सुरू करणे, महिलामंडळांसाठी निरनिराळे कार्यक्रम आयोजित करणे, वगैरे गोष्टी झाल्या. आपोआप सुचत गेल्या. एक प्रकारे माझेच प्रशिक्षण झाले! या कामामुळे डहाणू तालुक्यातील प्रमुख गावांची चांगलीच ओळख झाली. वर्षानंतर वरील दोन्ही कामे बंद झाली; पण लगेच ६४ साली 'ग्राम बालसेविका विद्यालय' सुरू झाले.

समाज कल्याण बोर्डाने एक 'चाइल्ड केअर कमिटी' नेमली होती; त्यानिमित्त ताईंनी सबंध भारताचा दौरा केला. त्यांच्या या समितीचा एक मुक्काम कोसबाडला झाला. सभासद भगिनींना आमची बालवाडी फारच आवडली. येथे बालसेविका प्रशिक्षण वर्ग सुरू करावा असा त्यांनी आग्रह धरला. समितीच्या सभासदांपैकी एक श्रीमती पुष्पाबेन मेहता होत्या. त्या ताईंच्या भावनगर येथील बालमंदिराच्या विद्यार्थिनी. त्यामुळे त्यांना त्याविषयी व बालशिक्षणाविषयी खूपच आदर आहे. 'इंडियन कौंसिल फॉर चाइल्ड वेल्फेअर', न्यू दिल्ली, या संस्थेच्या त्या उपाध्यक्षा होत्या.

दिल्लीला चालू असलेला एक बालसेविकांचा वर्ग ताईंनी पाहिला होता. त्या मुली सगळ्या मॅट्रिक पास झालेल्या. हा अभ्यासक्रम संपविल्यावर बालवाडी शिक्षिकेचे काम

करायला हवे; पण बालवाडी शिक्षकाला पगार कमी मिळतो, म्हणून बहुतेक जणी दुसऱ्याच कामाला लागायच्या! खेडेगावांत बालवाडी चालविणाऱ्या निष्ठावंत बालवाडी शिक्षिका तयार करायच्या असल्यास इ० ७ वी (व्ह० फा०) ही शैक्षणिक पात्रता प्रवेशास मान्य धरली पाहिजे, असा ताईंनी आग्रह धरला. बरेच दिवस हो-ना चालले होते. शेवटी ताईंची सूचना मान्य होऊन शहरी व ग्रामीण असे या बालसेविका प्रशिक्षणाचे दोन विभाग पाडण्यात आले. कोसबाड ग्राम बालसेविका विद्यालय हे सबंध भारतात एकमेव होते. ते सरळ मध्यवर्ती कार्यालयाकडून चालविले जाते. (३ वर्षांमागे गुजरात व आसाम येथे आणखी अशी २ ग्राम बालसेविका विद्यालये सुरू झाली आहेत.)

ग्राम बालसेविका विद्यालयाने ५० मुलींची निवड करायची. ११ महिन्यांचा काळ. मुलींना ५० रु० महिना पाठ्यवेतन मिळत असे. प्राचार्य व मुख्य विषयाचे तीन शिक्षक, क्लार्क, शिपाई, चौकीदार, असा कर्मचारी समुदाय आहे. मीच प्राचार्यांचे काम केले पाहिजे, असा पुष्पावेन यांचा आग्रह पडला. ६४ सालापासून आजतागायत ते काम माझ्याकडे आहे.

नेहमीप्रमाणे आखून दिलेल्या अभ्यासक्रमाची मूळ चौकट कायम ठेवून योग्य ते फेरफार करण्याचे ताईंचे व माझे काम सुरू झाले. बालसेविकांना भरपूर प्रात्यक्षिके मिळावी म्हणून माझा कल्पना-घोडा सारखा दौडत असायचा. त्यातून बालसेविकांनी चालविलेल्या अंगणवाड्या (आता आपण त्याला 'अनौपचारिक शिक्षणकेंद्रे' म्हणू), महालक्ष्मी जत्रेतील बालसेविकांचे काम, महिलामंडळे, प्रात्यक्षिके, सहली, साधन-निर्मिती वगैरे अनेक गोष्टी सुरू झाल्या आहेत. पूर्ण महाराष्ट्रातून या मुली येतात. गरजू असतात, त्यामुळे ९५% मुली कामाला लागतात. सध्या १७ वा वर्ग चालू आहे. या मुलींच्या मदतीने महाराष्ट्रभर बालवाड्यांचे जाळे पसरले गेले. विशेषतः खेडे-गावांत, डोंगराळ भागांतही या मुली उत्साहाने काम करतात. सध्या बालवाड्यांचा प्रचार खूप झाला आहे. त्यामुळे आमच्या बालसेविका कमी पडू लागल्या आहेत. नुकतीच अमरावती आणि आवारा शहाजहान (जिल्हा उस्मानाबाद) शहरी बालसेविका प्रशिक्षणकेंद्रे सुरू झाली आहेत. तरी पण अजून दोन ठिकाणी अशा विद्यालयांची गरज आहे.

## सकस आहार प्रशिक्षण वर्ग

महाराष्ट्र शासनाच्या ग्राम विकास खात्याने युनिसेफच्या मदतीने महाराष्ट्रात सकस आहार प्रशिक्षण योजना चालू केली. त्यांपैकी महिला प्रशिक्षणाचे एक केंद्र आमच्या संस्थेस देण्यात आले. १० गावांत हिंडून तेथील महिलांना सकस आहार, बाल-पोषण, बाल आरोग्य, परसबागा—वगैरेसंबंधी माहिती द्यायची. या कामासाठी



जीप सर्व खर्चासह मिळाली आहे. प्रात्यक्षिकाची मांडी, प्रोजेक्टर, टाईपरायटर वगैरे सामान पुष्कळ आले. या नव्या कामाने माझा उत्साह दुणावला.

गावात जाऊन प्रशिक्षण करावयाचे, याची विचारचक्रे सुरू झाली आणि नेहमी-प्रमाणे मला पुढचा रस्ता दिसू लागला! गावात जाऊन महिलामंडळाच्या अध्यक्षांच्या भेटी घेणे हे पहिले काम. बहुतेक गावांत महिलामंडळे होती. पण त्यांचे काम असे काहीच नसायचे. काय काम करावे हे त्यांना सुचतही नसे. शहरातल्या महिला मंडळांत खेळण्याचे क्लब, विविध चढाओढी वगैरे चालतात. त्या उपक्रमांना येथे फारसा वाव नव्हता. आकर्षक कार्यक्रम नसल्यामुळे सभेसाठी महिला फारच थोड्या जमायच्या. हळदीकुंकवासारख्या विशेष प्रसंगी उपस्थिती बरी असायची. गणपती-पुढील मेळ्याप्रमाणेच गरब्याचेही संघ आहेत. त्यांच्यात चढाओढी होतात. हा एक सुंदर आकर्षक कार्यक्रम आहे.

## महिलांना उद्बोधक कार्यक्रम

महिला मंडळापुढील ही समस्या लक्षात आली. ग्रामीण परिस्थितीस योग्य व महिलांना उद्बोधक असे कार्यक्रम तयार केले. यात पदार्थांचे प्रात्यक्षिक, पदार्थांची प्रदर्शने, या विषयांस धरून गोष्टी, संवाद, गाणी वगैरे सकस आहार प्रशिक्षणाचे कार्यक्रम आले. बालपोषणाबरोबर बालसंगोपन, बालसंरक्षण, बालशिक्षण आदी कार्यक्रम आले. गावाची स्वच्छता, आरोग्य, व्यसनाला आळा घालण्यासाठी महिलांनी करावयाची कामे, महिलांची व्रते, सांस्कृतिक सण व त्यांचा चालू परिस्थितीशी मेळ वगैरे विषयांवर गप्पागोष्टी, चर्चा, क्वचित व्याख्यानेही होऊ लागली. चढाओढीत रांगोळ्या, वक्तृत्व, लेखन, वाचन, मुलांना आंघोळी घालणे, मुलींच्या ठराविक वेळात वेण्या घालणे वगैरे गोष्टी आल्या.

आमची ही प्रदर्शने एवढी गाजलेली होती की कित्येक ठिकाणी वार्ताहर, फोटो-ग्राफर वगैरेही आले. महालक्ष्मी जत्रेतील चैत्रगौर हे सकस आहाराचे एक चांगले प्रात्यक्षिक ठरले आहे. गौरीच्या जवळच्या पायरीवर संपूर्ण अन्नाचे ताट, नंतरच्या पायऱ्यांवर क्रमाक्रमाने उकडलेले, भाजलेले, कच्चे, वाळवलेले, खारवलेले वगैरे पदार्थ; सूप, खिरी, पन्हे, सरबत वगैरे पेये; आणि शेवटी जमिनीवर तळे—त्यात मासे, जवळ कोंबड्या. ही गौर सर्वांना आवडते.

दहाही गावांतील महिलांच्या अंगी उत्साह संचारला. या अनुभवाचा फायदा मी आमच्या बालसेविकांच्या मार्फत कोसबाड परिसरातील १० आदिवासी पाड्यांत महिला मंडळे काढून त्यांना दिला. या कार्यक्रमाच्या पावत्या मला दोनदा मिळाल्या : १. नरपड येथे सबंध तालुक्याचा महिला मेळावा होता. त्यात तीन ग्रामीण भगिनींनी ५।५ मिनिटांची सकस आहार विषयावर भाषणे केली. २. आदिवासी

महिला मंडळातील भगिनी उभ्या राहून आपल्या अडचणी सांगू लागल्या. अध्यक्षांची सूचना करणे व आभार मानणे ही कामे करू लागल्या.

### प्रबोधिका

या सर्व अनुभवाचा परिपाक म्हणून १९७६ च्या जानेवारीत महिला वर्षानिमित्त झालेल्या ठाणे जिल्हा महिला परिषदेच्या वेळी 'प्रबोधिका' ही खास महिला-मंडळांना मार्गदर्शक अशी पुस्तिका मला प्रकाशित करता आली. या पुस्तिकेत अनेक अनुभवी महिला कार्यकर्त्यांचे उपयुक्त विषयांवर लेख संपादित केले आहेत, महिला-मंडळाचे कार्यक्रम काय असावेत याची सूची दिली आहे आणि ५०।६० महाराष्ट्रीय महिलांचे खेळ दिले आहेत.

सकस आहार प्रशिक्षणाच्या या कार्यक्रमात सौ० सरोजा परुळकर हिची मला खूप मदत झाली. तान्ही मुलगी घरी ठेवून दिवसच्या दिवस ती माझ्याबरोबर बाहेर असायची. तिची हसरी, खेळकर वृत्ती, सहज समजावून सांगण्याची कला आणि सगळ्या गोष्टींमध्ये प्रावीण्य, यामुळे ती महिलांची फार आवडती झाली होती.

### शक्ती देणारे जेवण

या सकस आहार प्रशिक्षणाचा दुसरा भाग म्हणजे निरनिराळ्या ब्लॉकमधील महिलांचे सात दिवसांचे प्रशिक्षण. त्यासाठी आमच्याकडे निरनिराळ्या जिल्ह्यांतून महिला आल्या. अगदी अंगठेबहाद्दर बाईपासून एस० एस० सी० अगर महाविद्यालयीन शिक्षण घेतलेल्या महिला एकाच गटात असायच्या. विषय शिकविणाऱ्यांची कसोटीच! शक्य तितक्या सोप्या भाषेत प्रयोगांच्या द्वारे शिकवणे हे सूत्र आम्ही ठरविले होते. याची पावती पण मिळाली. भोरवाडा येथे सकस आहार प्रकल्पाचे उद्‌घाटन झाले त्या वेळी उद्‌घाटक मंत्रीमहाशयांनी एका निरक्षर महिलेस विचारले,

"कोसबाडला शिकून आलात ना? सांगा बघू, सकस आहार म्हणजे काय?"

त्या भगिनीने लगेच सांगितले,

"शक्ती देणारे जेवण!"

या भगिनींसाठी सूचक अशा निरनिराळ्या कसोट्या पण ठेवल्या होत्या. जसे—

"आज जानकीबाईंनी पुरणाची पोळी, पुरणाची आमटी, हरभऱ्याच्या डाळीची चटणी, भजी, असे पदार्थ केले होते. यात काही दोष तुम्हांला दिसतो का?"

भगिनीने विचार करून उत्तर दिले,

"हरभऱ्याच्या डाळीचा उपयोग जास्त आहे. आणि कच्च्या भाजीपाल्याचा उपयोग नाही."



हा वर्ग चालविण्यासाठी निरनिराळे व्याख्याते येत असत. संचलन करणे व व मुख्य भाग संभाळणे हे काम माझे असे. या भगिनींची राहण्याची, जेवणाची व प्रात्यक्षिकांची व्यवस्था श्रीमती सुंदर वाढाण करीत असे. सुंदर वाढाण ही आमच्या रात्रीच्या शाळेत शिकून पुढे प्रशिक्षित बालसेविका झाली. आज ती आमच्या परिसरात पुढारी आदिवासी महिला म्हणून चमकत आहे.

सध्या महिलांचा हा वर्ग त्या त्या गावी जाऊन घ्यायचा असतो. मुदत ३ दिवस. तलासरी येथील फिरत्या कार्यक्रमासाठी मी स्वतः गेले होते. नमुना तयार झाला. आता सौ० शेट्टी, श्रीमती अभ्यंकर, श्रीमती दमणकर ही मंडळी वर्ग चालवितात.

### अंगणवाडी कार्यकर्ता प्रशिक्षण वर्ग

सहा वर्षे वयापर्यंतच्या मुलींचा सर्वांगीण विकास व्हावा, विशेषतः त्यांचे आरोग्य निकोप राहावे व शारीरिक वाढ चांगली व्हावी, या उद्देशाने १९७७ पासून इंटिग्रेटेड चाइल्ड वेल्फेअर प्रोग्रॅम भारत शासनाने युनिसेफच्या मदतीने सुरू केला आहे. जेव्हा दिल्लीहून भारतीय बालविकास समितीच्या (इंडियन कौन्सिल फॉर चाइल्ड वेल्फेअर; I. C. C. W.) कार्यालयातून "हा अंगणवाडीचा प्रशिक्षण वर्ग घेणार का?" अशी विचारणा झाली तेव्हा आम्ही आनंदाने तावडतोब होकार दिला.

प्रत्यक्ष अभ्यासक्रम पाहिला तेव्हा त्यात बालवाडी शिक्षणास फार कमी स्थान आहे असे आढळून आले. जरा वाईट वाटले; तथापि ही योजना आदिवासी वस्तीतून व झोपडपट्ट्यांतून चालणार आहे म्हणून बरेही वाटले. 'अनौपचारिक शिक्षण' या अर्थी बहुधा 'अंगणवाडी' हा शब्द शासनाने स्वीकारला असावा. कारण, आतापर्यंत आमच्या अंगणवाड्यांचा कार्यक्रम शैक्षणिक जगाला ठाऊक झाला होता व सर्वांना तो आवडला होता. हा चार महिन्यांचाच वर्ग असतो. सर्व घडी बसल्यासारखी आहे. त्यामुळे या वर्गासाठी विशेष असे नवीन काही करावे लागले नाही.

समाज कल्याण बोर्डातर्फे २१ दिवसांचे उद्‌बोधनवर्ग, शासनातर्फे आश्रमशाळा, शिक्षकांसाठी १ महिन्याचा वर्ग, असे लहानमोठे वर्ग व शिबिरे नेहमी चालतात. त्यात जरूर तेथे मी मार्गदर्शन करीत असते. विशेषतः मनापासून व स्वतःचे चिंतन करून काम करावे म्हणून मनोभूमी तयार करण्याचे काम मी करीत असते.

### "खेडेगावांसाठी गाणी, गोष्टी हव्यात!"

राज्यशिक्षण–शास्त्र संस्थेच्या शिक्षक प्रशिक्षण मंडळींवर पूर्वप्राथमिक शिक्षकांच्या प्रतिनिधीच्या नात्याने माझी ३ वर्षांसाठी निवड झाली. शैक्षणिक पदवी तोकडी

आणि काम मोठे, मोठ्यांच्या बरोबर करावयाचे, त्यामुळे मी थोडी घाबरले होते. पण ताई म्हणाल्या, "काही नाही, तुम्ही चांगले काम कराल!" एवढी संजीवनी मिळाल्यावर मग काय? उत्साहाने गाडी धावू लागली! डॉ० चित्राताई नाईक (शिक्षणसंचालिका), मधुकरराव चौधरी (शिक्षणमंत्री) आणि श्री० शेष नामले (पूर्वप्राथमिक शिक्षणपद्धतीचे शिल्पकार) अशी उत्तम युती झाली होती. त्यामुळे पूर्व-प्राथमिक शिक्षक-प्रशिक्षणाचा अभ्यासक्रम घडविण्याचे काम अतिशय जोराने चालले होते. मी पूर्ण तयारीने सभेला जात असे. गृहपाठ तयार असायचा. एकदा चित्राताई म्हणाल्या,

"पूर्वप्राथमिक शाळांसाठी, विशेषतः खेडेगावांसाठी गाणी, गोष्टी हव्यात. पण कुठे संग्रह आढळत नाही."

मी लगेच सांगितले,

"या घटकेला अशा पुस्तकांसाठी साहित्य मी आपल्याला देऊ शकते. फक्त कागद हवा. छापून घेण्याची पण मला काळजी नाही. छापखाना आमचा आहे."

चित्राताईंनी या कामासाठी लक्ष घातले. मी केलेले संग्रह चाळून पाहिले. शासनाच्या कोट्यातून, शासनाच्या दराने कागद मिळवून दिला. आणि आमच्या 'शिक्षक मित्र माले'तर्फे बालगीत, बडबडगीत, प्रीतिगीते, गोष्टी भाग दोन, गोष्टी भाग तीन, सकस आहार गीते, आनंद आनंद, छोटीसी नाटुकली, गंमत जंमत, आदी बालवाडी व प्राथमिक शाळेच्या खालच्या वर्गांतील मुलांसाठी आणि शिक्षकांसाठी पुस्तके भराभर निघाली. या पुस्तकांमध्ये मुख्यत्वे 'शिक्षणपत्रिके'तून केलेला संग्रह आहे. मी लिहिलेले बरेच साहित्यही त्यात समाविष्ट आहे. या पुस्तक-संपादनाच्या कामी श्री० मुरलीधर घाटे व त्या वेळी प्रशिक्षण चालू असलेल्या बालसेविका विद्यार्थिनींची मला खूप मदत झाली.

आत्तापर्यंत बालशाळांना, शिक्षकांना, महिला मंडळांना उपयोगी पडतील अशी २५ छोटी पुस्तके आम्ही छापून प्रकाशित केली आहेत. चालना देण्याचे काम चित्राताईंनी केले.

## दिल्लीच्या वाऱ्या

यानंतर आदिवासी मुलांच्या शिक्षणाच्या संबंधात होणाऱ्या निरनिराळ्या परिसंवादांसाठी माझे पुण्यास जाणे-येणे होत आहे. दिल्लीच्या एज्युकेशनल टेक्नॉलॉजीच्या अधिकारी श्रीमती विजया मुळे यांनी एक साधन आणले होते. मुलांनी वाक्ये वाचायची. ती टेप व्हायची. ती मुलांनी पुन्हा ऐकायची. त्यामुळे भाषाशुद्धी होते. हे साधन खेडेगावातील मुले वापरू शकतील काय? असा प्रश्न त्यांच्यापुढे आला. कोणीतरी कोसबाडच्या आमच्या प्राथमिक शाळेत प्रयोग करण्याचे त्यांना सुचविले.



आमच्या मुलांनी हे साधन चांगल्या रीतीने वापरून दाखविले. या निमित्ताने विजयाताईंचा परिचय झाला. तो वाढतच गेला. त्या माझ्यावर फार माया करतात. ताईंच्याच सांगण्यावरून असेल कदाचित, पण 'इन्व्हेन्शन इन एज्युकेशन' या स्कीममध्ये चालू कामात त्यांनी माझे नाव सुचविले. भारतातील एकूण १६ संस्थांमध्ये आमचा समावेश झाला. एकमेकांच्या या संस्थांचे काम पाहण्यासाठी आम्ही तुकडीने निघालो. तुकडी-तुकडीने हिंडलो. त्यात मध्यप्रदेशातील किशोरभारती, नागपूरजवळील कामठी येथील विशेष अभ्यासक्रम राबवीत असणारे मुलांचे हायस्कूल पाहावयास मिळाले. श्री० अप्पा या सर्व प्रवासात माझ्या बरोबर होते. आमच्या निरीक्षण-संभाषणांतून निघणाऱ्या विशेष मुद्द्यांचे टिपण तेच करीत असत.

एक दिवस पत्र आले की 'नॅशनल कौन्सिल फॉर एज्युकेशन, रिसर्च ॲण्ड ट्रेनिंग' (N.C.E.R.T.) या संस्थेच्या कार्यकारी मंडळावर माझी नेमणूक झाली आहे. शैक्षणिक पदवी कमी, इंग्रजी ज्ञान तोकडे, वाचन कमी, असे सर्व असताना या जागी काम करण्याचे एक प्रकारे भाग्य वाटत होते, तर दुसऱ्या प्रकारे अवघडही वाटत होते. या सर्व सभांना मी गेले. श्री० अप्पा बरोबर असायचे. (कामठी येथील विशेष अभ्यासक्रम राबवीत असणारे.) तेथे आम्ही पूर्ण तयारीने जात असू. पण प्रत्यक्षात 'मम' म्हणण्याशिवाय विशेष काम नव्हते. पूर्वप्राथमिक अभ्यासक्रम कमिटीवरही N.C.E.R.T.ने मला घेतले होते. त्यासाठी मात्र आम्ही खूप काम केले. शिवाय नॅशनल कौन्सिल फॉर चाइल्ड वेल्फेअर (I. C. C. W.) च्या परिषदा, परिसंवाद या सर्व कारणांनी गेल्या १० वर्षांत माझ्या दिल्लीच्या खूप वाऱ्या झाल्या. पण अजून आग्रा, मथुरा मात्र पाहिली नाही. अथवा लोकरीशिवाय दिल्लीची कसली खरेदी पण केली नाही.

## अखिल भारतीय पूर्वप्राथमिक संघटना

एन्. सी. इ. आर. टी. च्या कामाचा एक भाग म्हणून पण स्वतंत्र अशी एक संघटना 'ऑल इंडिया प्री-स्कूल एज्युकेशन असोसिएशन' या नावाने चालते. संघटनेमार्फत वर्षातून एकदा अखिल भारतीय स्वरूपाची तीन दिवसांची परिषद कोठे तरी भरते. गेली १५ वर्षे हा क्रम चालू आहे. श्री० नामले, सौ० सरलाताई देवधर ही मंडळी या परिषदेत भाग घेतात. हैद्राबाद येथील परिषदेत मी त्यांच्या-बरोबर गेले होते. एकूण उपक्रम आवडला. सगळे काही इंग्रजीत चालायचे तेवढेच खटकले. पण मी माझे विचार हिंदीत सांगितले. श्रीमती मुरलीधरन् व श्रीमती मीना स्वामीनाथन् या दोघींची ओळख झाली. तिचे रूपांतर गाढ मैत्रीत झाले. हैद्राबादनंतर इंदूर, बडोदे, बंगलोर, अजमेर, भुवनेश्वर वगैरे निरनिराळ्या ठिकाणी या परिषदा झाल्या. बहुतेक सर्व परिषदांना मी उपस्थित होते. पेपर वाचले.

साधनांची प्रदर्शने मांडली. छोट्या परिसंवादांत भाग घेतला. माझे सगळे काम हिंदीतून चालत असे.

बडोदे येथील परिषदेनंतर पाहुण्यांना कोसबाडला बोलावले होते. डॉ० श्रीमती मुरलीधरन् व श्रीमती मीना स्वामीनाथन् यांनी नारळीपाड्याची आमची बालवाडी पाहिली. खूष झाल्या. विशेषतः एक बालसेविका पानावरून रंगाची कल्पना देत होती या गोष्टीचे त्यांनी फारच कौतुक केले. आमच्या शेतकी साधनांचा गवगवा या दोघींनी खूपच केला. परिणामी बंगलोर येथे भरलेल्या अखिल भारतीय शेतकी प्रदर्शनात आम्हांला पहिल्या नंबरचे बक्षिस मिळाले. गुलमोहराच्या शेंगांच्या साहाय्याने 'अंकजीना' हे या प्रदर्शनाचे वैशिष्ट्य होते. हे प्रदर्शन तयार करण्याचे व मांडून, समजावून सांगण्याचे सगळे काम श्रीमती सौ० शेट्टी यांनी केले होते. पुढे 'लो कॉस्ट नो कॉस्ट' या परिसंवादात अप्पांनी भाग घेतला होता. तेथे त्यांची विशेष प्रशंसा झाली.

अखिल भारतीय स्वरूपाच्या या परिषदेचे एक अधिवेशन खेडेगावात आणि ते कोसबाडलाच व्हावे असा श्रीमती मीनास्वामीनाथन् यांचा खूप आग्रह होता. सर्व भारतातून प्रतिनिधी यायचे; त्यांची राहण्याची, जेवण्याची सर्व व्यवस्था व्हायला हवी. एवढी मोठी सभा घ्यायची कुठे? टायपिस्ट, स्टेनो-टायपिस्ट कुठून आणायचे? एक ना दोन, अनेक प्रश्न उपस्थित झाले. विशेषतः पैशांची व्यवस्था काय करायची? सगळ्या बाजूंनी मी भांबावून गेले होते. सहकारी एवढी मोठी जबाबदारी घ्यायला फारसे खूष नव्हते. पण श्री० जयंतराव पाटील यांनी ठासून सांगितले, "ताई, ही परिषद येथेच होऊ द्या—आम्ही सर्व तुमच्या पाठीशी आहोत." मला आधार वाटला. आणि कामाला लागल्यावर लहानापासून मोठ्यांपर्यंत माझ्या सगळ्या सहकाऱ्यांनी मनापासून कामाचा भार उचलला. आर्थिक मदतही महाराष्ट्र शासन व देणगीदार यांच्याकडून आली. आणि संघटनेच्या आयुष्यात व माझ्याही आयुष्यात ही परिषद चिरस्मरणीय झाली. त्याचे मुख्य कारण म्हणजे, प्रतिनिधींना खेडेगावातील बालवाड्यांचे, आमच्या विकासवाड्यांचे प्रत्यक्ष दर्शन झाले. ४०० च्या वर प्रतिनिधी होते. यांना सगळ्यांना बालवाडी, विकासवाडी पाहावयास मिळावी म्हणून आम्ही एकाच प्रकारे कार्यक्रम होईल अशी ५ केंद्रे उभी केली. त्या केंद्रांत काम करणारे शिक्षक, विद्यार्थी व अध्यापक विद्यालयाचे जबाबदार प्राध्यापक या सर्वांची उद्बोधने झाली. वर्गरचना आखून देण्यात आली. साधारण रचना खालीलप्रमाणे होती :

संडास मुताऱ्या — पाळणाघर — बालवाडी — प्रा० शाळा — प्रवेशद्वार

जागेप्रमाणे यात थोडाफार फरक होता. भोवती कमरेएवढ्या उंचीवर काठीचे



कुंपण घातलेले होते. प्रतिनिधी कुंपणाबाहेर उभे राहून अवलोकन करीत असत. शेवटच्या दिवशी चर्चा झाली. झाडाखालच्या या आमच्या विकासवाड्या चांगल्या लोकप्रिय झाल्या.

परिषदेस एक गालबोट लागले. म्हणजे असे की, उद्घाटनाला त्या वेळचे उप-राष्ट्रपती श्री० बी० डी० जत्ती यावयाचे होते. ते मुंबईपर्यंत आले होते, पण ताप आल्यामुळे त्यांना पुढे येता आले नाही. अगदी शेवटच्या घटकेला हा धक्का होता. माझ्या मित्रांना वाटले मी बेशुद्ध वगैरे पडेन की काय! पण क्षणभर विचलित झालेले मन लगेच सावरले—असू द्या, येथे कोण उपस्थित आहेत, त्यातून योग्य व्यक्ती शोधू या, म्हणून मी धैर्याने कामाला लागले. मित्रांना हायसे वाटले. श्री० प्रभुणे यांनी संस्कृतमध्ये ईशस्तवन व स्वागतगीत रचले होते. ते इ० पहिली व दुसरीच्या मुलामुलींनी खणखणीत आवाजात म्हणून दाखवले. ७/८ हजारांचा लोकसमुदाय या आवाजाने मंत्रमुग्ध झाला होता. त्या वेळचे पालकमंत्री श्री० शांतारामभाऊ घोलप यांच्या हस्ते परिषदेचे उद्घाटन झाले. त्या वेळचे मुंबई विद्यापीठाचे कुलगुरू श्री० टोपे यांचाही अवचित लाभ झाला. चर्चा, रंजन कार्यक्रम, भेटीगाठी आदी सर्व कार्यक्रम आखल्याप्रमाणे निर्विघ्न आणि आनंद लुटीत पार पडले. बोर्डीचे आमचे मित्र श्री० मदनराव सावे; सौ० प्रभावती मुळे, चिंचणीच्या सौ० ताई तरडे आदी मंडळींनी भोजनबाजू व्यवस्थित संभाळली होती. निवास व सकाळचा 'बेड टी' याची व्यवस्था कृषि विद्यार्थी, विकासवाडी विद्यार्थी अशा दोन्ही स्वयंसेवकांनी अत्यंत व्यवस्थितपणे केली होती. या सर्व व्यवस्थेवर प्रतिनिधी नितांत खूष होते.

१९५७ साली सुरुवातीस अशीच नू० बा० शि० संघाची दुसरी अखिल भारतीय पूर्वप्राथमिक शिक्षण परिषद झाली होती. त्या वेळीही अशीच सर्व मंडळी मदतीसाठी धावली होती.

## विकासवाडी प्रकल्प : दुसरा टप्पा

संस्थेने हाती घेतलेल्या आदिवासी मुलांचे शिक्षण कसे होईल व त्यांच्या जीवनास ते उपयुक्त कसे ठरेल, या दृष्टीने १९५६ पासून कोसबाड टेकडीवर आम्ही काम सुरू केले. या समस्येच्या पूर्तीसाठीच विकासवाडी या संयुक्त शाळेबरोबरच कुरण-शाळा, उद्योगवर्ग, रात्रीच्या शाळा, अशी पूरक अंगे विकसित होत होती. आजू-बाजूच्या परिसरात बालसेविका त्यांच्या प्रात्यक्षिकासाठी सहा-सहा महिन्यांच्या बालवाड्या चालवीत असत. त्यांचेच रूपांतर पुढे कायम स्वरूपाच्या बालवाड्यांत झाले. परिणामी आज संस्थेच्या ११ बालवाड्या व ४ पाळणाघरे आहेत.

सुरुवातीस इ० पहिलीमध्ये मुले फारच कमी दाखल होत होती. व ती वयाने १०।१२ वर्षे वयाची असत. थोड्याच दिवसांत घरकामाच्या अगर मजुरीच्या

कामानिमित्त ही मुले शाळा सोडून जात. त्यामुळे खालच्या वर्गापासूनच गळती सुरू होत असे. पण १५ वर्षांच्या प्रयत्नांनंतर ही परिस्थिती बदलली आहे. आता इ० पहिलीमध्ये जेमतेम ६ वर्षे पूर्ण वयाची मुले येऊ लागली. पालक स्वतः येऊन शाळेत मुलांची नावे घालू लागले. पहिली ते चौथीपर्यंतच्या वर्गातून प्रत्येकी ४० च्या वर संख्या होऊ लागली. मुलीही मोठ्या प्रमाणात शाळेत येऊ लागल्या. एक प्रकारे समस्या सुटली होती, पण तिने दुसऱ्या समस्येत आपले पाय अडकवले होते.

## शिक्षणाची श्रमाशी सांगड हवी!

साधारण १० वर्षे वयापर्यंत मुले आता इ० चौथी पूर्ण करू लागली, पण त्यामुळे मीठ-मिरचीसाठी थोडी कमाई मुलांनी करावी, ही पालकांची अपेक्षा व घरची जरुरी उभी होतीच. त्यामुळे इ० पाचवीपासून गळती सुरू झाली. वसतिगृहातील मुला-मुलींच्यावरच वरचे वर्ग चालायचे. गावातील मुले हवी असा माझा सारखा ध्यास होता. पालकांची समस्या होतीच. पण पालकांच्या आणखीही दोन लहान अडचणी होत्या :

"समजा, आम्ही मुलांना अडचणी सोसून सातवीपर्यंत शाळेत पाठवले, तर पुढे काय? पुढचे शिक्षण देण्याची आमची ऐपत नाही. सातवीपर्यंत शालेय शिक्षण घेणाऱ्या मुलाला उदरनिर्वाहाच्या दृष्टीने पुढे काही भवितव्य नाही. पुस्तकी शिक्षणामुळे शेती, मजुरी यासारखी कामे त्यांना कमी प्रतिष्ठेची वाटतात—तेव्हा एकूण आयुष्यात तो बेकारच होईल." असे पालकांचे म्हणणे होते.

वरील अडचण लक्षात घेऊनही मुलांना शाळेत पाठवलेच तर पाट्या-पुस्तके, वह्या, गणवेश, सहली वगैरेंसाठी लागणारा खर्च कोठून करणार? ही अडचण होतीच.

यावर उपाय म्हणून आता पाचवी ते सातवीपर्यंत उद्योग-शिक्षण-उत्पादनकार्य सुरू करणे आवश्यक होते. माझ्या मनात याबद्दल खूप खळबळ चालत असे. पण पू० ताईंचे आजारपण वाढत होते. त्यांना शांतता मिळत नव्हती. तरीही प्रेस मशीनवर काम सुरू करून दिले. श्री० शेख यांच्या मदतीने प्लायवुडची खेळणी करणे सुरू केले. येणाऱ्या जाणाऱ्या शिक्षणतज्ज्ञांबरोबर या गोष्टींची मी चर्चा करीत असे. डॉ० चित्राताई नाईक या त्या वेळी शिक्षणसंचालिका होत्या. त्यांना माझे विचार आवडले. नव्हे, हा माझाच प्रकल्प आहे असे समजून शक्य ती सर्व मदत तुम्हांला करीन, असे आश्वासनही त्यांच्याकडून मिळाले. माझी विचारचक्रे जोरात सुरू झाली. प्रकल्प व्यवस्थितपणे कागदावर मांडला. या काळात डॉ० भाटवडेकर यांनी चांगलेच सहकार्य दिले. बौद्धिक आणि आर्थिकही! पहिली तीन वर्षे मी निश्चितपणे काम करावे म्हणून ६ हजार रुपयांची बिनव्याजी ठेव त्यांनी त्वरित पाठवून दिली. प्रकल्प असा होता :

इ० पाचवी ते सातवीपर्यंतच्या वर्गांसाठी तीन व्यवसाय—(१) सुतारकाम, (२) शेतीकाम, (३) शिवणकाम.



मुलांनी वरीलपैकी कोणतातरी एक आवडता व्यवसाय निवडावा व पुढे तीन वर्षे तोच चालू ठेवावा.

शालेय अभ्यास सर्व होईल. वेळापत्रकात थोडासा फरक होईल. रोज दोन तास मुलांनी या कामासाठी द्यावयाचे. प्रशिक्षण व थोड्या प्रमाणात उत्पादन, दोन्ही करावे. कच्च्या मालाचा खर्च वजा जाता राहील ती रक्कम मुलांना शिष्यवृत्ती म्हणून वाटून द्यावी. ही रक्कम फारच कमी असते. कारण वेळ थोडा आणि कला अजून पूर्णपणे हस्तगत झालेली नसते. तथापि, पुस्तके, वह्या यांसारख्या किरकोळ खर्चाची व्यवस्था होते. मुलांचा आत्मविश्वास वाढतो. आणि सातवी पास झाल्यावर पुढे शिक्षण घेण्याची सोय नसल्यास संबंधित व्यवसायातील आस्थेवाईक मंडळी या मुला-मुलींना जरूर काम देऊ शकतील.

बरेच दिवस थोडे थोडे काम चालत असले तरी प्रत्यक्ष उद्घाटन दि० २०-१०-१९७५ रोजी त्या वेळचे राज्य शिक्षणमंत्री श्री० रामनाथ पांडे यांच्या हस्ते झाले. त्या वेळचे ठाण्याच्या जिल्हा परिषदेचे उपाध्यक्ष व शिक्षण सभापती श्री० ठाकोरभाई शाह यांनी या कामात पुढाकार घेतला आहे.

मुलांची गळती १०० टक्के थांबली, हे प्रकल्पाचे सुयश आहे. दोन तुकड्या संपूर्ण अभ्यास संपवून बाहेर पडल्या. सर्व मुले माध्यमिक शाळेत दाखल झाली. एखादादुसरा जाऊ शकला नाही, तो कामाला लागला आहे.

म० गांधींनी सुचविलेल्या जीवन-शिक्षण-पद्धतीवर आधारित ही योजना आहे. फरक इतकाच की या योजनेतील फायदा मुलांना दिला जातो. महात्माजींच्या योजनेतील फायदा संस्थेला द्यावयाचा असे. ठराविक मूलोद्योगच त्यांनी सांगितले होते. येथे परिसरात सहजप्राप्त कच्चा माल व करणाऱ्यांची आवड यांना प्राधान्य आहे.

## युनिसेफ आणि महाराष्ट्र शासन यांचे आर्थिक साहाय्य

हा प्रकल्प युनिसेफला फार आवडला. त्यांचे दिल्लीचे शिक्षण प्रतिनिधी श्री० पिलाई येथे तीन दिवस येऊन राहिले होते. त्यांनी सर्व गोष्टींचा बारकाईने अभ्यास केला. मागास मुलांच्या शिक्षणात या अडचणी ठिकठिकाणी येत आहेत; अशा सर्व ठिकाणी या योजना लागू व्हाव्यात, असे युनिसेफच्या अमेरिकेतील मुख्य कार्यालयातून पत्र आले. आमच्या प्रकल्पासाठी कार्यशाळा बांधावयाची होती. या बांधकामासाठी ४० हजार रु० व यंत्रसामुग्रीसाठी थोडी रक्कम युनिसेफने दिली आहे. महाराष्ट्र शासनाने दरवर्षी ५,००० रु० चालू खर्चासाठी तीन वर्षेपर्यंत देण्याचे नक्की केले आहे. युनिसेफच्या मुंबई कार्यालयाचे अधिकारी श्री० मुळगावकर यांनी या कामी मोलाचे सहकार्य दिले आहे.

## डोंगरीपाडा विस्तार-क्षेत्र

कार्यानुभव—प्रकल्पाप्रमाणेच डोंगरीपाडा येथील विकासवाडी हाही विकासवाडी प्रकल्पाच्या दुसऱ्या टप्प्यातील महत्त्वाचा दुवा आहे.

डहाणू तालुक्याचे त्या वेळचे सभापती श्री० बाबुराव वाघात हे आमच्या रात्र-शाळेचे विद्यार्थी. आपल्या पाड्यावर बालवाडी सुरू करावी अशी इच्छा त्यांनी प्रकट केली आणि सुदैवाने 'महाराष्ट्र स्टेट कौन्सिल फॉर चाइल्ड वेल्फेअर' यांच्याकडून एक पाळणाघर मंजूर झाले. इंडियन कौन्सिल फॉर चाइल्ड वेल्फेअरच्या जनरल सेक्रेटरी श्रीमती प्रमिला पंडित बारूआ यांनी संस्थेला भेट दिली. दळवी पाड्यावरील झाडाखालची बालवाडी व झाडाला बांधलेल्या झोळ्या पाहून त्यांनी ताबडतोब श्रीमती पद्मा काकनूरकर (संघटक चिटणीस, महाराष्ट्र स्टेट कौन्सिल फॉर चाइल्ड वेल्फेअर यांना सांगितले की येथे एक पाळणाघर ताबडतोब द्यावे. पद्मा काकनूरकर या संस्थेच्या हितचिंतक आहेत. त्यांनी लगेच एक पाळणाघर मान्य केले. "बालवाडी नाही तर पाळणाघर! सुरवात तर करू या!" असे म्हणून बाबुरावांचा डोंगरीपाडा निवडला. ते स्वतः आदिवासी आहेत. त्यांनी आपली प्रशस्त झोपडी या कामासाठी विनामूल्य दिली. बडोद्याच्या मातोश्री महाराणीसाहेब श्रीमती शांतादेवी गायकवाड यांच्या शुभहस्ते एका लहान बाळास ११–५–७५ रोजी पाळण्यात घालण्यात आले. हा फार शुभ दिवस होता. कारण लगेच थोड्या दिवसांत स० क० स० बोर्डाकडून बालवाडीची मंजुरी आली. डोंगरीपाड्यावर इ० पहिली व दुसरीच्या वर्गाची पुष्कळ लहान मुले होती. त्यांना कोसबाड टेकडीवर येणे लांबच पडत होते. पाळणाघर व बालवाडी तेथे भरत असल्यामुळे ही मुले तेथेच आपल्या लहान भावंडांबरोबर येऊ लागली व खेळू लागली. त्यांची व्यवस्था करणे जरूर होते. म्हणून हे खालचे वर्गही तेथे सुरू झाले. आमच्या मुख्य विकासवाडी. प्राथमिक शाळेचे हे 'ब' वर्ग होत.

## सर्व एकाच छप्पराखाली

अशा रीतीने पाळणाघर, बालवाडी व प्राथमिक शाळेचे खालचे वर्ग डोंगरीपाड्या-वर भरू लागले. हे सर्व एकाच छप्पराखाली चालावे अशी इच्छा होती. यातही बाबुराव वाघात यांची खूप मदत होती. त्यांनी स्वतःची जमीन झोपडीसाठी देणगी दिली. जि० प० ठाणे यांच्याकडून वांद्रे योजनेतील बंद झालेल्या शाळांपैकी एका शाळेचे पत्रे व काही लाकडे भेट मिळाली. उरलेला खर्च संस्थेने केला, पण त्यापैकी मातोश्री महाराणीसाहेब श्रीमती शांतादेवी यांच्याकडून ३ हजार रु० दान आले. ६०'×२०' लांबी रुंदीची ही झोपडी तयार झाली. कारवीच्या जाळीदार भिंतींमुळे उजेड, वारा यांची चांगली सोय होती. बाबुरावांनी स्वतः उभे राहून झोपडी बांधवून घेतली.



रात्रीचा प्रौढ वर्ग, दिवसाच्या महिला सभा, ग्रामस्थ सभा आदी सर्व कार्यक्रम या झोपडीतच होतात. हे ग्राम–समाज–मंदिरच झाले आहे. आमची विकास-वाडी टेकडीवर आहे. आदिवासींची मुले तेथे बहुसंख्येने असली तरी खुद्द आदिवासी वस्ती मात्र टेकडीच्या भोवती, पायथ्याशी आहे. टेकडीवर त्यांच्या झोपड्या नाहीत. पण डोंगरीपाडा येथे मात्र अगदी आदिवासींमध्ये विकासवाडी सुरू झाली आहे. त्यामुळे विकासवाडीची कल्पना अधिक स्पष्टपणे कळते. राज्यपाल श्री० सादिक अली व श्रीमती शांती सादिक अली यांनी या विकासवाडीस दि० २०-३-१९७८ रोजी भेट दिली आणि आनंद व्यक्त केला.

## आदिवासी शिक्षिका

या विकासवाडीचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे, येथील बालवाडी शिक्षिका आमची ताया वाढाण ही एक आदिवासी शिक्षिकाच आहे! तिने रात्रीच्या शाळेतून शिक्षण पूर्ण केले असून पुढे ती प्रशिक्षित बालसेविका झाली.

## जिवंतपणाचा प्रत्यय

डोंगरपाड्यावरच्या विकासवाड्या पाहून आदिवासी मुलांच्या शिक्षणासाठी अशाच शाळा हव्या असल्याची महाराष्ट्र शासनाची खात्री झाली. आता सहाव्या योजनेत अशा २१ विकासवाड्या दाखल झाल्या आहेत असे ऐकते.

डोंगरीपाड्याच्या आणखी पाठीमागे अगदी डोंगराच्या कुशीतील मंडळींनी अशा शाळांची जोरदार मागणी केली आहे. परिणामी एक पाळणाघर आतल्या भागात नुकतेच सुरू झाले आहे.

विकासवाडी प्रकल्पाच्या दुसऱ्या टप्प्याचा विकास होत आहे. नित्य नव्या समस्या व त्यावर उपाय चालू आहेत. त्यामुळेच संस्थेचा जिवंतपणा प्रत्ययास येत आहे.

## माझे आप्त

१९४५ पासून आजतागायत ग्राम बाल शिक्षा केंद्राशी माझे जीवन निगडीत झाले आहे. या संस्थेच्या विकासात माझा काही वाटा असेल; त्याबरोबरच माझा व्यक्तिगत विकासही झाला आहे! त्याचे श्रेय कामात येणाऱ्या अडचणी, त्यांवर सुचलेले आणि सुचविलेले उपाय व निरनिराळे सहकारी यांनाही आहे.

अगदी बोर्डीपासून आठवण केल्यास कार्यकर्त्यांपैकी श्री० रामभाई पाठक, कै० श्री० भगवतीप्रसाद शेलत, श्री० भाऊसाहेब केळकर, श्री० जयंत शुक्ल, विद्यार्थिनीं-पैकी कु० चंपू राऊत (सौ० काळे), कु० तारा देशमुख (सौ० कणबूर), कु० मालती

वायंगणकर (सौ० कुलकर्णी), कु० सुमती बेंदूर (श्रीमती चंदावरकर), कु० ललिता पै व कुसुम खटाव, कु० शांता लुतिया (सौ० शांता देसाई), सौ० मालतीबाई राऊत यांच्यासारख्या विद्यार्थिनी डोळ्यासमोर उभ्या राहतात. गावोगाव घरे बांधावी म्हणतात, तशी माझी गावोगावी घरे आहेत. विद्यार्थीबंधूंपैकी श्री० राम कदम यांनी मला आतापर्यंत चांगले दमदार सहकार्य दिले आहे.

कोसबाडला पण अनेक कार्यकर्ते आले—प्रत्येकाने विकासातला आपला काही वाटा येथे ठेवला. सुरवातीसच कु० विमल सावे (सौ० राऊत), कु० शालिनी पाटील (सौ० पाटील), कु० ललिता पाटील (सौ० सावे), कु० सरस्वती चुरी (सौ० म्हात्रे) आदी प्रथम विद्यार्थिनी व नंतर कार्यकर्त्या भगिनींची मोलाची साथ होती. श्रीमती शकुताई लिमये यांचा मृदु, प्रेमळ, विनोदी आणि कल्पक स्वभाव, कु० कुंदा कर्वे (सौ० नेने) हिची चपळ, प्रखर कार्यतत्परता याचाही लाभ संस्थेला व मला झाला आहे. माझ्या डोळ्याच्या दुखण्याच्या वेळी बालवाडी शिक्षिका श्रीमती रमाताई पंडित यांनी अत्यंत प्रेमळपणे माझी जपणूक केली आहे. बी० ए० अभ्यासाच्या वेळी लहानमोठ्या सर्वच कार्यकर्त्यांनी मदत केली. पण त्यात सिंहाचा वाटा श्री० अप्पा कोसके यांचा आहे. त्यानंतरही श्री० अप्पा कोसके यांची मला चांगलीच साथ मिळाली आहे. दिल्लीच्या सभा सगळ्या इंग्रजीतून चालणाऱ्या. माझे इंग्रजी कमी. अप्पांचे इंग्रजी एकदम चांगले. त्यामुळे माझे विचार, कल्पना यांचे चांगल्या इंग्रजीमध्ये स्पष्टीकरण करण्याचे काम अप्पांचे ! कल्पना व विचार मुळात चांगले असतील, पण त्यांचा चांगलेपणा अप्पांच्या उत्तम इंग्रजीमुळेच स्पष्टपणे उठून दिसतो. संस्थेने अनेक योजना हाती घेतल्या आहेत. त्या मान्य होतेवेळी खूप मोठा पत्रव्यवहार करावा लागतो; अनेक कागद तयार करावे लागतात. ते सर्व काम अप्पाच करतात. हे काम इतके वाढले आहे की, त्यांचा वेळ याच कामात जाऊ लागल्याने ते आता थोडेसे कंटाळलेही आहेत ! संस्थेला व मला बक्षिसे मिळावीत म्हणून नेमकी संधी साधून योग्य ती कागदपत्रे पुरविण्याची त्यांची सारी खटपट असते. गेली २१ वर्षे ते येथे काम करीत आहेत. त्यामुळे संस्थेच्या सर्व विभागांची शैक्षणिक मूल्ये त्यांना माहीत आहेत. पाहुण्यांना संस्थेचे कार्य समजावून सांगण्याचे काम तेच करतात. त्यांनी मोठ्या वयात बी० ए०, बी० एड० या पदव्या संपादन केल्या, त्याचबरोबर शिक्षणशास्त्राचा खोल अभ्यास केला आहे, चालू आहे. अशा रीतीने सर्व प्रकारे माझे साथीदार म्हणून मला पाठिंबा देणारे, कामात जोर आणणारे अप्पा कोसके सध्या संस्थेचे उपसंचालक आहेत. अप्पा धाकट्या भावाप्रमाणे माझ्यावर माया करतात.

आमच्या अध्यापक विद्यालयाच्या सध्याच्या प्राचार्या सौ० वासंती शेट्टी यांनीही मला खूप मदत केली आहे. बालसेविका वर्गाच्या सुरवातीस त्या बालसेविका



विभागात काम करीत होत्या. त्यामुळे एकूण कार्यपद्धती बसविण्याच्या कामी त्यांचीच मला मोठी मदत झाली. अजूनही त्या विभागाचे अडले-पडले काम त्या बघत असतातच. आमच्या ओ० टी० पी० कार्यक्रमातही त्यांचा प्रत्यक्ष सहभाग आहे. मध्यंतरी काही वर्षे श्री० मुरलीधर वाटे येथे होते. बालसाहित्य व शिक्षणपत्रिका-संपादन या कामांत त्यांची मदत झाली आहे. कुरणशाळा यशस्वीपणे चालविण्यात कु० प्रभा हटकर हिचा नंबर लागेल. कुरणशाळेचे काम सर्वांनीच मनापासून केलेले आहे. कार्यानुभवासाठी श्री० शेख, वसतिगृह व शेतीसाठी श्री० वसंत पाटील, रंजन कार्यक्रमासाठी श्रीमती सिंधू अंबिके, सकस आहारासाठी सौ० सुनीती अभ्यंकर, सहली व शिबिर-संचालनासाठी श्री० राणे, एकशिक्षकी शाळेसाठी सौ० आशा पाटील, रात्रशाळेसाठी श्री० दत्तू धांगडा, आदी प्राथमिक शाळेच्या शिक्षकांचा संस्थेच्या विकासात महत्त्वाचा वाटा आहे. माझ्या सूचनांचा अंमल ताबडतोब करणे हे या विभागाचे वैशिष्ट्य आहे. आणि प्राथमिक शाळा हा आमच्या प्रकल्पाचा गाभा असल्यामुळे माझे मुख्य काम तेथेच असते. बालवाडीच्या शिक्षिकाही आपापल्या परीने काम करीत असतातच. श्रीमती द्वारका पाटील, सुंदर वाढाण, ताया वाढाण, सौ० उज्ज्वल आपटे, सौ० सुलभा बोरगावकर या भगिनी आता चांगल्या अनुभवी आहेत. त्यामुळे दैनंदिन समस्या त्या स्वतःच्या मनानेही सोडवू शकतात. नव्या भगिनीही ठीक काम करीत आहेत.

श्री० अप्पा अमृते यांची मला मोठी मदत आहे. बालसेविकांच्या कामाचा ते आपणहून भार उचलतात. माझ्या आर्थिक कटोकटीच्या वेळी देवासारखे धावून येतात. त्यांचे नावही 'गणेश' आहे. त्यामुळे माझ्या बाबतीत ते सार्थ ठरते ! डॉ० जैन हेही माझे विचार समजून घेतात. त्यांच्याजवळ स्वतःच्या कल्पना आहेत. भरपूर उत्साह आहे. त्यामुळे आमचे चांगले जमते. गेली ४ वर्षे श्री० प्रभुणे येथे आले असून संस्थेच्या कामांत सहभागी होत आहेत. अंगणवाडीच्या कामाचा भार त्यांनी उचलला आहे. डहाणू येथील सौ० कमलाबाई करंदीकर या बोर्डीला संस्थेचे काम सुरू झाले तेव्हापासून आजपर्यंत विद्यार्थ्यांची शारीरिक तपासणी करणे, वैद्यकीय सल्ला देणे आदि कामे विनामूल्य करीत आहेत. बालसेविका विद्यालयाच्या या बऱ्याच वर्षे आरोग्य विषयाच्या प्राध्यापिका होत्या. श्री० बोरगावकर गेली बरेच वर्षे येथे काम करीत आहेत. विनोदी स्वभाव हे त्यांचे वैशिष्ट्य आहे. श्री. दमणकर हे जीप ड्रायव्हर असले तरी त्यापेक्षा पुष्कळ जास्त काम ते करतात. अक्षर चांगले, म्हणून माझे लिहिण्याचे बरेचसे काम करतातच. टायपिंग, हिशेबाची कामे, बाहेरची कामे, निरोप, आदि अनेक गोष्टी ते करतात. संस्थेला त्यांचा फार उपयोग होतो. श्री. लोहार हे घडत आहेत व त्यांना मी घडवीत आहे. प्राथमिक शाळा, नंतर ओ. टी. पी. व आता प्रौढ शिक्षणवर्ग, पर्यवेक्षक, अशी फिरती कामे त्यांच्याकडे आली. ती सर्वच

त्यांनी चांगल्या रीतीने केली. सध्या आमचे लक्ष प्रौढ शिक्षण कार्याकडे केंद्रित झाले आहे. त्यात श्री० लोहार यांचा सिंहाचा वाटा आहे.

संस्थेचे अन्य सर्व कार्यकर्ते आपापली कामे निष्ठेने व समजदारीने करीत आहेत. माझे हे मोठे कुटुंब आहे. मी आजारी पडले तर सर्वच जण माझी काळजी घेतात आणि मला कोठे काही सन्मान मिळाला तर त्या आनंदात सारी मंडळी सहभागी होतात.

माननीय श्रीमती सुलभाताई पाणंदीकर, सौ० कृष्णाबाई मोटे, डॉ० गिरिजाबाई देवळे, श्रीमती गंगूबाई पटवर्धन, सौ० मालिनीबाई परांजपे, श्रीमती मनुताई फडके, आदी ज्येष्ठ भगिनी कै० ताईंच्या पाठीमागे वडिलकीच्या नात्याने मला नेहमी प्रेमळ आशीर्वाद देतात. पाठीवरून ममतेने हात फिरवितात.

श्रीमती सरलाताई देवघर आणि श्री० नामले यांचा स्नेह, सहकार्य, प्रोत्साहन यांविषयी माझ्या भावना व्यक्त करण्यास माझ्यापाशी शब्दच नाहीत!

### श्री० विजय परुळकर

संस्थेला आतापर्यंत अनेक जिवलग मित्र लाभले आहेत. त्यांत श्री० विजय परुळकर यांचे नाव अविस्मरणीय आहे.

कु० मालती वायंगणकर या बी० ए० झालेल्या भगिनी बोर्डीला प्री–पी० टी० सी० प्रशिक्षण घेण्यासाठी आल्या. त्यांना खेड्यातील हे काम इतके आवडले की, पुढे त्यांनी अध्यापक विद्यालयात प्राध्यापिकेचे कामही तेथेच चालू केले. सुदैवाने त्यांच्या मनायोग्य वर मिळून त्यांचा विवाह झाला. संस्थेचे हे जावई डॉ० शरद शं० कुलकर्णी फारच सुशील आहेत. समाजसेवेचे त्यांचे व्रत आहे.

एक दिवस डॉ० कुलकर्णींचे पत्र आले की माझा भाचा विजय परुळकर आणि श्री० विजय तेंडुलकर हे कोसबाडला येत आहेत. पहिल्या विजयबद्दल आम्हांला काहीच कल्पना नव्हती. दुसरे विजय माहीत होते. आम्ही दोघांची वाट पाहिली. श्री० विजय परुळकर यांच्याजवळ कॅमेरा होता. त्यांनी आल्यापासून येथे फोटो घ्यायला सुरवात केली. कुरणशाळा, बालवाडी, प्राथमिक शाळा, अंगणवाडी— सगळ्यांचे फोटो झाले. मग माझी मुलाखत झाली. एके ठिकाणी तीन तास बसून मी त्यांना संस्थेचा त्या वेळपर्यंतचा इतिहास सगळ्या चढउतारांसहित सांगितला. मंडळी दुसऱ्या दिवशी परत गेली. पुष्कळ मंडळी येतात, फोटो घेतात, जातात; आभाराची पत्रे येतात व पुढे तेथेच थांबते. विजयच्या बाबतीत आम्ही असेच धरून चाललो होतो. पण अचानक गोड धक्का मिळाला.

१९७१ साली ताईंचा ८० वा वाढदिवस होता. त्या प्रसंगी श्रीमती माया चिटणीस यांनी एक सुंदर आल्बम ताईंच्या हाती दिला. "हा विजय परुळकर यांनी पाठविला" असे सांगितले. बरोबर एक लहानशी पुठ्ठ्याची डबी पण होती. आल्बममध्ये संस्थेतील निरनिराळ्या विभागांचे सुंदर, रंगीत फोटो होते. ताईंचा व माझा एकत्र फोटो होता. अल्बम मखमली पुठ्ठ्यांचे, सुंदर होते. हा आल्बम म्हणजे आमचा एक बहुमोल दागिनाच ठरला. पुढे एकदा जयंतराव पाटील यांना हा आल्बम दाखविला, आणि बरोबर एक लहानशी डबी असल्याचे सांगितले. त्यांनी डबी पाहिली तर त्या सुंदर स्लाइड्स होत्या. प्रोजेक्टरवर स्लाइड्स बघितल्या. संस्थेच्या सर्व विभागांचे त्यांत दिग्दर्शन होते. फार आनंद झाला.



एक दिवस विजयचे बँकॉकहून पत्र आले. "माझी बायको सौ० सरोजा व मुली तुमच्या संस्थेत वर्ष-दोन वर्ष राहू देत का?" अत्यंत आनंदाने उलटटपाली मी त्यांना होकार दिला आणि सौ० सरोजा चार लहान मुलींसह कोसबाडला आली. तिची धाकटी मुक्ता त्या वेळी ६ महिन्यांची होती. या मंडळींचा वर्ष-सव्वा वर्षाचा येथील मुक्काम हा संस्थेच्या दृष्टीने मोठ्या भाग्याचा काळ होता. सौ० सरोजाने कॉमेंट्रीसह स्लाइड्स अनेक ठिकाणी दाखविल्या. सकस आहार प्रशिक्षणास मदत केली. कोणत्याही कामासाठी केव्हाही ती तयार असायची. तिच्या मुली येथील वातावरणात पूर्णपणे रमून गेल्या. या अवधीत विजय हे दोनदाच थोडया थोडया वेळासाठी कोसबाडला आले. पण तेवढ्या वेळात 'प्रशिक्षण कार्यक्रम' 'बालवाडीतील शैक्षणिक साधनांवरचे खेळ' यांच्या स्लाइड्स त्यांनी घेतल्या. आदिवासी मुले व आमच्या संस्थेतील निरनिराळे प्रसंग यांचे फोटो मोठ्या आकारात करून दिले. विजय हे विकासाच्या मार्गावर असणाऱ्या सोळा देशांत फिरत होते. त्यामुळे आमच्या गप्पा नेहमी 'मुले व शिक्षण' या विषयावरच होत असत. विजयजवळही शैक्षणिक दृष्टी व शैक्षणिक साधने तयार करण्याची कल्पकता व हौस आहे.

विजयचा युनिसेफशी संबंध आहे. त्यांनी दिल्लीला स्लाइड्स दाखवून आमच्या कामाचा बोलबाला केला आणि त्यामुळे युनिसेफच्या डॉ० श्रीमती सिंधुताई फडके, एन० सी० इ० आर० टी०च्या श्रीमती विजया मुळ्ये यांच्याशी आमचा संबंध आला. या भगिनींनी संस्थेच्या कामाला हस्ते-परहस्ते खूप मदत केली. आणि मग दिल्लीच्या अनेक कमिट्यांवर नेमण्याची सूचना करून माझा व्यक्तिगत विकास साधला. डॉ० सिंधुताईंच्या सल्ल्याप्रमाणे आम्ही युनिसेफकडे दोन प्रकल्प पाठविले :

१. 'बालवाडी कशी चालवावी?' या पुस्तकाचे इंग्रजी भाषांतरित पुस्तक छापून प्रकाशित करणे;

२. संस्थेचा इतिहास लिहून काढणे.

दोन्ही कामे चांगली झाली. संस्थेचा इतिहास मान्यवर शिक्षणतज्ज्ञ डॉ० श्रीमती चित्राताई नाईक यांनी आपल्या अनुभवी व सिद्धहस्त लेखणीतून लिहून काढला. त्याचे अनेक तज्ज्ञांनी स्वागत केले आहे. 'बालवाडी कशी चालवावी?' याचे

इंग्रजी भाषांतर श्रीमती मोटे यांनी 'How to Run a Bal vadi ?' या नावाने केले आहे. हे पुस्तकही सगळ्यांना आवडले. बंगाली, सिंहली व तामीळ भाषांमध्ये त्याची भाषांतरे करण्याच्या प्रयत्नात त्या त्या राज्यातील मंडळी आहेत.

युनिसेफचा तिसरा मोठा फायदा आमच्या कार्यानुभव प्रकल्पास मिळाला आहे. त्याचा तपशील पुढे स्वतंत्रपणे येईलच.

श्री० विजय व सौ० सरोजा सध्या पुण्याला आहेत. अनेक सामाजिक कामांत त्यांनी स्वतःला गुंतवून घेतले आहे. पण या संस्थेवर त्यांचे अलोट प्रेम आहे. तिच्या प्रगतीसाठी अजूनही त्यांची धडपड चालू आहे. त्या धडपडीतूनच श्री० आदी पटेल यांच्यासारख्या प्रेमळ मित्रांचा संस्थेला लाभ झाला आहे.

### "गांधारी आहेस तू !"

"बाई, तुम्हांला काही मूलबाळ ?" असा एक प्रश्न मला विचारला जातो. मग मी माझ्या मनाला हाच प्रश्न विचारते. तेव्हा उत्तर मिळते, "तुला खूप मुले आहेत. लेकुरवाळी, गांधारी आहेस तू !"

खरेच! चांदवड-पिंपळगावचे आठवत नाही; पण पुण्याला हुजूरपागेत व अवतीभवती कितीतरी कन्या-पुत्र मी मिळवले आहेत. आणि नंतर बोर्डी-कोसबाडला तर ही संख्या गणितश्रेणीने वाढली आहे. कस्तुरबा ट्रस्टतर्फे भारताच्या कानाकोपऱ्यातून आलेल्या ग्रामसेविका, पी० टी० सी०, प्री-पी० टी० सी०, सोशल वेल्फेअर बोर्डाच्या ग्रामसेविका, बालसेविका, अंगणवाडी सेविका अशा अनेक प्रकारच्या प्रशिक्षण वर्गातील विद्यार्थिनी, या सर्वच माझ्या मुली. प्रत्येक वेळी त्यातील दोनतीन जणी तरी 'मुली'चे नाते लावूनच जायच्या. अगदी चांगल्या शिकलेल्या, वरच्या दर्जाला पोहोचलेल्या, फ्लॅटमध्ये राहणाऱ्या अशा कितीतरी मुली आजही मला प्रेमाने बोलावीत आहेत. 'पळ रे भोपळ्या'तील म्हातारीने आता या लेकींच्या घरी थोडे थोडे दिवस जाऊन राहायचे ठरविले, तरी दहा-पाच वर्षे सहज निघून जातील.

कन्या तसे पुत्रही मिळाले आहेत, पण त्यांची संख्या थोडी आहे. गेली २१ वर्षे कोसबाडला आहे. येथेही मला कन्या व पुत्र मिळाले आहेत. स्थानिक, कोसबाड परिसरातीलच ही मंडळी आहेत.

### माझ्या ताया-सुंदर आणि इतर मुली-मुले

गंगू, गुलाब, सीता, कमळी, संती या सगळ्या येथील आदिवासी कन्या आता चांगल्या मोठ्या, चार-पाच मुलांच्या आया झाल्या आहेत. आपल्या घरी खाऊन-पिऊन सुखी आहेत. राहणी-करणी सुधारलेली आहे. प्रेमाने येऊन भेटतात. "आजीच्या पाया पड" म्हणून मुलांना सांगतात.



आणि आता अगदी जवळ असलेल्या सुंदर वाढाण, ताया वाढाण या तर पोटच्या मुलींपेक्षाही जास्त आस्थेने माझी चौकशी करतात; व्यवस्था ठेवतात. त्या या घरच्याच आहेत, हे घरच्यापासून परक्या पाहुण्यापर्यंत सर्वांनी मान्य केले आहे. ताया-सुंदर-प्रमाणे प्रभा, शेवंती, विमल, विजू अशा कितीतरी स्थानिक कन्या शिकूनसवरून कामाला लागल्या आहेत. बालवाडीत, पाळणाघरात, महिलामंडळात— सर्व ठिकाणी यांचा पुढाकार असतो. रात्रीच्या शाळेत नियमित उपस्थिती असते. माझ्या घरी झोपायचे, आणि सकाळी उठून गुपचूप निघून जायचे, हा त्यांचा आता नित्यनेम झाला आहे.

सुंदर गावचे नेतृत्व करीत आहे. ती पंचायतीची सभासद तर आहेच, पण रोग-निवारण, शेतीला वेळीच बी-बियाणे पुरवठा, कर्जवाटप, कौलेवाटप आदी कामे व्यवस्थितपणे करवून घेण्यातही ती तत्पर असते. आदिवासी पाड्यांवरचे कितीतरी वर्ग तिच्या प्रेरणेने निघालेले आहेत. ती अर्धा-पाऊण तासपर्यंत व्याख्यान देऊ शकते.

ताया कमी बोलते, पण बुद्धिवान आहे. बालवाडी असो की आणखी कोणतेही काम असो, ती व्यवस्थितपणे स्वतःची बुद्धी चालवून ते पुरे करणार. आल्या-गेल्या पाहुण्यांचे गोड व व्यवस्थित आतिथ्य करण्याची हातोटी तिला साधली आहे. ताया नेहमी माझ्याजवळ असते. त्यामुळे माझ्या अनुपस्थितीत येणाऱ्या पाहुण्यांचे सगळे व्यवस्थित झाले पाहिजे, ही ती स्वतःची जबाबदारी मानते.

या सगळ्या मुली स्वयंपाक छान करतात.

मुलींप्रमाणेच स्थानिक परिसरातून पुढे आलेले मुलगेही आहेत. सर्वप्रथम माझ्या रात्रीच्या शाळेत शिकायला सुरुवात करून पुढे एस० एस० सी० आणि कृषि शिक्षणाचा दोन वर्षांचा अभ्यास पूर्ण केलेल्या श्री० बाबुराव वाघात यांचे नाव घ्यायला हवे. स्वतःची उन्नती करता करता जनतेच्या कल्याणाची कामेही त्यांनी अंगावर घेतली, आणि म्हणून तीन वर्षेपर्यंत डहाणू तालुका पंचायतीच्या सभापतिपदाची जागा भूषविली. त्याच वेळी आमच्या डोंगरपाड्यावरचा आदर्श विकास वाडीचानमुना प्रस्थापित झाला. त्याचे ७५ टक्के श्रेय बाबुरावांना आहे.

श्री० दत्तू धांगडा, श्री० नवशा टाक, श्री० चंद्रकांत टाक, श्री० मधुकर ढाक आदी वारली जमातीचे स्थानिक बंधू बालवाडीपासून आमच्याकडे शिकले. आता यशस्वी व कामसू शिक्षक म्हणून जिल्हा परिषदेत व आमच्या संस्थेत काम करीत आहेत. श्री० सपजी ढाक एक चांगले दुकानदार झाले आहेत. श्री० बारक्या ढाक, श्री० अनंता ढाक, श्री० सदू वाघात ही मंडळी कुशल कारागीर झाली आहेत. हे सगळे मला पुत्रवत आहेत.

शिवाय बालवसतिगृहात इयत्ता ५ वी अगर ७ वी पर्यंत शिकून नंतर पुढे आपले शिक्षण अगदी महाविद्यालयापर्यंत नेणारेही काही पुत्र आहेत. त्यांत श्री० जयप्रकाश

जाधव याचे नाव प्रामुख्याने घ्यायला हवे. नाशिक येथील फौजदारी प्रशिक्षण त्याने घेतले. आणि आता पोलिस इन्स्पेक्टर म्हणून काम करतो. सॅनिटरी इन्स्पेक्टर, बस ड्रायव्हर, कंडक्टर म्हणून बरीच मंडळी कामाला लागली आहेत. अवचित कोठेतरी भेटतात. "ताई" म्हणून हाक मारतात. मग धन्य वाटते!

अशा तऱ्हेने अनेक कन्या-पुत्रांची मी माता आहे.

## आमचा अर्थव्यवहार

कै० ताईंनी मुंबई येथे शिशुविहारास सुरुवात केली, तेव्हापासून आजतागायत पैशांची चिंता ही चालूच आहे. मुंबईला शिशुविहारात मुलांकडून फी येत असली तरी ती नाममात्र होती. सरकारी अनुदान नव्हतेच. तेव्हा तुटपुंज्या पगारावर काम करणारे कार्यकर्ते त्यांनी मिळविले. स्वतः सकाळपासून संध्याकाळपर्यंत त्या काम करीत असत. शिशुविहारच्या शिक्षिका, अध्यापन मंदिराच्या शिक्षिका व प्राचार्या, तीन भाषांतील 'शिक्षणपत्रिके'च्या संपादिका, प्रचारिका, नू० बा० शि० संघाच्या चिटणीस आदी अनेक भूमिकांतून त्यांची कामे चालत असत. त्यांचा पगार मात्र द० म० १०० रुपयेच होता. एकूण, संस्थेला आर्थिक ताण पडतच होता. त्यासाठी तेथेही शिशुविहारच्या मुलांचे रंजन कार्यक्रम, एखादी चांगली गाण्याची बैठक, अशासारखे कार्यक्रम त्यांना घ्यावे लागत.

## विनामूल्य शिक्षण

बोर्डीला आल्यावर ही आर्थिक टंचाई अधिक भासू लागली. कारण, तेथे फी मुळीच नव्हती. गावातल्या बालवाडीसाठी गावाने वर्गणी करून पैशांची सोय करावी, पालकांकडून त्याच्या पाल्याची फी म्हणून पैसे घेऊ नयेत, असे त्यांचे म्हणणे होते. कारण, ज्यांच्याजवळ ऐपत नाही अशा गरीब घरातील मुले पूर्वप्राथमिक शिक्षणापासून वंचित राहतात, त्यांना तर बालवाडीची अधिक आवश्यकता असते, या ताईंच्या सिद्धांतानुसार मुलांकडून फी घेतली जात नव्हती.

## भात विकून दान जमा

गावाने सबंध बालवाडीचा खर्च पेलण्याइतकी गावाचीही कुवत नव्हती. आम्ही त्यासंबंधी प्रचार केला होता. यथाशक्ती साहाय्य मिळत होते. कोणी चिकू पपया केळी पाठवीत असत, तर कोणी तोंडली–मिरची आदी भाज्या पाठवीत असत. कोणी कोणी दोन फरे, पाच फरे भात देत असत. (फरे हे त्या वेळचे माप आहे. फरा म्हणजे पाच पायल्या असाव्यात.) भात तयार होई त्या वेळी मी खळ्याखळ्यावर बैलगाडी व पोती घेऊन गेले आहे. आम्ही तो भात विकून येतील ते पैसे दान म्हणून जमा घेत असू. पण एवढ्याने काही भागत नव्हते.



## हस्ते-परहस्ते मदत

मुंबईच्या मित्रांकडून यथाशक्ती दान गोळा करावेच लागे. त्या वेळच्या नू० बा० शि० संघाच्या व्यवस्थापक मंडळामध्ये आर्थिक दृष्ट्या बऱ्या असणाऱ्या अशा चारपाच समाजसेविका होत्या. येणारी वार्षिक तूट त्या सगळ्या मिळून वाटून घेऊन पूर्ण करीत असत. श्रीमती सरलादेवी साराभाई यांचा त्यात मोठा वाटा असायचा. श्रीमती बाबीबेन मूळजी दयाळ, श्रीमती सरोजबेन योध, श्रीमती कपिलाबेन मेहता, श्रीमती ताराबेन प्रेमचंद आदी भगिनींचेही पुष्कळ आर्थिक साहाय्य होते. हस्ते-परहस्ते ही मंडळी मदत करीत असत.

## एक आणा निधी

पहिल्या वर्षी ग्रा० बा० शि० केंद्राचा वार्षिक खर्च साडेसात हजार रुपये झाला. ते सर्वच्या सर्व श्रीमती सरलादेवींनी दिला. पुढे दिवसेदिवस काम वाढत गेले तसा खर्चही वाढत गेला. तेव्हा आणखी प्रयत्न करणे जरूर होते. नू० बा० शि० संघाने दरवर्षी पाच हजार रुपये या केंद्राला द्यायचे ठरवले. त्यासाठी श्री० नामले (त्या वेळचे चिटणीस) यांनी गिजूभाई जयंती निधी सुरू केला. 'एक आणा निधी'. त्यासाठी पुष्कळ फिरावे लागे. जमा होईल तो निधी संघाच्या मुख्य कार्यालयात जाई. तेथून ग्रा० बा० शि० केंद्राला काही पैसे व संघाच्या इतर कामांना काही पैसे, अशी वाटणी होत असे.

## पहिली दीक्षा

१९५१ साली नू० बा० शि० संघाला २५ वर्षे पूर्ण होत होती. रौप्यमहोत्सवाची एक अनोखी रीत म्हणून ठिकठिकाणी बालशिक्षण नगरे भरवून बालशिक्षणाचा प्रचार करण्यात आला, हे यापूर्वी सांगितले आहेच. त्याच वेळी संघाच्या विविध कामांसाठी निधी गोळा करण्याचे काम पण चालले होते. मला स्वतःला फंडासाठी कोणापुढे हात पसरणे ही गोष्ट फारच अवघड वाटत होती. मी ताईंना सांगितले, "माझ्याकडून १२ च्या ऐवजी १५ तास येथे काम घ्या. पण पैशांसाठी कोणापुढे हात पसरायला सांगू नका!" ताई आमच्या फार कडक गुरुजी! त्या म्हणाल्या, "तुम्हांला फंड गोळा करण्याचे काम करावेच लागेल." नंदुरबारला बालशिक्षण-नगर झाले; तेथून ५०० रु० गोळा व्हायलाच हवेत, असा ताईंचा आदेश. मी नंदुरबारला डॉ० भट यांच्या घरी १५ दिवस राहिले. जंग जंग पछाडले. पण ५०० रु० होईनात. शेवटी अक्षरशः तांबोळ्यांसारख्या लहान लहान दुकानदारांकडून चार-आठ आणेही गोळा केले. ठरवलेली रक्कम पूर्ण झाल्यावर मी तेथून हलले. फंड गोळा करण्याची माझी ही पहिली दीक्षा होती. त्यानंतर भिवंडीहून ११०० रु० आणले. त्या वेळी रौप्यमहोत्सव

निधीसाठी ठिकठिकाणाहून येत असणाऱ्या रकमेत ही रक्कम मोठी आहे असे कळले. बरे वाटले. तरी पण या कामात मी एकूण कच्चीच आहे.

## दानावरच भिस्त

बोर्डीचा संस्थेचा आर्थिक प्रपंच असा चालला होता. दरवर्षी दोन-तीन हजाराची तूट यायची. ती मित्रमंडळी पूर्ण करीत असत, पण दरवेळी ताईंना त्यासाठी घरचे आहेर मिळत! ते सोशिकपणे सहन करावे लागायचे. बोर्डीला बालवाडीसाठी वार्षिक तीन हजार रुपयांचे अनुदान ५४ सालापासून सुरू झाले. पूर्वप्राथमिक अध्यापन मंदिरास ५० टक्के अनुदान मिळत असे. कस्तुरबा ट्रस्टकडून फक्त प्रत्येकी १० रु० प्रमाणे प्रवेश फी येत असे. नक्की येण्यातले पैसे हे एवढेच. बाकी सर्व भिस्त दानावर होती.

## ताईंवरील आर्थिक ताण

बोर्डीच्या प्रायोगिक विकासवाडीपासूनच आर्थिक तणाव वाढत केला. हा प्रयोग विस्तृत प्रमाणात व्हावा म्हणून ताईंनी 'विकासवाडी योजना' तयार केली. ती अडीच लाखांची होती. त्यात स्वतःचे सव्वालाख रुपये घालावे लागणार होते. रक्कम फार मोठी होती. ताईंचे वय त्या वेळी ६३ वर्षांचे होते. नू० बा० शि० संघाची मंडळी हादरली. ताईंनी या वयात एवढी मोठी जबाबदारी घेऊ नये, कामाचा विस्तार वाढवू नये, असे त्या सर्वांचे प्रामाणिक मत होते. बरेच दिवस ऊहापोह चालला होता. अर्ज पुढे जाण्यासाठी नू० बा० शि० संघाची संमती अवश्य होती. शेवटी आर्थिक जबाबदारी ग्रा० बा० शि० केंद्राची—म्हणजेच ताईंची—राहील, असा स्पष्ट ठराव होऊन 'विकासवाडी योजना' राबवण्यास नू० बा० शि० संघाची संमती मिळाली. अशा योजनेस ६६ टक्के केंद्र शासनाकडून, १७ टक्के राज्य शासनाकडून व राहिलेले १७ टक्के जी स्वयंसेवी संस्था काम करणार आहे त्या संस्थेकडून खर्च व्हावे, असा नियम आहे. पैकी १७ टक्क्यांसाठी ताईंच्यावर व्यक्तिशः जबाबदारी आलीच. महाराष्ट्र शासनालाही ही योजना फारशी वास्तविक व व्यवहार्य वाटली नाही. त्यामुळे, स्वतःचा १० टक्के हिस्सा भरण्याची शासनाची तयारी नव्हती. तेथेही ताईंनी तोंडी आश्वासन दिले की, पैसे आम्ही गोळा करू. नियमाप्रमाणे अर्ज आपल्यामार्फत पुढे जाऊ द्यावा. ताईंच्या व्यक्तिमाहात्म्यामुळेच महाराष्ट्र शासनानेही ऐकले. पण आता ताईंच्यावर ३४ टक्क्यांची जबाबदारी आली. योजना घडविताना इमारतींचे खर्चपत्रक तयार केले होते ते ५४ साली, आणि योजना प्रत्यक्ष कार्यान्वित झाली १९५६ च्या शेवटी! तेवढ्या अवधीत लाकूड, सिमेंट, विटा, सर्वांचाच भाव वाढला. त्यामुळे ६६ टक्के अनुदान प्रत्यक्षात ५० टक्क्यांच्याच घरात आले.



## मित्रमंडळी धावून आली

अशा सर्व बाजूंनी ताईंच्यावर आर्थिक दडपण येत होते. ज्या विकासवाडीचे काम आज देशाने मान्य केले आहे, त्या विकासवाडीच्या जन्माच्या वेळी ताईंना इतक्या आर्थिक यातना सहन कराव्या लागल्या! ताई खंबीर होत्या. त्यांची पुण्याई मोठी होती. अनेक मित्र सगळीकडून धावून आले. त्यांत घोलवडच्या श्रीमती खोरशेदबेन मिस्त्री आणि बोटीशेट प्रमुख आहेत. "घाबरू नका, आपण तीन लाखही मिळवून आणू!" असे बोटीशेट यांचे उद्‌गार आजही मला ऐकू येत आहेत! श्रीमती सरोजबेन योध यांनी पण कंबर बांधली होती. ताईंचे भाचे श्री० बाबा गद्रेही पुढे सरसावले. त्या वेळी येणाऱ्या मोठ्या रकमांमध्ये श्री० रुईया–दहा हजार रुपये, हैदराबाद नबाब–दहा हजार रुपये, बोटीशेट व मंडळी–चार हजार रुपये, श्री० मंगळदास सॉलिसिटर फर्म (म्हणजेच श्रीमती कपिलाबेन मेहता)–चार हजार रुपये, म० गांधी स्मारक निधी–पंचवीस हजार रुपये अशा आहेत. बासदा महाराज–चार हजार रुपये, ससून डेव्हिड ट्रस्टमार्फत–सहा हजार रुपये, श्रीमंत मातोश्री महाराणीसाहेब (बडोदे) यांच्याकडून पाच हजार रुपये. त्याखेरीज हजार, दोन हजार, पाचशे, शंभर असे आकडे अनेकांनी घातले आहेत! दाराबशा ट्रस्टकडून अधूनमधून पैसे अजूनही येत आहेत.

अशा रीतीने सर्व बाजूंनी मित्रमंडळी धावून आली, म्हणून मुळात खाचखळगे आणि झाडेझुडपे यांनी भरलेल्या कोसबाड टेकडीवर विकासवाडीच्या आजच्या इमारती डौलाने उभ्या आहेत. विहिरी व अन्य व्यवस्था उपलब्ध आहेत.

## चॅरिटी शो आणि सोविनियर

इतकी मित्रमंडळी गोळा झाली तरीही सर्व खर्च भागणे शक्य नव्हते. केंद्र शासनाने ५३००० रु० कर्ज वसतिगृहांच्या मदतीसाठी मंजूर केले होते. ते बिनव्याजी होते, पण पुढे शासनाच्या नियमाप्रमाणे त्यावर द० सा० द० शे० ४ टक्के व्याज आकारले जाऊ लागले. ते माफ करण्याच्या खटपटीत बराच वेळ गेला. परिणामी कॉन्ट्रॅक्टरचे ४२००० रु० व इतर मंडळींचे काही मिळून सत्तर हजार रुपयांचे देणे बोकांडी बसले. ताईंची व माझी झोप उडाली. रात्रीच्या रात्री आम्ही एकमेकांशी याच चिंतेविषयी बोलत काढल्या. मुंबईसही ताई आपल्या मित्रांजवळ चिंता व्यक्त करीत होत्या. तेव्हा कोणीतरी 'चॅरिटी शो' व त्यास जोडून 'सोविनियर' काढण्याची कल्पना मांडली व ती पुढे चालू झाली. प्रत्येक वेळी सोविनियरमधूनच जास्त पैसे मिळाले. पण कार्यक्रमाची शंभर शंभर रुपयांची तिकिटे घेणारेही पुष्कळ दाते मिळाले. सोविनियर-साठी जाहिराती मिळवणे, सोविनियर वेळेवर व आकर्षक रीत्या छापून घेणे या दोन्ही गोष्टी कटकटीच्या असतात. श्रीमती सरोजबेन योध व श्रीमती शीला गांधी या भगिनींनी अत्यंत प्रयत्नाने जाहिराती गोळा केल्या आहेत. सौ० सरलाताई देवधर,

सौ० कमलाताई शेवडे, सौ० कु० मोटे या मंडळींची खटपट पण यात सहभागी आहे. सौ० सरलाताई व शिशुविहार कार्यकर्ते हे दरवेळी अत्यंत आपलेपणाने तिकीट-विक्री व दान मिळविणे यांसाठी पुढे येतात. आताचे संस्थेचे मॅनेजिंग ट्रस्टी श्री० ढवळीकर यांनी निधी जमा करण्याच्या कामात चांगले लक्ष घातले आहे. डहाणू येथे विविध रंजन कार्यक्रम व पुणे येथे एक नाटिका मदतीसाठी घेतली होती.

## साहाय्यक मित्र योजना

तेव्हा सुरुवातीच्या सत्तर हजार रुपये कर्जामुळे सुचलेल्या या प्रयत्नातून, दर तीन-चार वर्षांनी मुंबईस जाऊन एखादा कार्यक्रम घेण्याची वहिवाटच पडून गेली! पण तेवढ्याने भागणारे नव्हते. कारण विकासवाडीच्या कामात अनुदानात न बसणारे पण योजनेच्या दृष्टीने आवश्यक असे पुष्कळ खर्च असतात. त्यामुळे दरवर्षी तुटीचा आकडा वाढतच जातो. मग नेहमीसाठी म्हणून अन्य काही योजना कराव्या लागल्या. दरवर्षी ५, ११, २५, ५१, १०० रु० देणारे 'साहाय्यक मित्र' ही एक अशीच योजना आहे. श्री० मुरलीधर तथा अण्णा घाटे ही योजना राबवण्यासाठी खूप हिंडले आहेत. त्यांना सौ० प्रमिलाताई भट यांनी मदत केली. अण्णा त्यांच्याकडे गेले की त्या पत्त्यासह यादी पुढे टाकीत व आपण स्वतः लगेच त्या त्या व्यक्तींशी फोनवर बोलत. अण्णा व त्यांच्या पत्नी सौ० सरस्वतीबाई तथा ताई या दोघांनी मग ते पत्ते हुडकून काढायचे. या दोघांना कोणीच विन्मुख पाठविले नाही. एक हजार साहाय्यक मित्र बनविण्याचा अण्णांचा संकल्प होता. या कामी त्यांना श्रीमती रजनी दांडेकर, सौ० कमलाताई नेने, सौ० मीनाक्षी आपटे यांनी पुष्कळ मदत केली आहे. योजना चांगली आहे; पण एकदा मित्र झाल्यावर दरवर्षी केवळ स्मरण-पत्र पाठविण्याने भागत नाही. पुन्हा स्वतः जावे लागते. मग जाणे-येणे वगैरे गोष्टींवर होणारा खर्च वजा जाता फार थोडे पैसे शिल्लक राहतात. तरीही अण्णांनी पाचशे साहाय्यक मित्र केले होते. पुढे अण्णा त्यांच्या मूळच्या गावी बेळगुंदी येथे गेले. त्यामुळे हे काम आता थंडावले आहे. आपण होऊन दहा-पाच मित्र आठवणीने पैसे पाठवतात. त्यांत श्री० भाऊसाहेब संत (पुणे), श्रीमती माडगावकर (पणजी, गोवा), सौ० सरलाताई देवधर ही मंडळी विशेष आहेत. अहमदाबादेहून श्री० भास्करराव विद्वांस यांचे नियमितपणे दरवर्षी एक हजार रुपये दान येते. तसेच श्री० रामराव मंकीकरांकडून दरवर्षी एक हजार रुपये येत असत. पण त्यांनी आता आपला कारखाना विकून आलेले सगळे पैसे—तीस हजार रुपये—ठेव म्हणून आमच्या छात्रखान्याला दिले आहेत.

मुंबईस दादरला शिशुविहाराची मंडळी जशी संस्थेला आर्थिक मदत पोचविण्यात तत्पर आहेत तशीच पार्ले येथे सौ० वेणूताई जोशी व त्यांच्या सहकारी, सौ० वैजयंती



नागपूरकर व मैत्रिणी, सौ० नलुताई साठे व मैत्रिणी, सौ० प्रतिभाताई लेले व मैत्रिणी, ही मंडळीही आस्थेने मदत पोचवितात. त्यांत पैसे, कपडे, पाट्या-पेन्सिली वगैरे सगळे येते.

## सावरणारे हजारो हात

प्रसंगा-प्रसंगाने पाच हजार रुपयांपासून पाच रुपयांपर्यंत दान देणारे अनेक दाते आहेत. पू० श्री० काकासाहेब कालेलकर, श्रीमती सुलभाताई पाणंदीकर यांच्यासारख्या पूजनीय व्यक्ती आहेत. श्रीमती सुहासिनी मुळगावकर यांनी स्वतः येथे येऊन संस्थेच्या कामाची फिल्म घेतली. ती टी० व्ही० वर दाखविण्यात आली. त्यामुळे संस्थेची माहिती अनेकांना समजली. श्रीमती पद्मजा फाटक यांचा हा प्रयत्न आहे.

संस्थेचे लहान मोठे विद्यार्थी दरवर्षी चार चार आणे निधी गोळा करीतच असतात. गेल्या वर्षी दिवाळी खाऊ म्हणून १ रु० निधीची योजना काढली.

अशा अनेक मार्गांनी ग्राम–बाल–शिक्षा केंद्रास आर्थिक हातभार लावणारे अनेक मित्र आहेत. हे केवळ कामाचे महत्त्व ओळखून मदत करणारे आहेत. हजारो हातांनी सावरलेली ही इमारत सतत अशीच उभी राहावी, ही इच्छा आहे.

संस्थेचे काम प्रायोगिक स्वरूपाचे आहे. सगळे प्रयोग प्रथम करून पाहायचे, करून दाखवायचे आहेत. त्यामुळे खूप खर्च होतो. आमची कुरणशाळा, आमचे सतत २२ वर्षे चालणारे रात्रीचे वर्ग या सर्वांचा खर्च संस्थाच करते. ३५० मुलांचा दुपारचा खाऊ संस्थेला द्यावा लागतो. एक ते सात इयत्तांपर्यंत असणाऱ्या या शाळेतील मुलांना पाट्या, पेन्सिली, वह्या, कंपासबॉक्स—सगळेच शाळेने पुरवायचे असते. अ-मान्य असे काही शिक्षकही नेमावे लागतात. परिणामी संस्थेला दरवर्षी २५००० रु. पर्यंत तूट येते. शासनाची संपूर्ण सहानुभूती आहे. त्याच्या मर्यादेतील अनुदान येते. समाजकल्याण बोर्डाकडून बालवाड्यांना आता खाऊ मिळू लागला आहे. तरीही कित्येक अनिवार्य खर्च आहेतच. म्हणूनच म्हणते की आतापर्यंत जनताजनार्दनाने हजार हातांनी सावरून धरलेला हा डोलारा यापुढेही असाच सावरून धरावा. डगमगू देऊ नये!

## मी लेखिका नाही!

माझ्या पहिल्या-वहिल्या गुरुजी माई—श्रीमती दुर्गाताई नेने—यांनी मला पहाटेच्या वेळी गच्चीवर बसून काहीतरी लिहायला लावले. ही लेखनाची पहिली दीक्षा. त्यानंतर ट्रेनिंग कॉलेजमध्ये मोठे मोठे निबंध लिहिणे, लांब लांब उत्तरपत्रिका लिहिणे, भाषणांचे व्यवस्थित सारांश करणे वगैरे गोष्टींमुळे शिक्षकांची शाबासकी मिळत गेली.

श्री० मोकाशी गुरुजींनी तर "तू लेखिका होशील" असा आशीर्वाद पण दिला. आणि तेव्हापासून आतापर्यंत 'दिसामाजी काहीतरी लिहावे' या समर्थांच्या आज्ञेनुसार रोज काहीतरी लिहीत असते. तरीही, मी लेखिका नाही हे नक्की आहे. कारण, निरनिराळ्या विषयांवर विविध प्रकारे लिहिण्याचेच काम करणाऱ्या लेखकांचे लेखन मला लिहिता येत नाही. 'प्रसंगानुसार लेखन' हे माझ्या लेखनास नाव शोभेल.

सुंदर निसर्गाचे दर्शन, एखाद्या जिव्हाळ्याच्या घटनेचे दर्शन, काही कौतुकाचे, आनंदाचे प्रसंग अशा वेळी उत्स्फूर्त काही कविता अगर निबंध मला स्फुरतात, नाही असे नाही. पण ते नगण्यच.

## माझे प्रासंगिक लेखन

प्रासंगिक लेखनामध्ये रंजन-कार्यक्रमासाठी छोटे संवाद व नाटिका लिहिण्याचा मोठा भाग आहे. ट्रेनिंग कॉलेजात, हुजूरपागेत व नंतर बोर्डी–कोसबाडलाही हाच क्रम चालू आहे. पुणे येथे एक अखिल भारतीय स्वरूपाची देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण संघाची महिला परिषद होती. या परिषदेसाठी 'गुरुमाऊली' नावाची एक तीन अंकी छोटी नाटिका लिहिली आहे. ती अप्रकाशित आहे. विषय 'भोंदूपणा' हा आहे. हुजूरपागेतील निरनिराळ्या वेळी लिहिल्या गेलेल्या संवादांची लहानशी पुस्तिका 'बालसंवाद' या नावाने प्रकाशित केली होती. त्याची एकही प्रत आज माझ्याकडे नाही. बोर्डीला आल्यावर 'शिक्षणपत्रिके'त प्रसंगानुसार लेख लिहिणे व परिसरात मिळतीजुळती अभिनयगीते, बडबडगीते, खेळगीते वगैरे लिहिणे सुरू झाले. लहान लहान गोष्टी पण पुष्कळ लिहिल्या. पशू-पक्ष्यांच्या, मुलांना आवडतील पण अतिरंजित नसतील अशा साहसांच्या, पहिला पूल, पहिला विस्तव, पहिला कापूस अशासारख्या मनुष्याच्या जिज्ञासेस आव्हान देऊन मानवविकासात भर टाकणाऱ्या प्रसंगांच्या गोष्टी मी लिहिल्या आहेत. 'कळीचा घोडा' ही एक त्यांपैकीच गोष्ट आहे. गाभा असा की, 'कळीचा घोडा' आकाशात उडतो, कोठेही उतरतो, नि मग घोड्यावर असणाऱ्या राजपुत्रास तेथील भाषा शिकणे भाग पडते.

भारतातील सर्व भाषा आपल्याच आहेत. बंधुभाव-वाढीसाठी त्यांच्याकडे समदृष्टीने पाहिले पाहिजे हा मूळ मुद्दा आहे. भला शेजारी, गुणी मुलगा, हिऱ्याची बासरी यांसारख्या गोष्टी पण दिसायला मजेदार, खुसखुशीत वाटतात, पण गाभ्यात काहीतरी मानवतावाद दडलेला आहे. प्रसंगानुसार लेखन म्हणण्याचे कारण हेच की, या सगळ्या गोष्टीसुद्धा समाजात काही विशेष आघातदायी विषमतेचे कटू प्रसंग अनुभवास वा ऐकावयास मिळाले त्या वेळी स्फुरलेल्या आहेत. 'महंमदची बकरी' (नाव पुरते आठवत नाही!) ही गोष्ट आमच्या समोर राहणारा कसाई रोज सकाळी बकऱ्या कापायचा त्या पाहूनच स्फुरलेली आहे. वाचकांना ती गोष्ट खूपच आवडली होती.



## गोष्टीद्वारा समाज प्रबोधन

महिला मंडळात, प्रौढ शिक्षण वर्गात गोष्टींचीही जरुरी आहे, म्हणून अलिकडे अलिकडे 'आटपाट नगरात' ही गोष्टींची पुस्तिका लिहून प्रकाशित केली. या गोष्टी कोठे कोठे ऐकलेल्या आहेत. त्या मी माझ्या शब्दांत काही थोडे फरक करून व माझ्या काही कल्पना त्यांत घालून लिहिल्या आहेत. एखाददुसरी एकदम नवी पण आहे. 'टिल्लूची करामत' या माझ्या छोट्या पुस्तकाला महाराष्ट्र राज्याकडून दुसरे बक्षीस मिळाले आहे. एका उंदराने एका मांजराला कसे खेळविले हे छोट्या छोट्या पाच विभागांत यात सांगितले आहे. प्रत्येक वेळी मांजरच अडकते आणि मग कसे सुटते या कल्पना लढविण्यात मजा आली. मध्यंतरी माझ्या भाचीने-नंदाने मागणी केली, "मावशी, मोठ्या माणसांसाठी असतात, तशी एखादी रहस्यकथा आमच्यासारख्या लहान मुलांसाठी लिही ना!" आणि 'अजब सातभाई' या पुस्तिकेचा जन्म झाला.

## नवसाक्षरांसाठी लेखन

प्रौढ शिक्षणवर्गासाठी, पहिल्या इयत्तेसाठी, नवसाक्षरांसाठी सोपे सोपे धडे लिहिणे, पुस्तिका लिहिणे हा माझा व ताईंचा आवडता छंद. आमचा बराच वेळ असे धडे लिहिण्यात व एकमेकींना दाखविण्यात जात असे. त्यांतील पुष्कळ हस्तलिखिते अजून पडून आहेत.

शिक्षणक्षेत्रात उपयोगी पडणारी 'बालवाडी कशी चालवावी?' व 'कुरणशाळा' अशी दोन छोटी पुस्तके आहेत. 'बालवाडी कशी चालवावी?' हे पुस्तक संपूर्ण अनुभवाच्या व पू० ताईंच्या व्याख्यानांच्या आधारे लिहिलेले आहे. त्यामुळे ते सोपे व प्रत्यक्ष काम करणारांना उपयोगी झाले आहे. या पुस्तकात तात्त्विक भाग अगदीच कमी आहे. पण खेडेगावात बालवाडी चालवायला ते चांगले मार्गदर्शक ठरते, असे मंडळी सांगतात. मराठी पुस्तकाच्या पाच आवृत्त्या झाल्या. इंग्रजी भाषांतर छापून प्रसिद्ध झाले आहे. त्याला मागणी पुष्कळ आहे. बंगाली, मणिपुरी, सिंहली व द्रविडी भाषांमध्ये या पुस्तकाची भाषांतरे होत आहेत. फ्रेंच भाषेत पण भाषांतर झाल्याचे मला नुकतेच कळले; पण हाती प्रत आली नाही.

पाळणाघर कसे चालवावे, प्रौढ शिक्षण : तंत्र-मंत्र, एकशिक्षकी शाळा वगैरे हस्तलिखिते तयार आहेत. पैकी काही 'शिक्षणपत्रिके'तून प्रकाशित पण झाले आहे. पुस्तकरूपाने प्रसिद्ध होण्याचा योग केव्हा तरी येईल.

## मी संपादिका झाले

आपण संपादक व्हावे, अशी लहानपणापासून हौस होती. 'चक्रम' हस्तलिखिताच्या त्रैमासिकाने ती थोडीशी भागवली. पण पुढे 'शिक्षणपत्रिके'तील बालविभाग

जवळ जवळ मीच लिहीत असे. संपादक मात्र नव्हते. १९७० पासून संपूर्ण संपादन करू लागले. १९७३ मध्ये 'संपादिका' म्हणून नावही छापले गेले. 'शिक्षणपत्रिका' हे माझे सर्वांत लाडके मासिक आहे. गेली ३९ वर्षे या पत्रिकेत मी काही ना काही लिहीतच असते.

तेव्हा मी लेखिका नाही. फुटकळ लेख, कविता, गोष्टी, बडबडगीते वगैरे लिहिते, इतकेच!

# संकल्प व सिद्धी

ग्राम-बाल शिक्षा-केंद्र गेली ३८ वर्षे काही ध्येयाने प्रेरित होऊन ग्रामीण भागात काम करीत आहे. त्यांतली २५ वर्षे कोसबाड टेकडीवर आदिवासींमध्ये काम करण्यात गेली आहेत.

कोणती ध्येये होती? त्यासाठी आम्ही काय केले? ध्येयापर्यंत पोचलो का? किती मजल मारली? मागे वळून पहायला हवे. अंतर्मुख होऊन संशोधन करायला हवे!

स्मृतिपटलाची पाने चाळता चाळता १९४५ चा डिसेंबर पुढे येतो. त्या दिवशी खेडेगावातील पूर्वप्राथमिक शिक्षणाची ध्वजा उभारली गेली.

खेडेगावातील पूर्वप्राथमिक शाळा—बालमंदिर, बालवाडी अथवा आणखी काही नावे—तिची जरुरी आहे का? तिची कार्यपद्धती कोणती असावी? ती कमी खर्चात कशी चालवता येईल? ही मोठी समस्या सोडवायला घेऊन बोर्डीच्या कामाला सुरवात झाली. अनेक अनपेक्षित, अपेक्षित अडचणी पुढे आल्या, त्यांतूनच नवे दिसत गेले, आणि ग्रामीण भागातील बालवाड्यांबाबत काही सिद्ध गोष्टी आमच्या हाती आल्या!

## बालशाळा हवीच!

(१) खेडेगावांत, डोंगरकपारींत, समुद्रकिनारी, बेटांवर, जेथे म्हणून मनुष्यवस्ती असेल, तेथे तेथे त्यांच्या बालकांसाठी बालशाळा हवीच!

(२) बालशाळा चालविताना परिसर, स्थानिक रीतिरिवाज, रहाणी आदि सर्व गोष्टींचा अभ्यास चालकांनी, शिक्षकांनी करायला हवा. परिसरास मिळतीजुळती

कार्यपद्धती असावी. मुलांच्या सर्वांगीण विकासास अवश्य असणाऱ्या ज्या ज्या गोष्टींची कमतरता दिसून येईल, ती ती दूर केली पाहिजे. उदा. शहरातल्या मुलांना सुधारित अशा अनेक गोष्टी माहीत असतात. पण झाडेझुडपे, पशुपक्षी वगैरेंची फार कमी सोबत मिळते. तेव्हा शहरातल्या बालशाळेस जोडून बगीचा हवा. पशुपक्षिपालन हवे. राणीच्या बागेसारख्या ठिकाणी त्यांच्या सहली जायला हव्यात. खेड्यातील मुले झाडेझुडपे, पशु-पक्षी यांच्यामध्येच वावरतात. या सगळ्यांची चांगली ओळख असते. पण शहरी सुधारित गोष्टी त्यांना माहीत नसतात. वहानांतून प्रवास पण क्वचितच होतो. त्यामुळे लोकलगाड्या, मोटारी, रुंदरुंद रस्ते, टेलिफोन, वर्तमानपत्रे या सगळ्या गोष्टी त्यांना नव्याच असतात. टिकटिक करणारी घड्याळे सुद्धा कित्येकांनी पाहिलेली नसतात. तेव्हा या मुलांच्या शहरांमधून सहली काढणे, प्रत्यक्ष वस्तू, चित्र, नमुने यांद्वारा मुलांचा या सुधारित जगाशी परिचय करून देणे, हे खेडेगावातील बालवाडी-चालकांचे महत्त्वाचे काम होईल.

### स्वच्छता हवी. विकासासाठीच खेळणी हवीत.

(३) खेडेगावातील बालवाड्यांच्या कार्यक्रमात मुलाना स्वच्छ करून घेणे हा महत्त्वाचा व बालवाडीचाच एक भाग आहे.

(४) लहान मुले खेळतात. खेळता खेळता स्वतःचा सर्वांगीण विकास करून घेतात. वडील मंडळींनी त्यांना खेळणी आणून दिली तर बरेच झाले, पण नाही दिली तर त्यांची ती शोधून काढतात. ही गोष्ट लक्षात घेऊन मुलांना खेळणी दिली पाहिजेत. कोणतेही खेळणे खरेदी करताना, त्या खेळण्याशी खेळता खेळता मुलांच्या विकासातील कोणती गरज भागणार आहे याचा विचार त्यांना खेळणी देणाऱ्याने केला पाहिजे.

बालवाडीत पुष्कळ खेळणी असतात. पण ती सर्व वरील विचार करून ठेवलेली असतात. डॉ. मॅडम मॉंटेसरी बाईंनी 'मुलांचा विकास व खेळणी' याविषयी पुष्कळ चिंतन करून खेळणी तयार केली आहेत. तीच मॉंटेसरी साधने! खेडेगावात ही साधने उर्फ खेळणी फार खर्चिक! पण मुलांच्या विकासासाठी त्यांची जरुरी आहे! मग काय करायचे? डॉ. मॅडम मॉंटेसरी बाईंप्रमाणेच चिंतन करून त्यांच्या खेळण्यास प्रती खेळणे तयार करायचे! मात्र परिसरात मिळणाऱ्या वस्तूंपासून ही खेळणी तयार केली पाहिजेत. शिक्षकांनी तयार केली पाहिजेत. खेडेगावातील स्थानिक कारागिरांकडून तयार करून घेतली पाहिजेत. ग्राम-बाल-शिक्षाकेंद्राने अशी परिसरातील वस्तूंचा उपयोग करून शैक्षणिक साधने ऊर्फ खेळणी तयार करण्यामधे चांगलीच सिद्धी मिळवली आहे. ही गौरवाची गोष्ट आहे.



## हाती लागलेली शिक्षणसूत्रे

बोर्डी येथील अंगणवाडीमुळे बालवाडीतील लहान मुलांच्या सर्वांगीण विकासाबरोबरच प्राथमिक शाळेतील मुलांचे शिक्षण, ही एक चिंतनीय समस्या समोर आली. ती सोडविण्याच्या दृष्टीने प्रयोग झाले, प्रयत्न झाले आणि काही महत्त्वाची शिक्षणसूत्रे हाती आली.

### (१) विकासवाडी

आदिवासी मुलांच्या प्राथमिक शिक्षणाची समस्या सोडविण्यासाठी १९५६ साली अग्रदूती म्हणून मी कोसबाडला आले. बोर्डीच्या अनुभवाची शिदोरी बरोबर होती. बाकी कोसबाडला कोणते काम, कसे करायचे, अग्रक्रम कोणाला वगैरे सर्व बाबतींत कोरी पाटी होती. स्थळ, काल वगैरे पाहून कार्यपद्धती आखायची होती. आदिवासी मुले शाळेत येत नाहीत, त्यांना येती करण्यासाठी—शाळेला जोडून बालवाडी व पाळणाघर काढले. लहान भावंडांना सांभाळण्यासाठी घरी रहावे लागते, ही अडचण दूर झाली. पाळणाघरामुळे मुले रोज ३|४ तास तरी आमच्या सहवासात आल्यामुळे त्यांचे अवलोकन करणे, विकासातील गरजा ओळखून उपाय योजणे सोपे झाले. आदिवासींना आपल्या लहानग्यांशी जातायेता बोलायला, खेळायला, काऊमाऊ दाखवायला, झुंमकरोती म्हणायला वेळ नसतो. त्यांना त्याची माहिती पण नसते. त्यामुळे जात्या चलाख, हुशार असलेली ही मुले सुद्धा बावळट, मंद, निष्क्रिय दिसायची. पाळणाघर व बालवाडीमुळे लहानपणापासून विकासास योग्य वातावरण मिळते. त्यामुळे हीच मुले अगदी शहरातल्या मुलांसारखी बोलकी, धडपडी होतात. पाळणाघर-बालवाडीमुळे मोठी भावंडे निश्चिंतपणे अभ्यास करू शकतात. —तेव्हा—

अगदी लहान खेडेगावांतून व आदिवासी वस्तीतून प्राथमिक शाळेस जोडून पाळणाघर व बालवाडी चालवली पाहिजे. पाळणाघर, बालवाडी व प्राथमिक शाळा १ ली, २ रीचे वर्ग एका छपराखाली चालणे, ती **विकासवाडी**!

### (२) कुरणशाळा

खेड्यापाड्यांतून, आदिवासी वस्तीतून व झोपडपट्टीमधून **विकासवाडी** नमुन्याची शाळा हवीच, हे प्रयोगाने सिद्ध झाले आहे. आदिवासींची मुले केवळ भावंडे सांभाळण्यासाठीच घरी रहातात असे नाही. पावसाळ्याच्या दिवसांत त्यांना गुरे चारायला कुरणात जावे लागते. दोन तीन महिने फुकट जातात. मग शाळेचा कंटाळा येतो. आणि शेवटी शाळेला रामराम ठोकला जातो. ह्यावर उपाय म्हणजे रानात गुरे चारण्यासाठी मुले जातात, तेथे शिक्षकानेही जायचे. गुरे चरत असतात. मुले त्यांच्याकडे लक्ष ठेवून आपले खेळ खेळतात. त्यांच्या या खेळांतूनच त्यांना शिक्षण द्यायचे. विज्ञान,

आरोग्य, भूगोल, चालीरीती यांचे तोंडी शिक्षण देता येते. गाणी, गोष्टी, नाटके, गप्पागोष्टींद्वारा तोंडी भाषेचा अभ्यास होतो. पाने, फुले, बिया, काड्या यांच्या सहाय्याने गणित विषय घेता येतो. **गुरे-चरणामध्ये शैक्षणिक साधनांचे मुक्त भांडार आहे.** एक पैशाचा खर्च नाही, पण साध्य मात्र महान्. मोठ्या मोठ्या शाळांतून खरटी, पिसे, कवड्या, अनेक जातींचे दगड गोळा करण्याला प्रयास पडतात. अशी साधने विकत घ्यावी लागतात. छंद लावावा लागतो. आम्हांला येथे या सर्व गोष्टी सहज जाता-येता मिळतात. मिळवायला फक्त दृष्टी पाहिजे!

आमच्या या कुरणशाळेतील मुले सामान्यज्ञान व धीटपणा या बाबतींत शाळेत नियमित येणाऱ्या मुलांपेक्षा उजवी ठरतात. अभ्यास बुडत नाही, त्यामुळे शाळेचा कंटाळा येत नाही. गुरे चारण्याचे काम संपले की मुले हौसेने शाळेत येतात. तेव्हा जरूर तेथे कुरणशाळा चालविल्या पाहिजेत हे सिद्ध झाले.

### (३) पढाई-कमाई साथमे

आदिवासी मुले ८–१० वर्षांची झाली की, स्वतःच्या मीठमिरचीपुरती तरी त्यांना स्वतःची कमाई करावी लागते. त्यासाठी शेतांतून, मळ्यांतून, रेल्वेस्टेशनवर, रस्त्यांवर कोठेही कामास जावे लागते. मजुरी तुटपुंजी पण दिवसच्या दिवस यात निघून जातात. शालेय शिक्षण, लहानपणी सहज वाटणारे खेळणे, बागडणे ह्या सर्वच गोष्टींना ही मुले मुकतात. पण पोटाची गरज पहिली. ती नाकारता येत नाही. ह्यासाठी शाळेला जोडून उद्योगवर्ग चालविणे हाच एक उपाय सापडला.

सुरवातीस मुले शाळेत येती करण्यासाठी आम्ही हा प्रयत्न केला. या व वर सांगितलेल्या आणखी अनेक उपायांनी मुले शाळेत येती झाली. सुरवातीची ३८ पटसंख्या व वार्षिक सरासरी उपस्थिती ९% ही परिस्थिती पालटली. आज २७५ पटसंख्या असून ८५ ते ९०% सरासरी हजेरी असते.

असे असले तरी इयत्ता ५वीपासून पुनः गळती सुरू होते. शिक्षणाचे महत्त्व पटल्यामुळे व आमच्या आजूबाजूच्या बालवाड्यांमुळे सध्या इयत्ता १लीमधे सहा वर्षे पूर्ण या वयाची मुले दाखल होतात. ती साधारणपणे ९–१० वर्षे वयाच्या सुमारास इ. ४थी पूर्ण करतात. पण पुढे मुले मीठमिरचीपुरत्या कमाईसाठी घरी हवीतच. म्हणून गळती सुरू होते.

या वेळी व्यवसाय-शिक्षणाचीच आवश्यकता आहे. **"पढाई-कमाई-साथमे"** हेच सूत्र आम्हांला येथे उपयोगी पडले आहे!

### व्यवसाय-शिक्षण हवे!

नुसत्या पुस्तकी शिक्षणाने पढतपंडित तयार होतात. सध्याच्या धकाधकीच्या



जीवनात हे शिक्षण निरुपयोगी ठरते. शालेय शिक्षणाला व्यवसायशिक्षणाची जोड हवीच, हे आता सर्वमान्य झाले आहे. आमच्या आदिवासी भागात तर ही गोष्ट आवश्यकच आहे. हा निष्कर्ष आमच्या प्रयोगातून निघाला आहे.

### (४) रात्रीची शाळा

प्राथमिक शाळेला जोडून बालवाडी, पाळणाघर आले, कुरणशाळा आली, शाळेला जोडून उद्योगवर्ग चालू झाला. इतके झाले तरी गावात प्राथमिक शाळेच्या वयाची १०० टक्के मुले-मुली अजून शाळेत दाखल होऊ शकत नव्हती. आणखीही काही अनिवार्य अडचणी त्यांच्यापुढे होत्या, म्हणून मग शाळेला जोडून रात्रीची शाळा चालवली. रात्रीच्या शाळेचा आम्हांला फारच फायदा झाला. विशेषतः मुलींच्या शिक्षणाच्या दृष्टीने तर अशा रात्रीच्या शाळांची आवश्यकताच आहे. ही रात्रीची शाळा, म्हणजे प्रौढशिक्षण नव्हे! अगदी इयत्ता १ ली पासून शिक्षणाची, पाच वर्षे वयापासून १५।१६ वर्षे वयापर्यंतच्या मुलामुलींची शाळा माझ्या स्वयंभू रात्रीच्या शाळेचे वर्णन यापूर्वी आलेच आहे. या शाळेत शिकून तयार झालेली मंडळी आता आई-बाप झाली आहेत! ही मंडळी आपल्या मुलामुलींना आवर्जून शाळेत पाठवितात. पण तरीही काहीजण शाळेत येण्याची राहून जातात. म्हणून अजूनही रात्रीच्या शाळेची जरुरी तर आहेच. या शाळेमुळे गावाचे सामान्यशिक्षण होते. परिसरात शिक्षण दुमदुमते. हा फार मोठा फायदा आहे.

अशा अनेक रीतीने मुलांना शाळेत येती करण्याचे प्रयत्न झाले. आज मुले-मुली दोन्हीही शाळेमधे येऊ लागली आहेत. पालक अगत्याने आपल्या पाल्यांना शाळेत घालू लागले आहेत.

### (५) जीवन व शिक्षण यांची सांगड हवी

मुलांना शाळेत येती करणे, हा प्रयत्न सिद्धीस गेला असे आमच्या शाळेपुरते म्हणावयास हरकत नाही. १९५६ साली कामास सुरवात केली तेव्हा दुसरा प्रश्न म्हणजे या मुलांना शिकती कसे करावे, हा होता. दिवसभर रानावनांत भटकायचे, मोकळ्या मैदानावर खेळायचे, स्वच्छंदी जीवन! चार भिंतींच्या आत कोंडून बसायचे, गुरुजी सांगतात तिकडे लक्ष द्यायचे आणि गुरुजी विचारतील तेव्हा पुन्हा उत्तर द्यायचे ही सगळीच अवघड गोष्ट! एकाग्रता नाही! मुले हुशार, चुणचुणीत, धीट, चाणाक्ष आहेत. त्यांच्यामध्ये विलक्षण समयसूचकता आहे. या सगळ्या गुणांचा उपयोग करून घ्यायचा होता. त्यांना भावंडे सांभाळावी लागतात, गुरे चारावी लागतात, शेतीत कामे करावी लागतात, यामधे वाईट काय आहे? हे सगळे जीवन आहे!

**जीवन जगता जगता शिक्षण मिळते, शिक्षण घेता घेता जीवन सुसह्य होते !** आम्ही मुलांच्या या दैनंदिन जीवनक्रमाचाच अध्ययन-अध्यापनामधे उपयोग करून घ्यायचे ठरविले. वाचनपाठ त्यांच्या दैनंदिन कार्यक्रमावर आधारलेले, त्यांच्याशी गप्पागोष्टी करता करता तयार केलेले होते. जसे—

आई कुठे गेली ?
डोंगराला !
बाबा कुठे गेला ?
वाडीवर !
घरी कोण कोण आहे !
दादु आणि बाई.
दादु= तान्हे बाळ ; बाई= लहान मुलगी

## मुले आपलीशी होतात

असे पुष्कळ वाचनपाठ तयार झाले. आम्ही याला जिवंत धडे म्हणतो. उदाहरणे, सामान्यज्ञान, भूगोल सगळया विषयांची जीवनक्रमाशी सांगड घालणे. प्रात्यक्षिकांद्वारे माहिती देणे, सहली, प्रदर्शने यांच्याद्वारे जिज्ञासा जागृत ठेवणे, शब्दसंग्रह वाढवणे, अशा सर्व गोष्टी लक्षात घेतल्या. मुले अभ्यासात रंगली. त्यांची चित्रकला चांगली आहे. तारफानृत्याचे बाळकडू त्यांना मिळालेले आहे. लग्नाच्या गाण्यांचा साठा त्यांच्याजवळ आहे. ह्या सर्व गोष्टींमध्ये प्रोत्साहन द्यायला हवे. शिक्षकांनी भाग घ्यायला हवा. म्हणजे मुले आपलीशी होतात. गुरुजींना पाहून पळून जात नाहीत, तर लांबून गुरुजी दिसले की 'गुरुजी-गुरुजी' करीत वानरांसारख्या उड्या मारीत पुढे येतात.

## मुलं बक्षिसे मिळवितात

आज पंचवीस वर्षांनंतर आमच्या विकासवाडी प्राथमिक शाळेतील मुले (मुलगे-मुली दोन्हीही) लक्ष देऊन अभ्यास करू लागली आहेत. इयत्ता ४ थीची, ७ वीची सामान्य परीक्षा देऊन नंबर काढू लागली आहेत. पाठांतर स्पर्धेमध्ये बक्षिसे मिळवू लागली आहेत.

## अध्यापन-तंत्रातील रामबाण

आम्ही अनुभवलेल्या शिक्षणपद्धतीची ही सिद्धीच म्हणावी लागेल. शिक्षण घेणाऱ्या व्यक्तीची ग्रहणशक्ती, भोवतालचा परिसर, स्थलकालानुसार आवश्यक असणाऱ्या गोष्टींवर शिक्षण देताना भर देणे वगैरे गोष्टी या नुसत्या आदिवासी प्राथमिक शाळेतच उपयोगी ठरल्या आहेत, असे नाही. सर्वच ठिकाणी हे अध्यापन-तंत्र रामबाण ठरते.



## अभ्यासक्रमात लवचिकपणा हवा

आम्ही बालसेविका प्रशिक्षण वर्ग गेली २० वर्षे चालवीत आहोत. दिल्लीहून या वर्गासाठी निश्चित असा अभ्यासक्रम आलेला आहे. आम्ही तो लक्षपूर्वक अभ्यासला आहे. आमच्या बालसेविका खेड्यापाड्यांत कामाला जाणार आहेत. वेळप्रसंगी त्यांना झाडाखाली बालवाडी चालवावी लागणार आहे, हे लक्षात घेऊन निश्चित अभ्यासक्रम राबवताना थोडाफार लवचिकपणा करावाच लागतो. कोणत्याही अभ्यास-क्रमाबाबत माझे हे धोरण आहे. त्यामुळे ठराविक अभ्यासक्रमात सांगितल्यापेक्षा जास्त गोष्टी आम्ही विद्यार्थ्यांच्या पदरात टाकतो.

उदा :— बालसेविका अभ्यासक्रमामध्ये एकतीस दिवसांची **ब्लॉकप्लेसमेंटशिप** अवश्य आहे. यामध्ये कोणत्यातरी चालू बालशाळेमध्ये, दवाखान्यामध्ये अगर बालभवन-सारख्या कार्यक्रम घेणाऱ्या संस्थेमध्ये मुलींनी २१ दिवस काम करावयाचे, व त्या त्या संस्थाचालकांकडून, 'छान' म्हणून शिफारस आणावयाची. पहिली दोन वर्षे या पद्धतीने मी काम केले. पण पुढे ते बदलले. एक-एक महिना आदिवासी वस्तीत स्वतः जाऊन बालवाडी उभी करायची; नावनोंदणी करणे, जागा मिळविणे, पालक-परिचय करून घेणे, मुलांची शारीरिक तपासणी करणे, रंजन कार्यक्रम ठरविणे इत्यादि गोष्टी त्यांनीच करायच्या. परिसरातून मिळणाऱ्या वस्तूंपासून शैक्षणिक साधनेही त्यांनीच तयार करावयाची !

या प्रयोगामुळे भागात काम करण्यासाठी जरूर तो आत्मविश्वास सेविकांच्यामध्ये आला. स्वतः विचार करून कार्यपद्धती आखणे, शैक्षणिक साधने तयार करणे इ.ची सवय लागली. विशेष म्हणजे खेडेगावांत जाऊन बालवाडी चालविण्याची हौस वाटू लागली.

## यशाचे रहस्य

कोणत्याही योजनेचा गाभा समजून घेऊन काम केले म्हणजे, ती बहुतांशी यशस्वी होतेच, असा माझा अनुभव आहे. आम्ही राबवलेल्या सकस आहार योजना, प्रौढ शिक्षण योजना या यशस्वी झाल्या, याच्या मुळाशी हीच गोष्ट आहे ! योजना राबविताना कोणती प्रात्यक्षिके घेता येतील, कोणती शैक्षणिक साधने उपयोगात आणता येतील, कोणती नवी तयार करता येतील, याचे सतत चिंतन हवे.

सकस आहार योजना राबविताना प्रत्यक्ष पदार्थ करून घेतले. खाद्यपदार्थ, भाजीपाला, खारवलेले-वाळवलेले पदार्थ वगैरेंची प्रदर्शने झाली. आमची ही प्रदर्शने फार गाजली. सकस आहार योजनेस उपयुक्त अशी गाणी लिहिली. एक पुस्तिका छापून घेतली. दहाही गावांतून मला चांगला सहकार मिळत होता.

अशा प्रकारे एकूण ३८ वर्षांच्या कामातून अनुभवाची बरीच शिदोरी आता पदरी बांधली आहे !

# पुढे काय ?

आता मी ७१ वर्षांची झाले आहे. ग्राम बाल शिक्षा केंद्रही ३५ वर्षांचे झाले आहे. ते विकसत आहे. आणखीही विकसणार आहे. पण या कामी आता माझी कितपत मदत होईल ? "तुमच्या पुढच्या योजना काय आहेत ?" असा प्रश्न मला पुष्कळजण विचारतात. त्यादृष्टीने विचार करू लागले की, मन पुन्हा भूतकाळात झेप घेते.

१९२९ साली ट्रेनिंग कॉलेजमधून बाहेर पडले, तेव्हा उत्तम शिक्षिका होण्याचे स्वप्न होते. त्यासाठी काय काय करावे लागेल, याच्या काही योजना आखलेल्या नव्हत्या. फक्त ध्येयबिंदू समोर होता. त्या दिशेने सरकता सरकता करावे लागेल ते करायचे.

पुढे १९३३ साली पुणे येथे आले. त्या वेळी आपल्याला पुढे शिकायचे आहे आणि भावंडांच्या शिक्षणासाठी पुण्यात राहण्यास स्वतःचे बिऱ्हाड असावे, एवढ्या दोनच गोष्टी डोळ्यासमोर होत्या. आणखी कसले ध्येय अगर योजना नव्हत्या. उलट मनाला भीती वाटत होती, "आपण खेडवळ. पुण्यासारख्या शहरात, त्यातूनही हुजूरपागेसारख्या नावाजलेल्या शाळेत आपला निभाव लागेल ? का, ते सोडून द्यावे लागेल ? आणि मग हेही नाही, तेही नाही, अशी वेळ येईल का ?" नशिबाने ही भीती खोटी ठरली ! हुजूरपागेत काम करताना, रंजन कार्यक्रमासाठी लिहिणे व शाळेच्या नियमित अभ्यासक्रमाव्यतिरिक्त असणाऱ्या कार्यक्रमात भाग घेणे, ही हौसेची कामे ठरली.





१९४५ साली पुणे सोडताना खेडेगावात समाजसेवा करावयाची आहे एवढेच ध्येय मनाशी होते. त्यासाठी काय काय करावे लागेल, हा तपशील ठरला नव्हता. बोर्डीला काम सुरू करताना येणाऱ्या अडचणी, त्या दूर करण्यासाठी केलेले उपाय, यामधून कित्येक योजना साकारल्या. नंतर १९५६ साली मी एकटीच एका छोट्या मदतनीस भगिनीसह कोसबाडला आले. त्या वेळी तर जणू कोरी पाटीच होती. आतापर्यंतच्या अनुभवाची शिदोरी गाठी होती, पण तिचा उपयोग काय व कसा करायचा ते मुळीच ठरले नव्हते. समस्या येत गेल्या. त्यांची उकल होत गेली. त्यातून रात्रीची शाळा, कुरणशाळा, उद्योगवर्ग यांसारख्या योजना साकारल्या.

## "वा ! आपण किती केले !"

तेव्हा आता, "यापुढे तुमच्या योजना काय आहेत ?" या प्रश्नाला मी कसे उत्तर देऊ ? कोठे स्थलांतर होईल आणि नवे काम पुढे येईल तरच या गोष्टीचा विचार करायचा आहे ! या ठिकाणी चालू कामे व्यवस्थित होतील हे पाहावे; ती करता करता नव्या योजना आल्या तर त्या अमलात आणण्यासाठी प्रयत्न करावे, एवढेच आता तात्कालिक काम दिसते.

पण नवी कामे दिसतच नाहीत असे मात्र नाही. कोसबाडला आमची 'ग्राम बाल शिक्षा केंद्र' व गोखले एज्युकेशन सोसायटीची 'कृषि शिक्षण केंद्र' या दोन्ही संस्था आज २५ वर्षे हातांत हात घालून काम करीत आहेत. त्यामुळे कोसबाड परिसरातील आदिवासी बंधु-भगिनी व मुले यांच्या राहणीत पुष्कळ सुधारणेच्या दृष्टीने फरक झाला आहे. आर्थिक परिस्थिती सुधारत आहे. काहीतरी करून दाखविण्याची अस्मिता त्यांच्यामध्ये जागी झाली आहे. मुलामुलींना शिकविले पाहिजे, हे पटू लागले आहे. व्यसन सर्वस्वी सुटले नसले तरी कमी झाले आहे. आर्थिक परिस्थिती सुधारत आहे. हे सगळे बघितले म्हणजे, "वा ! आपण किती केले !" असा गर्व होतो. पण गर्वाचे घर खालीच होते ! असे माझे गर्वहरण दोन वेळा झाले आहे !

## गर्वहरण

आमच्या ३० प्रौढ शिक्षण वर्गांपैकी सहा-सात केंद्रे अगदीच आडवळणी, डोंगराच्या पायथ्याशी असणाऱ्या पाड्यांवर चालतात. बालसेविका भगिनी हे वर्ग, त्यांना प्रात्यक्षिक हवे म्हणून चालवितात. रात्रीची वेळ, दिवे नाहीत, निर्जन रस्ता, काटेकुटे, जंगल आणि आदिवासींच्या वस्तीतून हा प्रवास. त्यामुळे मुलींना पाठविताना मनातून धाकधूक वाटत असे. पण तसे उघड कधी दाखविले नाही. उलट कोणी बालसेविका घाबरली तर "वा रे वा वीरबाला !" असे बोलून तिला धाडस करायला उत्तेजित करीत होते. पण एकदा ही केंद्रे आपण स्वतः पाहिली पाहिजेत असे

ठरविले. १९७९ ची ही गोष्ट आहे. आता पहिल्यासारखे मनात आले की चालू लागले असे होत नाही. बैलगाडी, बरोबर माणूस, अशा सरंजामासह मी तीनचार केंद्रे रात्रीच्या वेळी जाऊन पाहिली.

पाड्यावरच्या आदिवासी बंधुभगिनी मोठ्या संख्येने वर्गाला येत होत्या. त्यांच्या-तलाच चार बुके शिकलेला पुढारी त्यांना पुढे घालून वर्गाला घेऊन येत होता. अंगणात मांडव घातला होता. चटया अंथरल्या होत्या. मिट्ट काळोखात कंदील मिणमिणत होते, पण तेवढ्या उजेडातही शिकू इच्छिणाऱ्या बंधुभगिनींच्या चेहऱ्यावर उत्सुकता, आनंद तळपत होता. बरे वाटले. येथे कामाची किती गरज आहे हेही पटले. पण त्याच वेळी एक उदासीनता मनाला चाटून गेली. प्रौढ बंधुभगिनींच्या बरोबरच दहा-बारा वर्षे वयाची किती तरी मुलेमुली येथे आल्या होत्या. ही मुले शाळेत जात नव्हती. कोणी फुले तोडायला, कोणी वाडीवर, कोणी रस्त्यावर अशी कामावर जात होती, तर कोणी घर सांभाळायला घरीच राहत होती. आमच्या पाठीमागे मैल दीड मैल अंतरावर असणारी ही इतकी मुलेमुली अजून शाळेला वंचित आहेत हे पाहून फार मोठा धक्का बसला. गर्वहरण झाले. डोंगराच्या कुशीत, पायथ्याशी अजून कोण पोहोचले आहे? तेथे कितीतरी समाजकार्य पडले आहे. आपण तर सागरातला एक चुळका तरी पुरता उचलला आहे का? असा चिमटा मनाने घेतला. "करायचे आहे! अजून खूप करायचे आहे!" या ध्यासानेच घरी परतलो.

## दाभोण प्रकल्प

### "तथ शाळा होती, पण मास्तर कोठ येत आहे?"

एकदा रानशेत आणि वाणगाव या दोन गावांना जोडणाऱ्या गाडी-रस्त्याने दाभोण नावाच्या आतल्या खेड्यात गेलो होतो. मोठे माळरान. खजुरी, वड वगैरे झाडांचे जंगल. पुष्कळ चालून गेल्यावर कोठेतरी दहापंधरा झोपड्यांची वस्ती. एकूण २५ एकर अशी ही जमीन आहे. समाजसेवा करणाऱ्या, विशेषतः आरोग्यसेवा व औषधी वनस्पतीचा बगिचा करणाऱ्या संस्थेला ही जमीन दान देण्याची मालकाची इच्छा आहे, असे कळल्यावरून परिस्थिती काय आहे ते पाहण्यासाठी मी मुद्दाम तेथे गेले होते. आमची जीप होती तरीही खूप खूप आत गेलो असल्याचे जाणवत होते. मध्येच एक लहानसा ओढा होता. जीपला पुढे जायला रस्ता नव्हता म्हणून तेथे थांबलो. पुढे चालत जायचे; ते मला शक्य नव्हते म्हणून पुरुष मंडळी उतरून चालू लागली. मी व माझ्या बरोबरच्या एक भगिनी जीपमध्येच होतो. जीप पाहून आजूबाजूची मुले गोळा झाली. उघडीनागडी, केस विस्कटलेले, पण हसतमुख! लहानमोठी सगळ्याच वयाची मुले आणि मुली—अगदी बोर्डीला व कोसबाडला आदिवासी मुलांचे जे प्रथम दर्शन झाले, तस्सेच पुन्हा! मुले जीपकडे कौतुकाने

पाहत होती, आम्ही त्यांच्याकडे पाहत होतो. कोणत्या भावनेने? शब्द सापडत नाही. आम्ही मुलांना विचारले,

"शाळेत जाता काय रे?"

"कोठची शाळा?"

"अरे इथे जवळ शाळा आहे ना?"

"ते तथ शाळा होती. पण मास्तर कोठ येत आहे?"

मुलांनी आम्हांला निरुत्तर केले.

"तुम्ही काय करता रे?"

"काय करू? असाच फिरत आहे. फाटी गोला करू, डोबी चारू."

"आम्ही शाळा काढली तर शाळेत याल का?"

"हां, येऊ!"

"काय रे, या नदीला पाणी असते का?"

"पुष्कळ."

"मग तुम्हांला मजुरीने जंगलातले काम दिले तर कराल का?"

"हो."

### भीती

आमच्या गप्पा रंगात आल्या होत्या. पुरुष मंडळी परतली. सांगू लागली, "कातकरी वस्ती आहे. ही मंडळी भितात की आपण त्यांची जमीन हिसकावून घेऊ." मग मी अधिक तपास केला. तेव्हा कळले की जमीन जरी कोणातरी श्रीमंत मालकाची असली तरी ही मंडळी बरीच वर्षे येथे वस्ती करून आहेत. कोणी जमीन विकत घेतली, तर त्यांना येथून हलवले जाईल अशी भीती त्यांना वाटते. दिवसाढवळ्या खून होतात, या भीतीने या भागात कोणी फिरकतही नाही.

### एकट्या-दुकट्याचे काम नाही!

पण आम्ही या मंडळींना हुसकून लावणार नाही, उलट त्यांच्यात एक झोपडी बांधून राहणार व त्यांना काम मिळवून देणे, त्यांच्या मुलांचे शिक्षण करणे, आरोग्य सांभाळणे वगैरे कामे करणार, असा विश्वास जर त्यांना वाटला तर ती मंडळीच आमची रक्षणकर्ती होतील, याची मला खात्री आहे. कारण, बोर्डी–कोसबाड दोन्ही ठिकाणी आमच्याकडे अशाच अविश्वासाच्या दृष्टीने प्रथम पाहिले जात होते. आता तीच मंडळी आमची पाठीराखी झाली आहेत. तेव्हा येथे खूप काम पडले आहे. ते एकट्यादुकट्याचे काम नाही!



### "ताई, दाभोणचे काम कधी सुरू करता?"

डहाणूजवळील दाभोण येथे काम झालेच पाहिजे, असे मनोमन वाटत होते. ते एकट्यादुकट्याचे काम नाही, हेही समजत होते, त्यामुळे मन अवस्थ झाले होते. पण देवाचे काम. देव करून घेतो.

एके दिवशी मला श्री. शांताराम भंगाळे यांचे पत्र आले. "ताई, दाभोणचे काम कधी सुरू करता?" मी त्यांना कोसबाडला बोलावून घेतले. दाभोणच्या कामाबद्दल आम्ही विचारविनिमय केला. तेथील लोकांशी बोलून कामाचे महत्त्व पटवून देणे ही मुख्य गोष्ट होती. नुसत्या व्याख्यानाने हे काम व्हायचे नव्हते. त्यासाठी त्यांच्या वस्तीत जाऊन रहाणे, त्यांच्या दैनंदिन कार्यक्रमामध्ये मिसळून जाणे, अवश्य होते. श्री. भंगाळे यांनी ही जबाबदारी उचलली. बरे वाटले. पण त्याच वेळी आणखी एका गोष्टीची जाणीव झाली. श्री. भंगाळे यांना पोटापुरते तरी काही वेतन दिले पाहिजे ना! त्याची व्यवस्था काय?

श्री. भंगाळे यांनी वेतनाबद्दलचा विचार तात्पुरता बाजूलाच ठेवला. ते कामाला लागले. दाभोणच्या मुरब्बी पाड्यावर श्री. चिमाभाऊ दळवी यांच्या घरी जाऊन राहिले. पाड्यापाड्यावर हिंडून लोकांशी ओळख करून घेतली. 'हा बाबा आपल्या कल्याणासाठी काहीतरी करणार आहे' असा विश्वास त्या मंडळींना वाटू लागला. सर्व प्रकारच्या सहकाराची मानसिक बैठक तयार झाली!

श्री. भंगाळे मला वरचेवर भेटत असत. कामाची प्रगती सांगत असत. आम्ही दोघेही उत्साहित होऊन पुढील कामाची आखणी करीत असू.

### "आम्ही जगायला मुंबईला जातो!"

दाभोणचे १२ पाडे आहेत. गवती जमीन आहे. मधून मधून लहानसे तीन नाले वहात आहेत. पायरस्ता सुद्धा नीट नाही. बैलगाड्या, ट्रक जातात. पण धडपडतच. वस्ती जास्त करून कातकरीमंडळींची आहे. आदिवासींमध्ये जास्तीत जास्त मागास राहिलेली ही जमात, असे समजतात. काही पाड्यांवर वारली मंडळीही आहेत. स्वतःची शेती फारच थोड्या लोकांजवळ आहे. बोर्डीसरचे डॉ. रमेश दलाल यांची २५ एकर जमीन आहे. ही सर्वच्या सर्व त्यांनी मला दान देऊ केली होती. पण प्रत्यक्षामधे आढळून आले की, आदिवासींची अनधिकृत वस्ती सगळीकडे झाली आहे. फक्त एक एकर, बारा गुंठे जमीन दान देता येण्यासारखी आहे. सध्या तेवढीच पुरे! बाकीचे नंतर पाहू! दाभोणचे आदिवासीजीवन फारच खडतर आहे. महा मेहनतीने पोटाची खळगी अर्धीमुर्धी भरायची. पोरे उघडीवाघडीच हिंडतात...कशाच्या शाळा आणि कशाचे शिक्षण? गावात पोट भरायचे साधन नाही म्हणून मुंबईला काही मंडळी गिरण्यांतून कामासाठी गेली आहेत. 'आम्ही जगायला मुंबईला जातो,' असे

तेथील एका बंधूने सांगितले. एकूण येथे उद्योग सुरू झाले पाहिजेत हे आढळून आले. जंगलच आहे, तेव्हा तसे उद्योग पुष्कळच सापडतील. करून घेणारे हवेत! पैशाचे पाठबळ हवे! निष्ठावंत कार्यकर्ते हवेत!

आमच्या डोळयापुढे सध्या उद्योग आहेत ते असे—

१) विटांच्या भट्टया घालणे.
२) सुतारी काम सुरू करणे.
३) पाने, फुले, बिया गोळा करून विकणे.
४) सामाजिक वनीकरण करणे.
५) औषधी वनस्पतींचे बगीचे लावणे.

## विकासवाडी

वरील सर्व उद्योगांमधे बंधु-भगिनी व शाळकरी मुले या सर्वांचाच समावेश राहील. कामाची दिशा सापडली. पण सुरवात मात्र मुलांच्या विकासकार्यक्रमापासूनच व्हायला हवी, हे आतापर्यंतच्या अनुभवातून सिद्ध झाले होते. म्हणून १-१-८३ रोजी मुरब्बी पाडा, दाभोण, येथे एक विकासवाडी प्रकल्प सुरू केला. पाळणाघर, बालवाडी प्राथमिक शाळा सगळेच श्री. चिमाभाऊंच्या अंगणात सुरू झाले. नक्की वेळ नाहीच! सकाळपासूनच मोठी मुले आपल्या भावंडांसह यायची. थोडा वेळ खेळायची. पुन्हा दुपारी घरी, नाहीतर नदीवर जायची! पुनः दुपारी अंगणात हजर! रात्रीच्या वेळी बंधु-भगिनी विड्या ओढीत अंगणात येऊन बसायची.

श्री. भंगाळेभाऊंनी शक्य तितक्या सोप्या रीतीने सगळयांनाच शिकविणे सुरू केले. त्यांच्या मदतीला त्याच परिसरातील आदिवासी मुलगी कु. यमुना बाबू पिलेना मिळाली. ती रानशेतच्या आश्रमशाळेत राहून इ. ९ वीपर्यंत शिकली होती. हुशार, चुणचुणीत मुलगी!

यमुनाला मी १५ दिवस कोसबाडला ठेवून घेतले. श्रीमती द्वारकाताई पाटीलने तिला बालवाडी कशी चालवावी, हे समजावून सांगितले. तिच्याकडून प्रात्यक्षिके करून घेतली.

श्री. भंगाळे मला त्यांच्या या मुक्त शाळेच्या गोष्टी सांगत असत.

## पाटी कशाला?

मुले नदीमधे डुंबतात, रानात हिंडून आवळे जमवतात, सागाचे बी जमवतात, गुरांच्या मागे हिंडतात, वगैरे गोष्टी ऐकत होते. कोसबाडच्या माझ्या अनुभवांची ही पुनरावृत्ती होती. पण आणखी नव्याही काही गोष्टी होत्या!

एकदा मी श्री. भंगाळे यांच्याजवळ पाट्या-पेन्सिली देण्याची गोष्ट काढली. तर



त्यांनी एक गम्मतच सांगितली! "मुले म्हणतात, 'पाटी कशाला? नदीवर पुष्कळ पाट्या आहेत.' आश्चर्याने मी थक्क झालो. 'पाट्या घेऊन या', म्हणालो. तर मुले धावत गेली. नदीवरचे काळेभोर चपटे दगड घेऊन आली. वा छान पाट्या. या कधी फुटायच्याच नाहीत. पण पेन्सिली? त्या पण आहेत. पुनः मुले नदीवर गेली आणि ठिसूळ दगड घेऊन आली. त्यांच्या काळया पाटीवर या ठिसूळ दगडाने त्यांनी चित्रे काढून दाखवली!"

श्री. भंगाळे यांच्या तोंडून एक-एक गोष्टी ऐकल्या की मला स्फुरण चढायचे. मी कधी तेथे जाऊन राहीन, असे मला व्हायचे.

पण ते काय सोपे होते? एक तर कोसबाडचा वाढता व्याप! डहाणूच्या मूक-बधिर शाळेचा नव्याने मांडलेला संसार! या सर्वांतून मोकळा वेळ मिळाला पाहिजे! पैशांची पण व्यवस्था व्हायला पाहिजे!

## शुभंकरोती

दाभोणच्या कामाची मूळ कल्पना डहाणूचे डॉ. देशपांडे यांच्या पत्नी सौ. मंगला-ताई देशपांडे यांची. डॉक्टरांच्या मित्राने दाभोण येथे २५ एकर जमीन त्यांना दान देऊ केली. त्यांनी ती मला देऊ केली. प्रकरण बरेच दिवस असेच तोंडी-तोंडी घोळत होते आणि १९८१ च्या विजयादशमीला डॉक्टरांच्या घरीच आम्ही दाभोण प्रकल्पाची अमूर्त कल्पना आखली. श्री. दादा दंडवते या सभेस उपस्थित होते. नव्या संस्थेचे नाव काय ठेवायचे, याबद्दल बरीच भवती न भवती झाली. शेवटी 'शुभंकरोती' हे नाव निश्चित झाले. घटनेचा मसुदा ठरला. पण हे सगळे येथेच राहिले. कारण सौ. मंगलाताई आजारी पडल्या, शेवटी १७-१-८२ रोजी वारल्या!

## दैवी योजना : रमेश पानसे

'शुभंकरोती' संस्था थोडे दिवस मनातच विसावली. पण पुनः ती श्री. भंगाळे यांच्या पत्राने सुरू झाली. काम पुढे सुरू झाले पण संस्था रजिस्टर करणे आणि आर्थिक व्यवस्था होणे ह्या दोन गोष्टी व्हायलाच हव्या. त्यासाठी देवाने माझा मामेभाऊ प्रा. रमेश पानसे याची योजना केली आहे. चि. रमेश माझा नातू शोभेल इतके त्याच्या व माझ्या वयामध्ये अंतर आहे. पण तो आज पाठीराखा बंधू म्हणून उभा राहिला आहे. चि. रमेश कर्तृत्ववान्, उत्साही आणि कोणत्याही विषयाचा खोलवर अभ्यास करणारा प्रोफेसर आहे. नव्या नव्या कल्पनांचे भांडार त्याच्याजवळ भरलेले आहे. पण त्या नुसत्या वाऱ्यावर जात नाहीत. त्या अमलात आणण्याचा त्याचा अट्टाहास असतो. त्याची संघटनशक्ती दांडगी आहे. तो स्वतः लेखक, समीक्षक आहे. 'ऋचा' नावाचे काव्यविषयक मासिक चालवीत होता. त्याने अर्थशास्त्रावर

सोप्या, सुलभ भाषेत पुस्तकेही लिहिलेली आहेत. अशी सर्व बाजूने योग्य व्यक्ती माझ्या हाताशी आली. ही दैवी योजनाच नव्हे का ?

### "आम्ही तुला झोपडी देऊ ?"

वर सांगितल्याप्रमाणे 'शुभंकरोती' संस्थेची डॉ. देशपांडे यांच्या घरी मुहूर्तमेढ रोवली. पुढे गाडे सरकेना. मग वाटले, हल्ली बरेचसे उद्योगपती एखादे खेडे दत्तक घेऊन त्याचा सर्वांगीण विकास होण्यासाठी प्रयत्न करीत असतात. असे एखादे उद्योगपती आपल्याला मिळतील काय ? माझे निकटतम मित्र डॉ. शरदराव कुलकर्णी यांच्याजवळ मी हा विचार बोलून दाखविला. त्यांनी आपले मित्र श्री. शहा यांची व माझी ओळख करून दिली, आणि मग २१।३।८२ रोजी ३।४ कुटुंबे मिळून मुरब्बी पाड्यावर श्री. चिमाभाऊंच्या समोरील मोठ्या झाडाच्या घनदाट सावलीत वनभोजन झाले. डॉ. जैन पण या वनभोजनात सामील होते. आमचे वनभोजन तर झालेच. पण त्याच वेळी गावकऱ्यांची भेट झाली. छोटीशी सभा झाली. 'तू येथे ये. आम्ही तुला झोपडी देऊ. शाळेत मुले पाठवू!' वगैरे गोष्टी ग्रामस्थांनी सांगितल्या. बरे वाटले. विचारांना चालना मिळाली. पण पुनः बरेच दिवस असेच मनातल्या शेखचल्लीमधेच गेले. जेथे जाईन तेथे मी आमच्या या नव्या कामाबद्दल बोलत होते. तसेच चि. रमेशजवळ पण बोलले. त्याने या कामासाठी कंबर बांधली !

### बालवाडी दत्तक घेतली

एकदा त्याच्या मित्रमंडळींना घेऊन तो दाभोणला आला. त्या वेळी आमची बालवाडी सुरू झाली होती. मंडळींनी काम पाहिले. आणि खूप झाली. आर्थिक मदतीसाठी चि. रमेशने एक निराळीच योजना आखली आहे. आपल्या मित्र-मंडळींनी दरमहा यथाशक्ती वर्गणी द्यावी. ५ रु. पासून पुढे शक्य तितक्या रकमेपर्यंत. ठाण्यामधे असे मित्रमंडळ तयार झाले. मुरब्बी पाड्यावरची बालवाडी या मंडळींनी आर्थिक दृष्ट्या दत्तक घेतली. त्यानंतर आमची नाईक पाड्यावरची बालवाडी सुरू झाली. एकूण बारा पाडे आहेत. बाराही पाड्यांवर हे काम सुरू करावयाचे आहे. चि. रमेश एस. एन. डी. टी. कॉलेज, मुंबई, येथे अर्थशास्त्र विभाग-प्रमुख आहे. त्याने तेथील प्रोफेसर मंडळी व विद्यार्थिनींच्या पुढे आपले विचार मांडले. तरुण मंडळींना अशी आव्हान देणारी कामे हवीच असतात. त्यांच्या उत्साहाला, कार्य-शक्तीला पुरेसे विधायक कार्य मिळत नाही. मार्गदर्शन होत नाही. त्यामुळे मग ही शक्ती आणखी कोठेतरी धावते. काहीतरी विपरीत घडवते. या प्रचंड अणुशक्तीचा उपयोग करून घेण्याचे सामर्थ्य वडील मंडळींकडे असायला हवे. चि. रमेशजवळ ती कला आहे.



बी. ए., एम. ए. वर्गांतील अनेक विद्यार्थिनी व प्रोफेसर मंडळींनी आपले छोटे छोटे गट तयार केले आहेत. प्रत्येक गट एक एक बालवाडी आर्थिक दृष्ट्या दत्तक घेणार आहे. सध्या दोन ठिकाणी चालू असणाऱ्या कामाच्या सगळ्या खर्चाची तरतूद ही मंडळी या रीतीनेच करीत आहेत. चि. रमेशला मात्र सतत प्रयत्न करावे लागत आहेत. आतापर्यंत दोन वेळा स्पेशल बसने ही मंडळी मुंबईहून आली आहेत. गावात फिरली आहेत. विद्यार्थिनींनी मुलांचे खेळ घेतले आहेत व फराळ केले आहेत. हळू हळू मंडळी या कामाकडे आकर्षित होत आहेत.

### "ग्राम-मंगल"

दाभोण प्रकल्पाच्या मूळ प्रणेत्या कै. मंगला देशपांडे या तरुण वयातच वारल्या. त्यांची स्मृती म्हणून सर्व अर्थाने समर्पक असे नाव आता या प्रकल्पास दिले आहे— '**ग्राम-मंगल**'. आता याच नावाने संस्था रजिस्टर झाली आहे. 'शुभंकरोती' नाव रहित झाले.

सध्या येथे मुरब्बीपाडा व नाईकपाडा या दोन ठिकाणी विकासवाड्या चालू आहेत.

श्री. चिमाभाऊ दळवी हे एक वृद्ध गृहस्थ आहेत. साधा वारली शेतकरी, पण आपल्या गावात चांगली कामे झाली पाहिजेत, अशी त्यांची बळकट इच्छा! यांनीच आम्हांला आग्रहाने काम सुरू करायला लावले. 'उशीर नको. मी म्हातारा झालो आहे. माझ्या डोळ्यादेखत काम सुरू होऊ द्या!' असा त्यांचा आग्रह. मुरब्बी-पाड्यावर त्यांच्या घरातच काम सुरू झाले. पाहुणेरावळे त्यांच्या घरीच उतरतात. म्हणाल, 'श्रीमंत असेल! शिकलेला असेल!' मुळीच नाही.! पैशाने अगदी गरीब! निरक्षर! पण अनुभवी! असा हा आजोबा आहे!!

श्री. गणपत नावाचा एक तरुण आदिवासी सहकारी मिळाला आहे. आमच्या विकासवाड्यांबरोबरच डॉ. हरिश्चंद्र जैन यांनी आरोग्य प्रकल्प पण सुरू केला आहे. दर शनिवारी ते तेथे जातात. रोगी तपासतात. औषधे देतात. या आरोग्यसेवेने तेथील जनता अधिक भारावली आहे. त्यापैकीच एक श्री. गणपत. तो खूप आजारी होता डॉक्टरांनी त्याला बरे केले. आणि तो या प्रकल्पाचा एक महत्त्वाचा मदतगार झाला.

श्री. दशरथ गुप्ता नावाचे एक तरुण भय्याजी आहेत. डोक्यावर टोपली घेऊन रानात हिंडायचे व चणेकुरमुरे, पाव-बिस्किटे विकायची, हा त्यांचा धंदा. उत्तर प्रदेशामधून आलेले हे गृहस्थ. खूप हुशार आहेत. मदतीसाठी नेहमी पुढे असतात. ग्राम-मंगल प्रकल्पाच्या कामामध्ये त्यांची मदत ही फार मोलाची आहे.

बालवाड्यांचे काम करणाऱ्या श्रीमती मधुरा खुताडे व श्रीमती मालती बैजल या दोघी कार्यकर्त्या पण स्वतः आदिवासी असून निष्ठावंत आहेत. त्याच वस्तीत राहून काम करतात. हे वैशिष्ट्य.

असा एकूण सगळा संच जमला आहे. कामास सुरुवात झाली आहे. पण एका चिमुकल्या, गोड पाणी देणाऱ्या झऱ्याचा हा नुसता उगम आहे. दगडांना ठेचाळत, आडवळणे घेत, संकटांतून रस्ता काढीत काढीत त्याने आपली वाटचाल चालू ठेवली आहे—पण त्याच्या मार्गातील हे अडथळे दूर व्हायला हवेत ना ?

### प्रकल्पातील अडचणी

या प्रकल्पासाठी अजून पुष्कळ गोष्टी हव्या आहेत—

(१) ठिकठिकाणी केंद्राच्या कामासाठी व कार्यकर्त्यांना रहाण्यासाठी झोपड्या हव्या आहेत. मुरब्बी पाड्यावर एक झोपडी बांधण्याचे काम चालू आहे. छप्पर झाकावयाचे आहे.

(२) ॲप्रोच रोड नाही. तीन नाले आडवे येतात. त्यामुळे पावसाळ्यात एक-मेकांशी संपर्क साधणेच अवघड होते. काम जवळजवळ थंड पडते.

(३) वाहनांची काही सोय नाही. गवत वहाणाऱ्या बैलगाड्या आहेत त्या गवत-कापणीच्या दिवसांत त्या कामामध्ये असतात. या गाड्यांची बांधणी पण गवताचे भारे रचण्याच्या दृष्टीनेच केलेली आहे. नंतर बैलांना घरी चारापाणी देणे परवडत नाही, म्हणून बैल रानात मोकळेच हिंडतात. आपल्याला एखादेवेळी बैलगाडी हवी म्हटले तर चरायला गेलेल्या बैलांना शोधून आणण्यातच कितीतरी तास निघून जातात.

(४) उद्योग-वर्ग सुरू करायला भांडवल हवे. आदिवासी उपयोजनेतून काही मदत मिळू शकेल; पण त्यासाठी आपल्याजवळ मूळ भांडवल हवे. त्या आधारावर योजना तयार करता येतील.

(५) ग्राम-मंगल प्रकल्पामध्ये पूर्णवेळ काम करणाऱ्या सुजाण कार्यकर्त्यांची आवश्यकता आहे. गावाची समस्या समजून घेणे, गावाशी समरस होणे, यासाठी २४ तास तेथेच रहाणे आवश्यक आहे. तसेच वेतन अगर मानधन याची पोटापुरतीच अपेक्षा हवी. अशा गुणवान कार्यकर्त्यांनी पुढे यावे, ही लाख मोलाची मदत आहे.

मला स्वतःला तेथे जाऊन रहाण्याची हौस वाटते. वाढते वय आणि तेथे रहाण्याची व वाहनाची सध्या असलेली गैरसोय यामुळे गप्प बसावे लागते. पण असे वाटते की, आपले आता थोडे दिवस उरले आहेत. तेवढ्या वेळात देता येईल तेवढा आपल्या अनुभवाचा फायदा या नव्या कामाला देता आला तर काम अधिक गती घेईल.

पण येथेही परमेश्वरी संकेताप्रमाणेच होणार ना ?

# नवे देवकार्य

पहिल्या आवृत्तीमधील 'पुढे काय ?' या प्रश्नाला नियतीने काही उत्तर ठरवून ठेवलेले असावे ! माझ्या हातून आणखीही एखाद्या नव्या देवकार्याची सुरुवात करून घ्यावयाची, असा नियतीचा संकेत असावा !

मागच्या प्रकरणात दाभोणच्या ग्राम-मंगल-प्रकल्पाविषयी थोडेसे सांगितले आहेच. त्याच्या थोडेसे आधीच एक नवे काम निघाले. त्यासाठी माझी योजना योगायोगाने झाली.

**ठाणे–जिल्हा–स्त्रीशक्ती–जागृती समिती** या नावाची संस्था १९७५ च्या **विश्वमहिला वर्षा**मध्ये स्थापन झाली. प्रेरणा श्रीमती ताराबाई वर्तक यांची ! पण अध्यक्षपदाची जबाबदारी माझ्याकडे आली. आजतागायत ती तशीच आहे. या समितीने थोड्या अवकाशात पुष्कळ कामे सुरू केली आहेत, ती व्यवस्थित चालत आहेत. त्यांतील दोन मुख्य कामे—

(१) डहाणू येथील मूक-बधिर मुलांची वसतिगृहयुक्त शाळा (२) 'सावित्री' मासिकाचे संपादन व प्रकाशन.

### डहाणूची मूक-बधिर मुलांची शाळा

दाभोण प्रकल्पाच्या प्रेरणामूर्ती कै. सौ. मंगलाताई देशपांडे यांचीच ही कल्पना ! "बाई, आपण एक मूक-बधिर मुलांची शाळा काढू या !" "अहो, पण ते काम अवघड आहे ! आतापर्यंत मी आदिवासी मुलांच्यामध्ये काम केले आहे. पण मुक्या-

बहिऱ्या मुलांशी माझा संबंध आला नाही. त्यांना शिकवणे तेवढे सोपे नाही! ते एक वेगळेच तंत्र आहे! शिवाय आपल्या अवतीभवती अशी मुलेही मला फारशी कोठे आढळली नाहीत." त्यांना मी थोडेसे निराशच केले. पण बाईंनी जणू आव्हानच घेतले. थोड्या दिवसांत दोन चांगल्या बातम्या घेऊन त्या माझ्याकडे आल्या. "आपल्या परिसरात ३० मुक्या-बहिऱ्या मुलामुलींची मी नोंद केली आहे. आपल्याला डहाणूलाच या शाळेच्या इमारतीसाठी श्रीमती सविताबाई अभ्यंकर दहा गुंठे जमीन दान देणार आहेत!" त्यांचा आग्रह पाहिला. यशाची थोडीशी चाहूल लागली आणि मग मी पण कंबर बांधली. पुणे-मुंबईला शासनाशी व संबंधित व्यक्तींशी पत्रव्यवहार केला. तेथील शाळा मुद्दाम जाऊन पाहिल्या. शासनाशी या शाळेच्या शक्याशक्यतेविषयी चर्चा केली. आणि दि. २३-६-८० रोजी डहाणू मासोली भागात आमच्या मूक-बधिर बाल-विकास-केंद्राचा नारळ फुटला. हे काम आमच्या टा. जि. स्त्री श. स. मार्फत चालू झाले. या समितीच्या इतर अनुभवी सदस्य भगिनींनी पण या शाळेच्या उभारणीमध्ये महत्त्वाची मदत केली आहे. श्रीमती ताराबाई वर्तक त्या वेळी राज्यमंत्री होत्या. समाजकल्याण खाते त्यांच्याकडे होते. त्यांचे महत्त्वाचे मार्गदर्शन व आधार आमच्या पाठीमागे होता. श्रीमती सविताबाईंनी १० गुंठे जमीन आम्हांला दिली. संकल्पित इमारतीचे नकाशे तयार झाले. ५ लाख, सात हजार रुपयांचे अंदाजपत्रक तयार झाले. शासनाची मान्यता मिळण्यासाठी आवश्यक ते सर्व विधी झाले. आणि आजची वसतिगृहयुक्त शाळा सुरू झाली. स्वतःची इमारत होईपर्यंत दुसऱ्या सोयिस्कर जागेतच मला चालवावी लागली. तीन ठिकाणी जागा बदलल्या. शेवटच्या जागी भाडे पण दिले. मांजरी आपली पिल्ले सात जागी फिरवते; आम्ही आमची पिल्ले तीन जागी फिरवली आणि शेवटी २६-१-८३ रोजी स्वतःच्या अपूर्ण बांधकाम असलेल्या इमारतीत आणून ठेवली!

मुला-मुलींची संख्या हां हां म्हणता वाढत होती. जळगाव, गोळे आदि दूरच्या ठिकाणांहूनही मुले आली. वसतिगृहामुळे गरीब व मध्यम परिस्थितीच्या पालकांची चांगली सोय झाली होती. त्यांचा शाळेला सतत दुवा मिळतो. पण शाळेची फी देणे अगर वसतिगृहाचा खर्च देणे परवडत नाही. त्यामुळे आर्थिक मदत मिळविणे अवश्य होते. बिल्डिंगसाठी पण पैशांची गरज होती. तेव्हा हा पैसा कसा उभा करायचा? ही चिंता रात्रंदिवस भेडसावतच होती. तरीही काम चालतेच होते!

अडचण आली, म्हणजे मार्ग सुचतात. शासनाकडे अनुदानासाठी खटपट केली. जरूर ती कागदपत्रे पोचवली. दिल्लीच्या २-३ वाऱ्या झाल्या. शेवटी इमारतीसाठी अडीच लाख रुपये अनुदान मंजूर झाले. शाळेच्या चालू खर्चासाठी त्यांच्या नियमांत बसणारे अनुदान मंजूर झाले. तालुका पंचायत समिती डहाणू, जि. परिषद ठाणे व इतर सहृदय व्यक्ती यांनी उदारमनाने मदतीचे हात पुढे केले. चिंतेचे स्वरूप थोडे



सौम्य झाले. अजून इमारतीसाठी कमीत कमी दोन लाख व चालू खर्चासाठी दरवर्षी दहा हजार रु. मिळवायचे ते कसे मिळवावे? त्याचा विचार चालू आहे.

## द्राक्षाच्या घडांसह मी चालते!

अशी आर्थिक अडचण असली तरीही या शाळेचे काम करायला आनंद वाटतो. गरीब बिचारी मुकी-बहिरी मुले प्रेमाची भुकेली असतात. मला पाहिले की धावून येतात. माझा हात धरण्यासाठी त्यांची चढाओढ सुरू होते. आणि मग एकेका हाताला ४-५ मुले लटकतात. या द्राक्षाच्या घडांसह मी चालत रहाते. इमारतीचे बांधकाम चालू आहे. त्यामुळे बाहेर रेती, दगड, विटा पडल्या आहेत. रस्ता नीट नाही. मी येणार असे कळले की मुले मला चालण्यापुरता रस्ता सरळ करून ठेवतात. गोणपाटाच्या पायघड्या घालून ठेवतात. हे निःस्वार्थी अपार प्रेम पाहून सर्व शीण नाहीसे होतात. केलेच पाहिजे या मुलांच्या कल्याणासाठी, करता येईल ते सगळे केले पाहिजे—मनाचा निश्चय पक्का होतो.

## न्यूनगंडाचा अभाव

सुदैवाने शिक्षक मंडळी प्रशिक्षित, प्रेमळ व हुशार अशी मिळाली आहेत. श्रीमती गावेर मुबरकै या एका उच्च कुटुंबातील अगदी तरुण प्रशिक्षित भगिनी मुख्याध्यापिका आहेत. बाकीच्या ५ भगिनीही प्रशिक्षित असून कामात प्रवीण आहेत. शाळेला जोडून उद्योगवर्ग चालू आहे. तेथे श्री. जयंत कानिटकर हे क्राफ्ट-टीचर म्हणून काम करतात. उद्योगवर्गात सुतारकाम-शिवणकाम-भरतकाम चालू आहे. शाळेने आपली संचयिका पण उघडली आहे. सध्या पटावर ३७ मुलगे व ११ मुली असून पैकी ३१ मुलगे व ६ मुली वसतिगृहात आहेत. मुले हुशार आहेत. अवघ्या दोन वर्षांत त्यांनी चांगलीच शैक्षणिक प्रगती केली आहे. मुले रंजनकार्यक्रम करतात. खेळाच्या शर्यतींमध्ये भाग घेतात. आपण मुके-बहिरे आहोत असा न्यूनगंड कोठेच आढळत नाही. पालकसंघही स्थापन झाला आहे.

## ते दोन अविस्मरणीय दिवस!

डहाणू ग्रामस्थ, तसेच लायन रोटरी, जेसिस क्लबांचे सभासद यांचे या शाळेकडे चांगले लक्ष आहे. १९८३ चा पावसाळा म्हणजे पाणलोटच होता! त्यातून ऑगस्ट महिना तर धो धो धो पावसाचा! आमची इमारत नदीच्या काठी, अर्धवट बांधकाम झालेली! इमारतीच्या चौफेर पाणी आले. इमारतीच्या खालच्या भागात चार फूट पाणी आत शिरले. मुले वरच्या भागात वसतिगृहामध्ये होती. तेथेच डांबून ठेवली. दारांना आतून कुलपे लावली. मुकी-बहिरी मुले! काही म्हणता काही झाले तर!

वसतिगृहातील कार्यकर्त्यांचा जीव खालीवर होत होता, आणि इकडे मी कोसबाडला बसून काळजी करीत होते. दुसरे माझ्या हातात काहीच नव्हते. पावसाच्या माऱ्यामुळे सगळीकडून रस्ते बंद झाले होते. फोन चालत नव्हता. ते दोनतीन दिवस कायम लक्षात राहिले आहेत.

अशा वेळी डहाणूच्या ग्रामस्थ मंडळींनी मुलांची कोणीही न सांगता काळजी घेतली. वरचेवर जाऊन तपास केला. मुले सुरक्षित असल्याचे निरोप हस्ते-परहस्ते मला पोचविले.

शेवटी ही देवाची लेकरे! देवच रक्षण करणार! ७५ मैलांच्या परिसरात अशी वसतिगृहयुक्त शाळा नाही! त्यामुळे ही शाळा म्हणजे या भागाचे एक भूषणच ठरले आहे. शाळेला उज्ज्वल भवितव्य आहे, असे मनोमन वाटते. एकदा इमारत पूर्ण झालेली बघितली की हायसे वाटेल. पण तेथेही नियतीची काही योजना असेलच!

## सावित्री

१९८१ साली महाराष्ट्र शासनाने **सावित्री पारितोषिक** देऊन माझा गौरव केला. त्याच वेळी मी संकल्प केला होता की, क्रांतिदेवता श्रीमती सावित्रीबाई फुले यांची आज १४० वर्षांनी आपण आठवण करीत आहोत. पण आपल्या समाजात अवतीभोवती अत्यंत जिद्दीने स्वतः जगणाऱ्या व इतरांना जगविणाऱ्या कितीतरी भगिनी आहेत. त्यांची चरित्रे प्रकाशित करीन. त्यामुळे इतरांना प्रेरणा मिळेल.

फेब्रुवारी ८१ पासून "सावित्री" मासिक निघू लागले. पहिल्या १००० प्रती भेट म्हणून वाटल्या. रजिस्ट्रेशन मिळविताना थोडी दगदग झाली. पण मिळाले! समाजकार्यकर्त्या, सुशिक्षित, सुसंस्कारी अशा भगिनी, अगदी गरिबीमध्ये जीवन कंठूनही आपल्या घरादाराला पुढे आणणाऱ्या भगिनी, समाजातील उपेक्षित भगिनी अशा अनेक प्रकारच्या भगिनींच्या जीवनकथा ग्रथित करण्याचे भाग्य 'सावित्री'ने मला दिले. खेडेगावातील महिलामंडळे कशी चालवावीत, हे दाखविणारे 'मंगलचे महिलामंडळ' क्रमशः सावित्रीमध्ये येते. वार्षिक वर्गणी अवघी रु. १५ आहे. वर्गणीदारांची संख्या गोगलगायीच्या गतीने वाढते आहे. कारण माझ्या 'सावित्री'मध्ये चटकफटक, गुलगुल गोष्टी वगैरे काहीच नाहीत. मिळमिळीत आहे!

पण जिद्दी सावित्रीप्रमाणे माझीही जिद्द आहे. आजच्या समाजाची साहित्यिक अभिरुची भलतेच वळण घेत आहे, असे मला मनोमन वाटते. या अभिरुचीला कलाटणी द्यायचे प्रयत्न व्हायला हवेत. मी तसा अगदी अल्प प्रयत्न करीत आहे. कोणाच्याही लक्षात येणार नाही इतका नजीवी आहे! पण मी तो करीत रहाणार! आमच्या पुराणातील सावित्रीने यमराजापासून आपला पती परत मिळविला. आमच्या पृथ्वीवरील सावित्रीने स्त्रीशिक्षणास सुरवात करून प्रचलित सामाजिक रूढीला धक्का मारला. माझे 'सावित्री' मासिक असेच काहीतरी करू इच्छिते.



## निःस्वार्थी जनसेवक हवेत

समाजसेवेने प्रेरित झालेल्या पाचसहा बंधुभगिनींनी एकत्र राहून आश्रम चालविला पाहिजे. या कार्यकर्त्यांमध्ये कोणी शिक्षणतज्ज्ञ, कोणी आरोग्यतज्ज्ञ असणे जरूर आहे. अगदी मोठ्या तज्ज्ञांची गरज नाही, पण त्या बाबतीत थोडेफार जाणकार पाहिजेत. एक अशी समजदार व्यक्ती हवी की, जी गावात व बाहेरही कौशल्याने जनसंपर्क साधेल. अशा आश्रमाची या ठिकाणी गरज आहे. निःस्वार्थी जनसेवक कार्यकर्ते हवेत. आता माझ्यासारखीची नुसती तोंडाची बटबटच होणार! पण जर काही सेवाभावी तरुण मंडळी पुढे आली तर आपल्या अनुभवाचा त्यांना फायदा द्यायला मी एका पायावर तयार आहे. वाहनाची व्यवस्था झाल्यास तेथे जाऊन राहायलाच पाहिजे. पण हे सगळे जर-तर आहे!

## ही शक्ती आता नाही

दुसरे असे की एकाच व्यक्तीच्या आयुष्यात सगळे काही होईल, अशी तरी अपेक्षा कशाला? खूप काम करायचे झाले म्हणून गर्व मानू नये, एवढेच मी मनाला समजावले. आमच्या चालू संस्थेतही काम करायचे मला दिसते आहे. पण दिसले की कामाला लागायचे ही शक्ती आता राहिली नाही!

## बालग्राम व्हावे

आमच्या प्रयोगाचा दुसरा टप्पा 'कार्यानुभव प्रकल्प' हा आहे. ग्रामीण भागातील गळती थांबवायची असल्यास शाळेस जोडून व्यवसाय असणे आवश्यक आहे. आमच्या विकासवाडीत लहान प्रमाणात हा प्रयोग १०० टक्के यशस्वी झाला. तो आता विस्तारित व्हावा अशी इच्छा आहे.

डहाणू येथे 'स्त्री-शक्ती जागृती समिती, जिल्हा ठाणे' या संस्थेच्या वतीने नुकतीच बहिरे व मुके या मुलांची शाळा सुरू केली आहे. या संस्थेची मी अध्यक्ष असून मला बराच पुढाकार घ्यावा लागला. या शाळेत मुलांना दाखल करताना आमच्या कोसबाडच्या परिसरातही अशी मुले आहेत, त्यांतही आदिवासींची बरीच आहेत, असे आढळून आले. हा पण एक धक्काच आहे. अशी आणखी अनाथ मुले असतील, आंधळीपांगळी असतील. त्यांच्यासाठीही काही करणे आवश्यक आहे.

एखादे आदर्श 'बालग्राम' आदिवासी वस्तीत असावे असे वाटते.

## निरोपाची तयारी

असे पुष्कळ पुष्कळ वाटत असले, तरी माझ्या आयुष्यात माझ्या अल्प कुवतीप्रमाणे मला करता आले, तेही थोडे नाही. त्यातही ईश्वरी संकल्प आहेच. ताई

मला म्हणायच्या, "तुम्हांला बालविधवा करण्यात ईश्वराचा हेतू होता. नाही तर कोठेतरी चार मुलांचे लेंढार घेऊन बसला असतात. आज समाजाला उपयोगी ठरला आहात!"

तसेच असेल! ईश्वराने माझ्याकडून थोडेफार काम करून घेतले. ती त्याचीच प्रेरणा! सगळ्या गुरुजनांचे आशीर्वाद, मार्गदर्शन, सहकारी बंधुभगिनी–मित्रमैत्रिणी यांचा भक्कम पाठिंबा—त्यामुळे माझ्या हातून काही तरी झाले. ते सगळे ईश्वराचे त्यालाच अर्पण!

पुढे काही करता आले नाही तरीही दुःख नाही! तीही ईश्वराचीच इच्छा व प्रेरणा असेल!

मंडळी मला दीर्घ आयुष्य चिंतितात. 'आरोग्यपूर्ण आयुष्य' असा आशीर्वाद मला हवा आहे! ७४ वर्षांचा काळ हा पुष्कळ दीर्घ काळ आहे. आता हातपाय चालतील आणि डोके काम करीत राहील इतकेच आयुष्य मला हवे. कोणत्याही क्षणी जगाचा निरोप घ्यायला—तोही आनंदाने, कृतार्थतेने, आणि कृतज्ञतेने घ्यायला—माझी तयारी आहे.



# परिशिष्ट १

## जिवंत धडे

परिसराला अनुसरून मुलांच्या मदतीने तयार केलेले वाचनपाठ म्हणजे जिवंत धडे! आदिवासी शाळांतून अशा पाठांची अत्यंत आवश्यकता आहे. १९५६ साली कोसबाडच्या प्राथमिक शाळेमध्ये काम करीत असताना तयार झालेल्या वाचनपाठांचे थोडे नमुने खाली देत आहे.

### १. कुठे गेली?

आई कुठे गेली? डोंगरीला.
कशाला?
फाटी आणायला.
फाटी कशाला?
धान रांधायला.
धान कशाला?
खायला.
धान रांधला चट, चट, चट.
खाऊन टाकला, मट मट, मट.

### २. उंचच उंच

सागाचे झाड
उंचच उंच
ताडाचे झाड,
उंचच उंच
माडाचे झाड
उंचच उंच
सुरूचे झाड
उंचच उंच
उंचच उंच, उंचच उंच!

### ३. थंडगार

"चिंचेची सावली, थंडगार.
वडाची सावली, थंडगार.
जाईचा मांडव, थंडगार.
जुईचा मांडव, थंडगार.
थंडगार. थंडगार."

### ४. पांढरे धप्प

कांडूळचे खोड
पांढरे धप्प.
वडाचे खोड
पांढरे धप्प.
शेवग्याचे खोड
पांढरे धप्प.
पांढरे, पांढरे, पांढरे.

### ५. लालच लाल

पळसाची फुले
लालच लाल
शेवरीची फुले
लालच लाल

गुलमोहोराची फुले
लालच लाल
शंकासुराची फुले
लालच लाल
जास्वंदीची फुले
लालच लाल
लालच लाल, रान झाले
लालच लाल.

६. बाजारात जा

बाबा, बाजारात जा
रांधायला चाऊल आण.
हांडी गाडगी आण.
दादूला खाऊ आण.
बाईला भावली आण.
मला भवरा आण. दादाला डगला आण.
आईला सुडकी आण.
तुला चिलीम आण.
जा, जा, जा बाजारात जा.
लाही लाही जा.

(चाऊल–तांदूळ, दादू-तान्हा भाऊ, सुडकी–साड्या.)

## परिशिष्ट २

अनुताईंनी परिसरास आणि विषयास अनुसरून रचलेली काही गाणी आणि अभिनयगीते नमुना म्हणून देत आहोत.—संपादक

*सकस आहार प्रशिक्षण देताना उपयोगी पडलेली गाणी :*

### माझ्या ग परसात (ओव्या)

माझ्या ग परसात, उभा राहिला शेवगा,
पाने फुले शेंगा, संजीवनी. १
माझ्या ग परसात, उभी राहिली पपई,
पचनशक्ती देई, खाणाराला. २
माझ्या ग परसात, केळबाई डोले,
मेंदूला तेज आले, खाऊनिया. ३
माझ्या ग परसात, लावल्या पालेभाज्या,
खाते मी रोज ताज्या, हौस वाटे. ४
माझ्या ग परसात, टमाटे, वाल, चवळी
खाते मी कोवळी कोवळी, स्फूर्ती येण्या ५
माझ्या ग परसात लाख लाख सोने
आरोग्याला उणे, नाही तेथे. ६

### दळू ग बाई दळू

दळू ग बाई दळू, मुठी मुठी गहू दळू
गोल गोल लाडू वळू, बाळासाठी. १
दळू ग बाई दळू, मुठी मुठी डाळ दळू
बेसनाचे लाडू वळू, बाळासाठी. २
दळू ग बाई दळू, मुठी मुठी कण्या दळू
गूळ पीठ लाडू वळू, बाळासाठी ३
दळू ग बाई दळू, मेतकूट ताजे दळू
मऊ भात मेतकूट, बाळासाठी. ४
दळू ग बाई दळू, सोयाबीन दळू
कणकेत मळू, बाळासाठी. ५
दळू ग बाई दळू, मुठी मुठी लाह्या दळू
दूध पीठ करू, बाळासाठी. ६



### काकडीची कोशिंबीर

कीस बाई कीस, काकडी कीस
काकडीची फोड, लागते गोड.
आणिक तोड बाई, आणिक तोड. १

कूट बाई कूट, शेंगदाणे कूट
दाण्याचा कूट, लागतो छान.
आणिक आण बाई, आणिक आण. २

चीर बाई चीर, कोथिंबीर चीर
कोथिंबीरचा वास, येतोय छान
आणिक आण बाई, आणिक आण. ३

पीळ बाई पीळ, लिंबू पीळ
चमचाभर साखर, चमचाभर मीठ
कोशिंबीर खा, बाई कोशिंबीर खा. ४

*बालगीते शिकविताना उपयोगी पडणारी अनेक बालगीते अनुताईंनी लिहिली ! त्यांपैकी काही :—*

### १. चरती गुरे

हिरव्या हिरव्या माळावर
चरती गुरे, माझी चरती गुरे,
गायी, बैल, बकऱ्या आणि छोटी वासरे. १

चुरू, चुरू, चुरू, चुरू, चरता चारा
दूर जाती, दूर जाती, करती हाकारा. २

लप, लप, लप, लप, पाला ही खाई
दूर गेली शोधू कोठे बकरीबाई. ३

अवखळ वासरे ही वारा प्यालेली
इथे तिथे धावताती, खुळी झालेली ४

वनशा आला, नवशा आला,
रामा ही आला
कुस्ती मस्ती खेळामध्ये रंग भरला. ५

गोड नाद पावरीचा पहा घुमला
कसा पहा घुमला
रानीवनी आनंदाचा बहर आला. ६

### २. माझा कोंबडा

सहज गेले मल्याणीला
माझ्या कोंबड्याला कुणी मारले ?
माझ्या कोंबड्याचे अंग
जसा कापसाचा रंग
माझ्या कोंबड्याला कुणी मारले ?
माझ्या कोंबड्याचे पीस
जसे रेशमाचे केस
माझ्या कोंबड्याला कुणी मारले ?
माझ्या कोंबड्याचा तुरा
जसा टोपीमधला हिरा
माझ्या कोंबड्याला कुणी मारले ?
माझ्या कोंबड्याची चाल
जसा फौजदारी ढोल
माझ्या कोंबड्याला कुणी मारले ?
माझ्या कोंबड्याची साद
जसा घण घण घंटानाद
माझ्या कोंबड्याला कुणी मारले ?
माझ्या कोंबड्याचे गुण
किती सांगू आठवून
माझ्या कोंबड्याला कुणी मारले ?

*अभिनयासाठी अनुताईंनी मुद्दाम लिहिलेली काही गीते*

### १. खेळ गीत

(लाडू झिम्मासारखे हे गीत आहे, टाळ्या वाजवीत गोफासारखे.
एका जोडीने एका वेळी नाचत नाचत समोरच्या जागा बदलाव्यात.)
राईच्या रानात जाईन म्हणते, मधाची पोळी शोधीन म्हणते
राणीला जपून नेईन म्हणते, जरासा मध चाखीन म्हणते
गोड-गोड-गोड-गोड- १

काकाच्या मळ्यात जाईन म्हणते, माठाची भाजी आणीन म्हणते
तव्यावर परतून काढीन म्हणते, राजू मधूला वाढीन म्हणते
मट मट मट खाईन म्हणते, छान-छान-छान-छान- २

### २. बकरीबाई बकरीबाई

बकरीबाई बकरीबाई, बें बें
कोवळा कोवळा पाला देईन तुला
गोड गोड दूध देशील का मला ?
बें बें (होकारार्थी मान हालवीत)
गाईबाई गाईबाई, हम्मा हम्मा
हिरवं हिरवं गवत देईन तुला
गोड गोड दूध देशील का मला ?
हम्मा हम्मा (होकारार्थी मान हालवीत)
कोंबडीबाई कोंबडीबाई
कॉक कॉक कॉक कॉक
पांढऱ्या पांढऱ्या कण्या देईन तुला
रंगीत पिसे देशील का मला ?
कॉक कॉक कॉक कॉक (होकारार्थी मान हालवीत)
बैलोबा बैलोबा हम्मा हम्मा
शेंगदाण्याची पेंड देईन तुला
डहाणूच्या बाजाराला नेशील का मला ?
हम्मा हम्मा (होकारार्थी मान हालवीत)
घोडे दादा घोडे दादा
हि ही हि ही
शेरभर चणे देईन तुला
ताईच्या गावाला नेशील का मला ?
हि ही हि ही (होकारार्थी मान हालवीत)

### ३. गेलो होतो

(चाल—फुगडी फू बाई फुगडी फू)
गेलो होतो रानात, चिंचेच्या वनात
झर झर झर झर, झाडावर चढलो
भर भर भर भर, चिंचा पाडल्या
मीठ लावून, खुषीत खाल्ल्या
भल रे गडी, भल रे भल. १

गेलो होतो मळ्यात, रामाच्या खळ्यात
कणसं भाजली, मोठ्या झगरात
हुरडा खाल्ला, मोठ्या झोकात
भल रे गडी, भल रे भल. २

गेलो होतो घाईत, आंब्याच्या राईत
मोठे मोठे आंबे, पाडाला आले,
ते आकडीने, जाळ्यात पाडले.
सगळ्यांनी बसून, मजेत खाल्ले.
भल रे गडी, भल रे भल. ३



### ४. घोषणा

खूप खेळू, चपळ होऊ, खूप खाऊ
सशक्त होऊ.
खूप झोपू, ताजेतवाने होऊ. खूप वाचू,
शहाणे होऊ.
खूप हिंडू, चतुर होऊ. मोठे होऊ,
मोठे होऊ.
मोठे होऊ, मोठे होऊ
केलेत काम ? हो हो हो
आला घाम ? हो हो हो
आलेत का फोड ? हो हो हो
गोडच गोड कांदाभाकर खाऊन द्या हो
मोठा ढेकर !

### गवत वेणू या

गवत वेणू या, गवत वेणू या
सारे जण मिळूनी आपण गवत वेणू या. १
जमीन खणू या, जमीन खणू या
सरी सरी पाडूनी आपण वाफे करू या. २
भात पेरू या, भात पेरू या
सारे जण मिळूनी आपण भात पेरू या. ३
पाऊस आला, पाऊस आला
शेतामध्ये मऊ मऊ चिखल हा झाला ४
रोप हे झाले, रोप हे झाले
हिरवे हिरवे गार रान, शोभू लागले. ५
आवणी करू या, आवणी करू या
मुठी मुठी खणुनीया रोप बांधू या. ६
भात वाढले भात वाढले
वाऱ्या-पावसाने डोलू लागले. ७
दाणे भरले दाणे भरले,
सुवासाने सारे शेत अहा भरले ! ८
भात कापू या, भात कापू या
भारे बांधुनि या आपण उडवी रचू या या ९
भात झोडपू या भात झोडपू या
पोती पोती भरूनिया घरी नेऊ या. १०
भात कांडू या भात कांडू या
तांदळाचे मोती दाणे बांधूनि घेऊ या ११
भात शिजवू या भात शिजवू या
देवीजीला नमन करूनी सारे खाऊ या. १२

# परिशिष्ट ३

*“सहज सुचले, आणि सहज केले,” असे काही अनुताईंचे प्रयोग*

## १. फुलपाखरांच्या अवस्था

ऑगस्ट महिना होता. बागेतील झाडांच्यावर बारक्या बारक्या हिरव्या आळ्या हिंडत होत्या. पाने कुरतडून खात होत्या. “यांचीच पुढे फुलपाखरे होतात,” असे कोणीतरी सांगितले! ‘पाहूयाच’ असे ठरविले आणि मी कामाला लागले.

वहीचा एक पुठ्ठा घेतला. त्यावर कंदिलाची काच ठेवली. त्या काचेमध्ये एका झाडावरची एक आळी व त्याच झाडाची पाने आणून ठेवली. वर चहाची गाळणी झाकण ठेवली. जातायेता गंमत पहात होते. आळी पानाची कड कुरतडून खात होती. अगदी सफाईने हे कातरकाम चालते. खालच्या बाजूने वरपर्यंत जायचे, पुनः वरून खाली जायचे. प्रत्येक क्षणाला आळी जाड जाड व्हायची. शेवटी ती अंगठ्या-एवढी लठ्ठ झाली. चांगले आठदहा दिवस लागले या गोष्टीला. आळीबाई पानांचा एकीकडे फराळ करीत होत्या, तर दुसरीकडे गोल गोल काळ्याभोर लेंड्या टाकीत होत्या. जणू गुलबक्षीच्या बिया! या लेंड्या काढून टाकायच्या व नवी पाने आणून घालायची, हे रोजचे काम!

हळूहळू हा जाडा सुरवंट आळशी होत गेला. पाने खाण्याची चपळाई कमी झाली. हिरवागार रंग जाऊन तांबूस-करडा रंग आला आणि एक दिवस सगळी हालचाल संपली. सुरवंट झोपी गेला.

मी पुनःपुनः पहात होते. मला वाटायचे, हा बहुतेक मेला! पण लहानशा काडीने स्पर्श करताच अंग थरथरायचे!

एकवीस दिवसांनी हा झोपी गेलेला सुरवंट आपल्या पांघरुणातून बाहेर आला, आता ते सुंदर फुलपाखरू होते! ओले ओले! पंख पसरून काचेला चिकटून बसले होते. मी काचेवरची गाळणी काढली; पाखरू वाऱ्याने सुकले. भुर्रकन् उडून गेले. मी पहात राहिले!

माझ्या घरी केलेला हा प्रयोग आमच्या विकासवाडी प्राथमिक शाळेमध्ये दरवर्षी अगत्याने होतो. मुलेच सर्व साफसफाई करतात. आळी ठेवली, सुरवंट झोपला, फुलपाखरू निघाले या सर्व तारखांची नोंद होते. चित्रे काढतात. फुलपाखरांच्या अवस्थांमधील अंडी तेवढी प्रत्यक्ष पहावयास मिळत नाहीत. ती पानावरच कोठे कोठे असतील पण लक्षात येत नाहीत. बाकी सर्व अवस्था मुले प्रत्यक्ष पहातात. फुलपाखरांच्या अवस्था—अंडी, आळी, कोश, फुलपाखरू याची घोकंपट्टी त्यांना करावी लागत नाही.



## २. बेडकांच्या अवस्था

फुलपाखरांप्रमाणेच बेडूकसुद्धा कसा मोठा होतो, हे प्रत्यक्ष बघण्याची माझी इच्छा होती. पुस्तकांतून अवस्था वाचल्या होत्या. एका पावसाळ्यात माशाप्रमाणे गढूळ पाण्यात हिंडणाऱ्या आळ्या दिसल्या. एका काचेच्या पसरट भांड्यात गढूळ पाणी घालून त्यात त्या सोडल्या. वर मच्छरदाणीच्या कापडाचा रुमाल झाकला. पाण्यामध्ये रोज शेवाळे, बारीक बारीक किडे, आणि कणकेच्या गोळ्या टाकीत होते. हे बेडूक मासे पाण्यातून सरसर वर यायचे, खाली जायचे. गिरक्या घेत घेत फिरायचे. एक-मेकांना भेटायचे. पहाताना मजा यायची. मधून मधून पाणी बदलत होते. खाद्य टाकीत होते.

एक दिवस काही माशांच्या गळ्याजवळ दोन गाठी आलेल्या दिसल्या. काही दिवसांनी शेपटीच्या बुडाशी दोन गाठी आलेल्या दिसल्या. काही दिवसांनी या गाठींतून पाय फुटलेले दिसले. ही प्रगती होत असताना शेपूट आखूड होत होती आणि एक दिवस छोटी बेडकी तयार झाली! मी भांड्यावरचे फडके काढून घेतले आणि या बेडक्यांनी त्यांच्या छोट्या तळ्यातून बाहेर उड्या घेतल्या. पुढे त्या कोठे गेल्या, ते मी पाहिले नाही.

हा बेडूक-मासे पाळण्याचा प्रयोगही आमच्या प्राथमिक शाळेमध्ये नियमितपणे होतो. तारखांची नोंद असते. अवस्थांची चित्रे काढली जातात. सर्व काम मुलांच्या मदतीने होते.

## ३. दगड पेरला

आमच्या बागेमध्ये पण काही प्रयोग मी केले आहेत. एक दिवस बालवाडीतील मुलांच्या मदतीने बागेतील वाफ्यात हरभरे पेरून घेत होते. मुले कामात गुंग झाली होती. “हरभरे चांगले निवडून घ्या हं! मोठे मोठे घ्या! किडके नको!” मी सूचना देत होते. इकडेतिकडे फिरत असतानाच मी हरभऱ्यांएवढे गोल दगड गोळा केले. चांगले धुतले नी मुलांना म्हटले, “हे दगड पण पेरू या हं!” मुले पाहू लागली. एखाद्दुसऱ्याच्या मनात विचार आला, “दगड कसे पेरायचे?” पण बाकीच्यांनी ‘हो’ म्हटले! एका वाफ्यात हरभऱ्यांप्रमाणेच दगड पेरले. मुले रोज सगळ्या वाफ्यांप्रमाणेच या वाफ्याला सुद्धा पाणी घालीत होती. हरभरे उगवून वर आले. दगडांच्या वाफ्यातून काहीच उगवले नाही. दगड बाहेर काढून पाहिले. ते फुगले-सुद्धा नव्हते! ‘असे का?’ मुलांनी विचारले. ‘का बरे असे झाले असेल?’ तेवढ्यात चिंतेच्या स्वरात मी विचारले. मग एक चुणचुणीत चिमुरडी म्हणाली, ‘दगडाला का जीव आहे?’ ‘जीव नाही?’ मी म्हटले. मग सगळीच मुले ओरडली, ‘दगडाला जीव नाही!’ ‘बरे तर! आता आपण बघू या हं कशाकशाला

जीव आहे!' आणि मग आमच्या तेथल्या तेथेच सजीव व निर्जीव या विषयावर गप्पा झाल्या!

पानांचे निरनिराळे आकार, शिरा, फांदीवर पाने येण्याची रीत, पानझाड, पानाची गळती—अशा अनेक विषयांवर निरनिराळ्या प्रात्यक्षिकांद्वारेच आमच्या गप्पागोष्टी होत असत. त्यातून मुलांचे विज्ञानशिक्षण सहज होत असे.

ही प्रथा आमच्या प्राथमिक शाळेत चालूच आहे.

## परिशिष्ट ४

# आमचे काही प्रकल्प

*अनुताई*

**प्रयोगाप्रमाणेच काही प्रकल्पही आम्हांला काम करता-करताच सुचले. उदा०, उडदाचे पापड**

मानकरपाडा येथे आमच्या प्रौढशिक्षण योजनेतील रात्रीची शाळा चालू होती. सुमारे ५० बंधुभगिनी शाळेत उपस्थित होत्या. कशावरून तरी गोष्ट निघाली. उडदाच्या पापडाची.

एका भगिनीने विचारले, 'उडीद तर काळे असतात मग पापड पांढरे कसे?' आमची शिक्षिका हुशार होती. ती म्हणाली, 'आपण करूनच पाहू. तुमच्या बांधावर पिकलेले उडीद उद्या घेऊन या!' दुसऱ्या दिवशी मंडळींनी काळे उडीद आणले ते थोडेसेच होते! मग एक किलो उडीद विकत आणले. शाळेत सगळ्यांसमोर भिजत घातले. दुसऱ्या दिवशी एका भगिनीने ते उपसून वाळत टाकले. रात्री मंडळींनी वाळलेले उडीद पाहिले. तिसऱ्या दिवशी आणखी एक ऊन दिले. रात्री हे उडीद भरडले. काळी सालपटे निघून गेली. पांढरी स्वच्छ डाळ दिसली. हीच डाळ मग दळली. हिंग, मीठ, पापडखार वगैरे घालून पीठ भिजवले, कुटले. पापड लाटले. ओलेच पापड चुलीवर भाजले. सगळ्यांनी खाल्ले. हे काम आठवडाभर रोज थोडे-थोडे होत होते. काळ्या उडदाचा पांढरा पापड! तोही इतका खमंग, सर्वांना फारच आवडला.

मग आमचा या पापड विषयास धरूनच अभ्यास सुरू झाला. भाषा, गणित, भूगोल, आरोग्य, शेती-शास्त्र, सगळे विषय होते. चित्रकला आणि संगीत पण या व्यवसायाला धरून घेतले.



भाषेच्या पाठाप्रमाणेच उदाहरणे पण झाली. किती किलो घेतले? भाव काय? ग्रॅम आणि किलो यांच्या वजनातील फरक कोणता? त्यावरून कोष्टक! पुष्कळ दिवस हे गणित पुरले!

भूगोलामध्ये उडदाच्या पिकास जमीन कशी लागते? हवा-पाऊस कसा लागतो? त्यावरून मग भाताचे पीक, गव्हाचे पीक, नाचणी-वरीचे पीक या सगळ्यांचा हंगाम कोणता? हवा, पाणी, जमीन कशी लागते? यांची माहिती गप्पागोष्टींमधून काढून घेतली.

पापड गोल लाटतात त्यावरून गोलाकार, पुढे त्रिकोण, चौकोन असे सगळे आकार पाहून झाले. चित्रे काढून झाली.

एकूण एका उडदाने आम्हांला अभ्यासातले सगळेच विषय अभ्यासायला लावले.

या प्रकल्पाप्रमाणेच उकडीचे मोदक, कैऱ्यांचे लोणचे, इडली, पूर्णान्न, गाजराची कोशिंबीर, शेंगांचे प्रदर्शन आणि अनेक प्रकल्प घेतले आहेत. विस्तारभयासाठी येथे लिहीत नाही.

## परिशिष्ट ५

# प्रसंगातून सहज शिक्षण

*अनुताई*

१) रात्रीच्या शाळेची गोष्ट. माझा पाय दुखत होता. म्हणून मुंबईस गेले होते. ४-५ दिवसांनी परत आले. तेव्हा मुलांनी विचारले, 'कुठे गेली होतीस?' 'मुंबईला!' 'कशाला?' 'पाय दाखवायला! माझ्या पायाचा फोटो काढला!' 'फोटो? दाखव!' मी एक्सरे फोटो दाखवला. मुलांनी आश्चर्याने पाहिला. त्यावरून शरीररचना, हाडे, स्नायू, रक्त यांचा उपयोग वगैरे गोष्टींचे शिक्षण झाले. हाडांचा सापळा प्रत्यक्ष दाखवला. पुढे मुलांनी जंगलात हिंडताना जनावरांची सापडलेली कवटी, आणखी हाडे आमच्या संग्रहालयात आणून ठेवली!

२) कुरणशाळा झाडाखाली बसत होती. रोज आम्ही जागा साफ करून घेत असू. रोज गुरे जागा खराब करून टाकायची. जाणारे-येणारे पण जागा खराब

करायचे. मग एक दिवस आमचे ठरले की, आपली जागा लहान लहान दगडांनी बांधून घेऊ. म्हणजे, नुसते दगड मांडून ठेवू !

लगेच विचार अमलात आला. छोटे कुंपण तयार झाले. मग आम्ही गप्पा मारायला बसलो. हलका दगड, जड दगड, असे चालले होते. मी विचारले, 'आपल्या-मध्ये जड माणूस कोण आहे ?' मुले हसली. म्हणाली, 'तूच.' मी म्हटले, 'हो, मीच जड आहे. पण आपण वजन करूया का ?' 'तुझे वजन ?' 'हो ! माझे वजन ! तुमचे वजन !' मुलांना फार आश्चर्य वाटले. माणसांचे वजन ? मग त्यांना आमच्या प्राथमिक शाळेत आणले. वजनकाट्यावर सगळ्यांचे वजन घेतले. त्यांना खूप आनंद झाला.

या वजनावरून पुढे व्यवहारातील वजनांचे कोष्टक व उदाहरणे तयार झाली.

प्रसंग साधून शिक्षण देणे यामध्ये शिक्षकाजवळ समयसूचकता असावी लागते. आमच्या प्राथमिक शाळेतील बहुतेक शिक्षक अशी समयसूचकता वापरतात.

## परिशिष्ट ६

### प्रौढशिक्षणासाठी केलेल्या लेखनाचे नमुने

निरक्षर प्रौढ आदिवासींच्या शिक्षणाची समस्या सोडविण्यासाठी अनुताईंनी सर्व पातळीवर कार्य केलेले आहे. नुसता विचार त्या मांडीत नाहीत. शिक्षणासाठी आवश्यक ती साधने त्या निर्माण करतात ! त्यांनी जोडाक्षरविरहित शब्द आणि पाठमाला तयार केल्या आहेत. छोट्या कार्डावर ग्रामबाल-शिक्षा-केंद्र प्रकाशनाद्वारे त्या प्रकाशितही झालेल्या आहेत !

परिसरातील शब्द, परिचयाचे वातावरण, उपयुक्तता आणि प्रत्यक्ष अनुभव यांच्या पायावर शिक्षणपद्धती आणि शैक्षणिक साधने उभी असली पाहिजेत, हे सूत्र अनुताईंनी अंगिकारलेले आहे.

अनुताईंनी प्रौढ-शिक्षणकार्यासाठी तयार केलेल्या शब्दमाला आणि निवडक पाठांचा तपशील हेतुपूर्वक देत आहोत.

**—संपादक**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| चिखलण | कुदळ | खाचर | तूर | भात |
| पेरणी | फावडे | बांध | मूग | बाजरी |



| | | | | |
|---|---|---|---|---|
| आवणी | खुरपे | गादीवाफा | वाल | जोंधळा |
| भांगलणी | नांगर | वरखत | चवळी | वरी |
| निंदणी | औत | शेणखत | मटकी | गहू |
| खुरपणी | मोट | सोनखत | मसूर | नागली |
| कापणी | विळा | खळे | उडीद | कोदरी |
| झोडणी | पहार | कुंपण | हरभरा | देवभात |
| हंडा | अंगण | बैलगाडी | शेतकरी | कारकून |
| घागर | मैदान | आगगाडी | सुतार | तलाठी |
| कळशी | बखळ | मोटार | लोहार | शिपाई |
| हौद | बाग | बस | गवंडी | वकील |
| माट | वाळवंट | सायकल | गवळी | हवालदार |
| रांजण | गाडीतळ | आगबोट | माळी | मामलेदार |
| लोटी | मोटारतळ | विमान | साळी | फौजदार |
| भांडे | विमानतळ | खटारा | कुंभार | चौकीदार |

**नमन**

गणेश देवाला नमन
आई बाबांना नमन
गुरु देवाला नमन
जमीन आईला नमन
पाऊस देवाला नमन
चला, चला, शाळेत जाऊ
लिहू , वाचू , गाणे गाऊ
शाळा शिकून शहाणे होऊ

**काय करावे ?**

बाबा मजुरी करतो
चार रुपये रोज आणतो
आई डोंगरावर जाते
लाकडाचे भारे आणते
बाबू गुरे चारतो
छबूला शाळा नाही
छबू बाळाला सांभाळते
काय करावे कळत नाही

### हवे

गावात पाळणाघर हवे
गावात बालवाडी हवी
गावात मुलांची शाळा हवी
आईबाबांसाठी शाळा हवी
गावात दवाखाना हवा
गावात वाचनालय हवे
खेळायची जागा हवी
गाव कसे छान हवे

### औषध

छबूला ताप आला आहे
खूप खोकला झाला
भगताला बोलावू का ?
नको, नको, औषध आणू
आपली रमाताई औषध देते
ताप-खोकला बरा होतो
अंगारा, धुपारा नको
आपण काही अडाणी नाही

### गवळण

मी आहे गवळण
सकाळीच उठते
गाईची धार काढते
हंडा भरून दूध घेते
शहरात जाऊन विकते
मीठमिरची घेऊन येते
गाई-वासराला दाणापाणी
मुलाबाळांना भाकर पाणी

### माळीणबाई

मी आहे माळीण बाई
बागेत फुलली जाई जुई
सकाळीच फुले तोडते
दाट गजरे करते
शहरात जाऊन विकते
मीठ, मिरची घेऊन येते
झाडांना खत पाणी
मुलाबाळांना भाकर पाणी

### शाळा हवी

बाबू, छबूला शाळा हवी
बाळाला पाळणाघर हवे
गुरामागे आजोबा जाईल
मग शाळेत जाता येईल
बाबू शिकून मोठा होईल
धंदा करून पैसा आणील
छबू शिकून मोठी होईल
आपले घर छान ठेवील

### पक्षी सांगतो

पक्षी सांगतो उठा उठा
जमीन तयार करा
बी तयार ठेवा
खत तयार ठेवा
पाऊस येत आहे
सावध रहा
पेरणी करा पेरणी करा
पक्षी सांगतो पेरणी करा



### आनंदी आनंद

खण खण कुदळी
मण मण माती
बी पेरू हातोहाती
पाऊस आला सरसर
रोप वाढले भरभर
कणसे कापू झरझर
भाताला नाही तोटा
आनंदी आनंद मोठा

### किसान

मी आहे किसान
शेती आहे माझे काम
जमीन माझी आई
पाऊस माझा बाबा
मेहनत माझा भाऊ
सेवा करून खाऊ
भात बाजरी जोंधळा
भाजी पाला पिकला मळा

### गवंडी

मी आहे गवंडी दादा
घर बांधणे माझा धंदा
विटा, माती, चुना, रेती
सिमेंटे हवे पोती पोती
ही माझी थापी, हा आळंबा
करू नका खोळंबा
घरे, देवळे, वाडे बंगले
बांधतो मी चांगले

### लोकराज्य

भारतात लोकशाही आहे
लोकांसाठी लोकराज्य आहे
आमचे घर आमचे गाव
आमचा देश आमचे नाव
संतती, संपती, समृद्धी
झटून करू त्यांची वृद्धी
देशाचे हित देशाचे वैभव
हाच आहे आमचा गौरव

### उसळ

मटकी भिजवली
रुमालात बांधली
तरारून मोड आले
उसळ झाली चवदार
वाल भिजवले
रुमालात बांधले
तरारून मोड आले
उसळ झाली चवदार

### नको रे बाबा

दारू, ताडी नको रे बाबा
जुगार खोटा नको रे बाबा
पान, आकडा, नको रे बाबा
आळशी पणा, नको रे बाबा
कामधंदा हवा रे बाबा
शेतीवाडी, हवी रे बाबा
बैलगाडी हवी रे बाबा
पैसा बचत, करा रे बाबा

**महालक्ष्मी**

महालक्ष्मी आमची आई
डोके ठेवतो तिचे पायी
डोंगराच्या माथ्यावर बसली
भक्तासाठी पायथ्याला आली
चैत्र पौर्णिमा आली जवळ
भक्तांची झाली धावपळ
माय माऊली आम्हांला पाव
सगळ्या लोकांना सुखी ठेव

**झेंडावंदन**

आज आहे स्वातंत्र्यदिन
तिरंगी झेंड्या तुला वंदन
पंधरा ऑगस्ट शुभ दिन
भारतीयांचा मोठा सण
झेंड्याचे रंग आहेत तीन
सत्य, शांती, प्रेम यांचे चिन्ह
महा प्रयत्ने फडकविला
पूज्य आहे तो आपल्याला

**गाव**

आमचा गाव आहे लहान
पण त्याला करू आम्ही छान
घरे आमची स्वच्छ, सुंदर
केर, कचरा पळाला दूर
सांडपाणी नेले परसात
पालेभाजी झाली मस्त
संडास मोरी ओटा अंगण
गावाची ही सुंदर ठेवण

**ग्रामपंचायत**

हे आमचे समाजमंदिर
ग्रामपंचायत येथे होते
आम्ही निवडणूक केली
चांगली माणसे निवडली
सरपंच चांगले आहेत
सगळ्यांची काळजी घेतात
सगळ्यांना न्याय देतात
आमचा गाव आदर्श आहे.

**दवाखाना**

आमचा दवाखाना आहे
डॉक्टर चांगले आहेत
नर्सबाई कष्ट घेतात
काळजीने औषध देतात
चांगली औषधे आहेत
एक्सरे, इंजक्शने आहेत
औषध घेऊन बरे होऊ
दुखण्यांना पळवून लावू

**शाळा**

ही आमची मोठी शाळा
मुले-मुली शाळेत जातात
चांगला अभ्यास करतात
आम्ही शाळेकडे लक्ष देतो
सामान आहे-नाही पहातो
गैरसोयी दूर करतो
आमची मुले शिकतील
देशाचे भले करतील



**पोस्ट ऑफिस**

हे पोस्ट ऑफिस आहे
येथे आम्ही पत्रे टाकतो
टपाली आम्हांला पत्रे देतो
आम्ही पत्रे वाचतो, लिहितो
कारण रात्री शाळेत जातो
तार पण येथेच होते
कधी कधी पार्सल मिळते
मनिऑर्डर पण येते.

परिशिष्ट ७

## अनुताईंचा जीवनपट

**जन्म** : १७ मार्च १९१० : पुणे येथे जन्म.

**शिक्षण** : १९२७ : व्हर्नाक्युलर फायनल परीक्षेत नाशिक जिल्ह्यात सर्वप्रथम.

१९२९ : प्राथमिक शिक्षण प्रमाणपत्र (पी०टी०सी०) परीक्षेत पुणे विभागात सर्वप्रथम.

१९३७ : रात्रशाळेद्वारे मॅट्रिक.

१९६१ : दोन्ही डोळ्यांत मोतिबिंदू झालेले असूनही एस०एन०डी०टी० विद्यापीठाची बी०ए० उत्तीर्ण.

**नोकरी** : १९२९ ते १९३३ : चांदवड-पिंपळगाव येथे प्राथमिक शिक्षणमंडळात प्राथमिक शिक्षिका.

**१९३३ ते १९४४** : पुण्याच्या हुजूरपागेत प्राथमिक शिक्षिका.

**पहिली गुरु-भेट** : १९४५ : बोरिवलीच्या शिबिरात ताराबाई मोडक यांचेशी भेट.

**बोर्डीत गुरूच्या सहवासात** : १९४५ ते १९५६ : बोर्डी येथे ताराबाई मोडक यांचे सहवासात शैक्षणिक कार्य.

**कोसबाडला कार्यास प्रारंभ : १९५६ पासून आजपर्यंत** : कोसबाड टेकडीवर विकासवाडीचा प्रयोग ग्रामबाल-शिक्षा-केंद्राच्या पदाधिकारी म्हणून करीत आहेत.

**सप्टेंबर १९७३ पासून सप्टेंबर १९९२ पर्यंत** : ग्रामबाल-शिक्षा-केंद्राच्या संचालिका.

**डिसेंबर १९७६** : कोसबाड येथे अखिल भारतीय पूर्वप्राथमिक शिक्षणविषयक अधिवेशनाचे संयोजन. (भारतात ग्रामीण भागात अशा प्रकारचे अधिवेशन प्रथमच संयोजित झाले.)

**जून १९८०** : मूक-बधीर बालविकास केंद्राची स्थापना

**डिसेंबर १९८२** : ग्राममंगल संस्थेची स्थापना

## परिशिष्ट ८

# अनुताईंचे सन्मान

**१९७२** : महाराष्ट्र राज्य सरकारतर्फे 'आदर्श शिक्षक' म्हणून पुरस्कार.

**१९७३** : महाराष्ट्र राज्य सरकारतर्फे 'दलित-मित्र' म्हणून सन्मान.

**१९७८** : फाय फाउंडेशन, इचलकरंजी, या संस्थेद्वारे दहा हजार रुपयांचा पुरस्कार.

**१९७८** : मराठी विज्ञान परिषदेच्या द्वारे सन्मान.

**१९७९-८०** : आंतरराष्ट्रीय बालकवर्षाचा बालकल्याणाचा वीस हजार रुपयांचा राष्ट्रीय पुरस्कार उपराष्ट्रपती कै० हिदायतुल्ला यांच्या हस्ते.

**३१ ऑगस्ट १९८०** : ७१ व्या वर्धापनदिनी बोर्डी येथे चहात्यांद्वारे मानपत्र आणि एक लाख रुपयांची थैली देऊन सत्कार.

**५ डिसेंबर १९८०** : आदिवासी बालकल्याण कार्याबद्दल मुंबई महानगरपालिकेतर्फे सत्कार.

**१२ डिसेंबर १९८०** : पुण्याच्या मातोश्री माईसाहेब पारखे स्मृतिन्यासद्वारे 'आदर्श महिला' हा किताब.

**१७ डिसेंबर १९८०** : मुंबईच्या विवेकानंद क्लासेस द्वारे दहा हजार एक रुपये देऊन सत्कार.

**३ जानेवारी १९८१** : महाराष्ट्र राज्य सरकार द्वारे पाच हजार रुपयांचा कै० सावित्रीबाई फुले प्रथम पुरस्कार.

**३ जानेवारी १९८१** : मुंबईच्या एल०आय०सी० कंझ्युमर्स सोसायटीतर्फे पाच हजार रुपयांची थैली देऊन सत्कार.

**१९८१** : प्रौढ साक्षरता-प्रसारार्थ लिहिलेल्या पुस्तकास केंद्र सरकारचे पहिले पारितोषिक.

**१९८५** : महिला व बालकल्याण या क्षेत्रांतील प्रशंसनीय कार्याबाबत एक लाख रुपयांचा जमनालाल बजाज पुरस्कार (श्रीमती जानकीदेवी बजाज यांच्या स्मृतीप्रीत्यर्थ स्थापित)

**१९८५** : केंद्र सरकारचा पद्मश्री पुरस्कार.

**१९९२** : दीनानाथ मंगेशकर प्रतिष्ठानचा 'आशा भोसले' पुरस्कार.

**१९९२** : रमाबाई केशव ठाकरे पुरस्कार.

यांखेरीज महाराष्ट्रातील असंख्य लहानमोठ्या संस्थांनी १९८० मध्ये अनुताईंच्या आदिवासींच्या बालकल्याणार्थ व ग्रामीण भागातील शिक्षण व सेवाकार्याबद्दल सत्कार केलेले आहेत.



## परिशिष्ट ९

# अनुताईंनी भूषविलेली पदे

**१) कार्यकारिणी सदस्य** : नॅशनल कौन्सिल ऑफ एज्युकेशन रिसर्च ॲण्ड ट्रेनिंग, दिल्ली. (१९७६-१९७९)

**२) जनरल सेक्रेटरी** : नूतन बालशिक्षण संघ. (१९७४-१९७५)

**३) उपाध्यक्ष** : इंडियन असोसिएशन ऑफ प्री. स्कूल एज्युकेशन.

**४) सभासद** : नवी दिल्ली येथील आय.सी.सी.डब्ल्यू. बालसेविका ट्रेनिंग ॲडव्हायझरी कमिटी.

**५) अध्यक्ष** : स्त्री-शक्ति-जागृती समिती, ठाणे.

**६) सभासद** : रिसर्च एज्युकेशन बोर्ड ऑफ दि स्टेट इन्स्टिट्यूट ऑफ एज्युकेशन (महाराष्ट्र राज्य)

**७) सभासद** : राज्यपातळीवरील प्रौढ साक्षरता कमिटी.

**८) सभासद** : आंतरराष्ट्रीय बालकवर्षातील जिल्हा समिती आणि विभागीय समिती.

**९) संपादिका** : (१) ''शिक्षणपत्रिका'' मासिक. (२) ''सावित्री'' मासिक. (सप्टेंबर १९७४ ते सप्टेंबर १९९२)

परिशिष्ट १०

## अनुताईंची ग्रंथसंपदा

१) **बालवाडी कशी चालवावी?** (१९५६)
(मराठी, हिन्दी, गुजराथी आणि इंग्रजी भाषेतून प्रसिद्ध)
२) **कुरण शाळा** (कै० श्रीमती ताराबाई मोडक यांचे सहकार्याने)
३) **विकासाच्या मार्गावर** (मराठी व हिन्दी) (कै० श्रीमती ताराबाई मोडक यांचे सहकार्याने)
४) **शिक्षणमित्रमाला**
५) **अजब सातभाई** (१९७७)
६) **आटपाट नगरात**
७) **सकस आहार गीते**
८) **टिल्लूची करामत**
९) **कोसबाडच्या टेकडीवरून** (१९८०, १९८४, १९९२, २००४)
१०) **गुरुमाउलीचा संदेश (नाटक)** (१९८२)
११) **सहज शिक्षण** (१९८२)

**याखेरीज अनुताईंनी संपादन केलेली पुस्तके :**

१) बालवाडीतील गोष्टी-भाग-१
२) बालवाडीतील गोष्टी-भाग-२
३) बालवाडीतील बडबडगीते
४) बालवाडीतील कृतिगीते
५) प्रबोधिका



परिशिष्ट ११

## आभारी आहे

कै० पू० ताई (श्रीमती ताराबाई मोडक) यांची प्रेरणा व खंबीर मार्गदर्शन यामुळे ग्राम बाल शिक्षा केंद्राने आदिवासी आणि ग्रामीण भागांतील पूर्वप्राथमिक व प्राथमिक शिक्षणातील अनेक समस्या सोडविल्या. शिक्षणशास्त्रामध्ये बालवाडी, अंगणवाडी, कुरणशाळा, विकासवाडी यांसारखे सार्थ नवे शब्द रूढ केले. हे सर्व लिहून काढायला हवे; त्यामुळे पुढच्या मंडळींना इतिहास कळेल, काही नवे शिकता पण येईल, असे खूप दिवसांपासून वाटत होते.

'युनिसेफ'च्या प्रोग्रॅम ऑफिसर श्रीमती सिंधुताई फडके यांनी या माझ्या मनोगतास वाट करून दिली. ''लिहून काढा'' म्हणाल्या. पण जगाच्या मोठ्या भागातील भाषा इंग्रजी आहे, म्हणून पुस्तक इंग्रजी असावे, असे त्यांचे म्हणणे पडले. त्याप्रमाणे 'ग्रोइंग अप ॲट कोसबाड हिल' हे इंग्रजी पुस्तक माजी शिक्षण संचालिका श्रीमती चित्राताई नाईक यांनी लिहून काढले. त्यासाठी त्यांनी संस्थेच्या वाटचालीचा काळजीपूर्वक अभ्यास केला. आकडे गोळा केले. मुलाखती घेतल्या. आणि अतिशय साक्षेपाने संस्थेच्या कामाचे योग्य मूल्यमापन करणारे पुस्तक लिहिले. त्यांचे इंग्रजी भाषेवर चांगले प्रभुत्व आहे. (या प्रकल्पास युनिसेफने आर्थिक मदत पण दिली.)

तरी अजूनही रुखरूख कायम होती : आपल्या बहुजन समाजास उपयोगी पडण्यासाठी देशी भाषेत-विशेषत: मराठीत–हे सगळे लिहून आले पाहिजे. आणि एके दिवशी 'ग्राम बाल शिक्षा केंद्र–जसे घडले तसे' लिहावयास घेतले. टाईप फुलस्केप शंभर पाने झाली. ''ताई, चरित्र लिहा'' म्हणणारांपुढे हे हस्तलिखित मी ठेवीत गेले. संस्थेचा इतिहास, म्हणून मी स्वत:ला शक्य तितके अलिप्त ठेवले होते. पण मित्रांचे म्हणणे पडले, तुमच्या शैक्षणिक आठवणी तरी लिहाच. मग त्याही लिहायला घेतल्या. हीसुद्धा टाईप फुलस्केप शंभर पाने झाली. दोन्हींमध्ये कित्येक मजकुराची पुनरावृत्ती होती. त्यापैकी काही छापून प्रकाशित होईल, याची मला आशा नव्हती. छापायचे असल्यास पहिलेच छापावे, असा माझा आग्रह होता. पण माझे मामेबंधू प्रा० रमेश पानसे व त्यांचे मित्र श्री० अशोक चिटणीस यांनी दोन्ही छापून प्रकाशित करण्याचा आग्रह धरला. ''द्विरुक्ती कशी टाळाल? मजकूर जोडून कसा घ्याल?'' असे माझे त्यांना प्रश्न होते. ''ते आम्ही पाहून घेऊ'' असे त्यांनी सांगितले. मी हस्तलिखिते त्यांच्या स्वाधीन केली. शैक्षणिक आठवणींमध्येही माझी कौटुंबिक माहिती मी घातलीच नव्हती. पण तेही या मंडळींनी मला लिहायला लावले.

श्री० अशोक चिटणीस हे ठाण्याच्या डॉ० बेडेकर विद्यामंदिराचे कर्तबगार प्रिन्सिपॉल व बक्षिसे मिळविणारे ललित साहित्य लेखक आहेत. त्यांनी एका

आठवड्यात, रोज सतत सतरा तास बसून वरील सर्व गोष्टी एकत्र केल्या. आणि छानपैकी प्रेसकॉपी तयार केली. हे हस्तलिखित जेव्हा त्यांनी वाचून दाखवले तेव्हा, सर्व मजकुराची योग्य जुळणी, आकर्षक मथळे आणि महत्त्वाच्या गोष्टी जोरदार वाचनाने पुढे मांडणे, ही सर्व शैली पाहून मी थक्क झाले. रोज सतत सतरा तास बसून काम करण्याच्या त्यांच्या चिकाटीपुढे मी अक्षरश: दंडवत घातले! त्यांच्या या प्रयत्नाने आजचे 'कोसबाडच्या टेकडीवरून' हे पुस्तक प्रकाशित होत आहे.

माझे मामेबंधू प्रा० रमेश पानसे हे वयाने माझ्यापेक्षा पुष्कळच लहान, म्हणजे माझे नातू शोभतील असे आहेत. पण त्यांची प्रज्ञा, विचारसरणी परिपक्व आहे. धडाडी तरुण मंडळीस शोभेशी आहे. त्यांनी व त्यांच्या पत्नी प्रा० सौ० अरुंधती पानसे यांनी ऋचा प्रकाशनातर्फे हे पुस्तक प्रकाशित केले आहे. श्री० अशोक चिटणीस, प्रा० रमेश पानसे, प्रा० सौ० अरुंधती पानसे या सर्वांची मी याबद्दल फार फार ऋणी आहे. आमच्या संस्थेच्या कामाला प्रसिद्धी देत असल्याबद्दल संस्थाही या तिघांची ऋणी आहे.

प्रस्तावना डॉ० प्रा० स० ह० देशपांडे यांनी लिहिली आहे. त्यांनी सतत तीन वर्षे आमच्या संस्थेत वारंवार येऊन संस्थेच्या कार्याचा अभ्यास केला आहे. तेव्हा त्यांचा तो अधिकारच आहे. त्यांचीही मी ऋणी आहे.

मौज प्रेसने काम इतक्या घाईने पण सुबकपणे व वेळेवर करून दिले म्हणून त्यांचेही आभार मानते.

संस्थेमार्फत शिक्षणक्षेत्रातील काही समस्या उकलणे व नवे मार्ग प्रस्थापित करणे या गोष्टी होऊ शकल्या. त्यात गुरुजनांचे आशीर्वाद व सहकाऱ्यांचे सहकार्य महत्त्वाचे आहे. त्यांनाही नम्रतापूर्वक अभिवादन!

**–अनुताई वाघ**



परिशिष्ट १२

## दुसरी आवृत्ती निघते तेव्हा

'कोसबाडच्या टेकडीवरून' या माझ्या पुस्तकाची दुसरी आवृत्ती निघत आहे. ही आनंदाचीच गोष्ट आहे. जसे घडले, तसे मी लिहिले! त्या माझ्या लेखनाचे रसिक वाचकांनी फार मनापासून स्वागत केले, म्हणून माझे हृदय भरून आले आहे! माझ्या सर्व वाचकांचे व त्याबरोबर ईश्वराचे मी मनापासून आभार मानते.

१९८० साली पुस्तक प्रसिद्ध झाले. त्यानंतर आमच्या टेकडीवर पुष्कळ काही घडले आहे! हे विकासवाडीचे कमळ फुलतेच आहे! नव्या आवृत्तीमध्ये अशाच काही नव्या गोष्टी वाचकांच्या पुढे ठेवीत आहे. त्याबरोबरच 'संकल्प व सिद्धी' हे एक आत्मसंशोधनात्मक छोटेसे प्रकरणही नव्याने लिहिलेले आहे.

पुढे काय? हा प्रश्न माझ्या पहिल्या आवृत्तीमध्ये आहे. दाभोण प्रकल्पाच्या बाबतीत पुढे काहीतरी घडले आहे. घडत आहे. तेही थोडक्यात सांगितले आहे.

कोसबाडच्या टेकडीवर बालशिक्षणाचे काम सुरू केले ते आजही चालू आहे, विकसत आहे. या कामाला धरूनच पण थोड्या वेगळ्या स्वरूपाचे काम डहाणू येथे १९८० पासून सुरू झाले आहे. 'ठाणे जिल्हा-स्त्री-शक्ति-जागृती-समिती' या नव्या संस्थेमार्फत हे काम चालते. अध्यक्ष या नात्याने या नव्या कामाची बरीचशी जबाबदारी माझ्यावर आहे.

या संस्थेतर्फे ६ पाळणाघरे, १ बालवाडी, 'सावित्री' नावाचे मासिक व एक मूकबधिर मुलांची शाळा चालते. या शाळेविषयीही थोडेसे नव्याने लिहीत आहे.

पहिल्या आवृत्तीप्रमाणेच जनताजनार्दन प्रेमामुळे या दुसऱ्या आवृत्तीचेही स्वागत करील, अशी आशा आहे.

या पुस्तकास प्रकाशात आणणारे प्रा. रमेश पानसे, ठाण्यातील डॉ० बेडेकर विद्यामंदिराचे मुख्याध्यापक श्री० अशोक चिटणीस व इतर सहकारी मंडळींचे मन:पूर्वक आभार मानते.

शेवटी देवाजीला नमन! त्याच्याच इच्छेने सर्व घडत आहे!

**–अनुताई वाघ**